# कल्याणी

१९९८

संत नामदेव महाराज विशेषांक







## उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,

बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.

दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७




|| श्रीराम ||

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुले १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२)मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रकम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. वेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी "यांनी घडविला महाराष्ट्र" या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक – श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक – डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य – डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख – ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे – श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण – श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे – श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या-पारितोषिके देत आहे –

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/– ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/– ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी – निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/– खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वत: मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना परी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करुन घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी – श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यांत समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



ऑंकार ट्रस्ट संचालित 'राधाबाई हर्डीकर' प्रसूती गृह



ऑंकार ट्रस्ट संचालित दवाखान्याची इमारत

# ओंकार ट्रस्टची वाटचाल

## १९९७-९८

३०-३-९७ संत श्रीएकनाथ महाराज विशेषांकाचे प्रकाशन. डॉ. स्वर्णलता भिशीकर यांना वसुंधरा सामाजिक कृतज्ञता पुरस्कार प्रदान, अध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर. राधाबाई हर्डिकर प्रसूतीगृहाचे उद्घाटन, उद्घाटक श्री. ज्ञाननाथजी रानडे, अध्यक्ष श्री. सुरेशराव कदम. समर्थ दर्शन पुस्तकाचे उद्घाटन लेखक श्री. श्रीपाद चितळे व डॉ. म. रा. जोशी डॉ. व्ही. एस. देशपांडे व सुनंदा शाळिग्राम यांची प्रवचने ५० व्या स्वातंत्र्यदिनानिमित्त समर्पण संस्कार वर्गातर्फे कार्यक्रम सादर. कर्वे स्त्री शिक्षण संस्था व धनकवडी शाळा येथे निबंध स्पर्धा व बक्षीस समारंभ. समर्थ विद्यापीठ शिवथर घळ १ व २ परीक्षेस गुजरवाडी येथील ३० विद्यार्थी उत्तीर्ण शिवाजी रस्ता पोलीस लाईन व बिजली नगर चिंचवड या ठिकाणी संस्कार वर्ग सुरू.श्री. नानासाहेब लाभे, नागपूर माजी मुख्याध्यापक व ४५ वर्षे प्रसार करणारे यांचा अक्षर सुधार प्रकल्प १२ शाळांमधून राबविण्यात आला. ५,००० विद्यार्थ्यांनी लाभ घेतला.

## १९९६-९७

संत श्रीतुकाराममहाराज विशेषांक. १६ ऑगस्टपासून दररोज दवाखाना सुरू. हिंगणे स्त्रीशिक्षण संस्थेच्या निवासी मुलींसाठी नेत्रचिकित्सा शिबीर - मार्गदर्शक : डॉ. पारस शहा. भारतीय संस्कृती दर्शन - समर्थ विद्यापीठाच्या १ल्या व दुसऱ्या परीक्षेला बसलेली सर्व ५० मुले-मुली यशस्वी. अक्षर सुधार प्रकल्प : श्री. नानासाहेब लाभे नागपूर, माजी मुख्याध्यापक व ४५ वर्षे प्रसारक १५०० जणांनी लाभ घेतला. तसेच 'अभ्यास कसा करावा' रविंद्र देशमुख यांचे मार्गदर्शन, मांगडेवाडी, गुजरवाडी, धनकवडी येथे [illegible] स्पर्धा [illegible] देण्यात आली. [illegible], काव्य वाचन, [illegible] करण्यात आले. शास्त्रीय व [illegible]संगीत [illegible] नागरिक संघ. राधाबाई हर्डीकर यांचे [illegible] उभारण्यात आले.

## १९९५-९६

संत ज्ञानेश्वर महाराज विशेषांकाचे प्रकाशन. ह.भ.प. कृष्णकांत नाईक यांचे प्रवचन. कीर्तन - सौ. सईताई मोने. श्री. द्वा. केळकर यांचा सज्जनगडचा 'स्वामी समर्थ' पुरस्कार मिळाल्याबद्दल सत्कार. गुजरवाडी जि. प. शाळेतील १९ मुलं शिवथर घळ समर्थ विद्यापीठाच्या भारतीय संस्कृती दर्शन प्रथम परीक्षेला बसली. सर्वसाधारण चिकित्सा व कर्करोग निदान, डोळे तपासणी व मोफत चष्मेवाटप, कर्करोगावर स्लाईडसह माहिती ही शिबीरे मांगडेवाडी येथे. गुजरवाडी-मांगडेवाडी जि. प. शाळेत विविध स्पर्धा.

## १९९४-९५

'स्वामी विवेकानंद' विशेषांकाचे प्रकाशन. मोफत नेत्रचिकित्सा शिबीर. २०६ लोकांची तपासणी. १०१ जणांना मोफत चष्मे. ४ जणांवर मोफत शस्त्रक्रिया. युवा संघटनेमार्फत आयोजित गरबानृत्य स्पर्धेत भाग. कास्पच्या हस्तकला प्रदर्शनात संस्कारवर्गाचा सहभाग. मार्केटयार्ड (भटक्या मुलांसाठी), हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था, धनकवडी शाळा येथे नव्याने संस्कार वर्ग सुरू करण्यात आले.

## १९९३-९४

नियोजित [illegible] जागेची खरेदी. सुनील [illegible], [illegible] सोमण, के. एन. [illegible], [illegible] [illegible]शिकर, [illegible] पां. भिशीकर आदींची व्याख्याने. शिवणवर्गाचे [illegible] वर्गात. रामनवमी विशेषांकाचे प्रकाशन. सौ. अलका देव [illegible] यांचे गायनाचा कार्यक्रम. कीर्तन - सौ. [illegible]

## १९९२-९३

प्रथम वर्धापन दिन गुरुपौर्णिमा 'कल्याणी' प्रथम विशेषांकाचे प्रकाशन. मांगडेवाडी येथे शिवणवर्ग. गुजरवाडी, निंबाळकरवाडी येथे दवाखान्याची सुरवात. मोफत वाचनालय सुरू. गुलबर्गा कर्नाटक राज्य येथे वर्षातून दोनदा वर्ग घेण्यात येऊ लागला.

## १९९१-९२

२१ जुलै १९९१ गुरुपौर्णिमा ओंकार ट्रस्टची स्थापना. आद्यसंस्थापक कै. सौ. वसुंधरा सातवळेकर

गुजरवाडी, निंबाळकरवाडी, मांगडे वाडी येथील शाळेमध्ये संस्कारवर्गास सुरुवात.





उज्वल भवितव्यासाठी

## ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी,

पुणे ४११ ०३७.

टेलिफोन क्रमांक : ५१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये

नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -

ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१

कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :

पी एन् / ६५ / डी २० / १९९६-९७ दिनांक २३-६-९६

१-४-९६ ते ३१-३-९९ या कालावधीसाठी आयकर सवलत प्राप्त



## संत नामदेव

कीर्तनी रंगला । विठ्ठली रमला
संत हा आगळा । नामदेव ।।
सगुणाचे संगे । निर्गुण पावला
परी तो गुंतला । भजनात ।।
भावबळे ज्याने । आकळिला हरि
झाला तो कैवारी । सर्वकाळ ।।
संसारी असूनी । अलिप्त राहिला
भार तो टाकिला । विठूवरी ।।

मायबाप तोचि । तोचि सर्व काही
पुरवी विठाई । कोड त्याचे ।।
पंढरीचा राणा । होऊन चाकर
शाकारिले घर । वादळात ।।
विठ्ठल प्रेमाचा । वारसा घेऊन
जन्मासी येऊन । धन्य झाला ।।
संतश्रेष्ठ ऐशा । वंदू नामदेवा
भक्तिचा हा ठेवा । अमोलिक ।।

**सौ. प्रभा टेंभेकर**



प. द्र. र. नं. A 1391

# श्री स्वामी जगद्‌गुरु शंकराचार्य पीठ करवीर

**२२९९ डी वॉर्ड, शुक्रवार पेठ, कोल्हापूर**

आवक नंबर

तारीख - २।३।१९९८

प्रति,
श्री. भा. वा. सातवळेकर,
ओंकार ट्रस्ट,
पुणे.

आपल्या ट्रस्टतर्फे 'कल्याण' मासिकाच्या अंकाद्वारे, श्री नामदेव महाराज विशेषांक प्रसारित करत आहात. 'नाचू कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लावू जगी।' अशी मनो भूमिका घेऊन अवघे जीवन सार्थकी लावणारे श्री नामदेवराय हे एक अलौकिक महापुरुष! 'नामदेव म्हणे आम्ही पायरीचे चिरे। संत हिरे वर पाय देती।' म्हणून श्री विठ्ठलाच्या महाद्वारी सर्व कुटुंबीयांसह समाधी घेणारे आद्य विठ्ठलभक्त। अशा श्री नामदेव महाराजांच्या चरणी शतशः प्रणाम आणि आपल्या या विशेषांकाला अनंत आशीर्वाद,

लेखन सीमा।

विद्याशंकर भारती स्वामी
श्री जगद्‌गुरु शंकराचार्य
करवीर पीठ कोल्हापूर
४१६००२




॥ श्री कृष्ण ॥ ॐ तत् सत् ॥ ॥ ॐ श्री सद्गुरवे नमः ॥

# श्री सद्गुरु विश्वनाथ महाराज रुकडीकर ट्रस्ट, कोल्हापूर.

(संस्था नोंदणी क्रमांक महाराष्ट्र / एफ ३२४८ / कोल्हापूर दिनांक ७/६/१९८५)
पद्मा हौसिंग कॉलनी क्र. १ रेसकोर्स, जयप्रभा स्टुडिओजवळ, कोल्हापूर - ४१६०१२ फोन : ६२७२८२

दि. २४·२·९८



प्रति,

श्री· भा·बा· सातवेळकर

ओंकार ट्रस्ट

पुणे·



सप्रेम नमस्कार वि·वि·

आपल्या ओंकार ट्रस्ट तर्फे दरवर्षी 'कल्याणी' या नावाने एक 'संत विशेषांक' काढला जातो· या वर्षी 'संत श्री नामदेव महाराज विशेषांक' प्रसिध्द करीत आहात·



संत श्री नामदेवराय म्हणजे भगवतनामानेच धारण केलेले सगुण साकार गोजिरं रूप। अशा नामदेवरायाच्या जीवन कार्यावर विशेषांक निघत आहे ही अतिशय आनंदाची आणि समाधानाची गोष्ट आहे.



आपल्या ह्या उपक्रमास माझ्या अनंत शुभेच्छा आणि श्री सद्गुरु विश्वनाथ महाराजांच्या चरणीं आशिर्वादासाठी प्रार्थना करीत आहे। त्यांतून सर्व नामभक्त मा[illegible] कळावे



(लोभ वृध्दिंगत व्हावा), आपला गुरुबंधी

दादा [illegible]





तैसीं बांधलीं सोडित । बुडालीं काढित ।
साकडीं फेडित । आर्ताचिया ॥



# संपादकीय

संत आनंदाचे स्थळ । संत सुखचि केवळ । नाना संतोषाचे मूळ। ते हे संत ।। श्रीराम ।। दासबोधातील या ओवीमध्ये संत सहवास किती आनंददायी आहे याचे यथार्थ वर्णन केले आहे. सद्य परिस्थितीमध्ये संत सहवास प्रत्यक्ष लाभणे अवघड आहे. परंतु संत साहित्याद्वारे आपण त्यांच्या जवळ जाऊ शकतो. त्यांच्या सहवासाचा आनंद मिळवू शकतो. महाराष्ट्राच्या समाज जीवनात संत ज्ञानदेव, संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकाराम व संत रामदास या पाच संतकवींचे कार्य अद्वितीय असे आहे. शतकानुशतके या संतांची अमृतवाणी महाराष्ट्रीय मनाला संजीवनी देत आलेली आहे. हे पाच संत महाराष्ट्राचे पंचप्राण आहेत. या संत पंचकांचा प्रवेश झाला नाही असे एकही घर मिळणार नाही. आजपर्यंत कल्याणीने या पाचांपैकी चार संतांच्या साहित्य पुष्पाचे मधुघट वाचकांच्या समोर ठेवलेले आहेत. आता आजचे हे सातवे साहित्य पुष्प श्रीसंत नामदेव चरणी अर्पण करताना आम्हाला अपरंपार आनंद होत आहे. ईश्वरकृपेने संत पंचकांचे संदेश वाचकांना पोचविण्याची प्रेरणा आम्हाला मिळाली हे आमचे सद्‌भाग्यच आहे.

श्रीज्ञानेश्वर माऊलींच्या समकालीन असणाऱ्या संत श्रेष्ठींच्यापैकी सगुण भक्तीचा परमोच्च आविष्कार असणारे संत नामदेव महाराज हे महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातच नव्हे तर साऱ्या भारतभर ज्ञात आहेत. विठ्ठल भक्तीचा वारसा असणाऱ्या घरामध्ये जन्म झालेला असल्यामुळे लहानपणापासूनच त्यांना विठ्ठल भक्तीची गोडी होती. लहान असताना विठ्ठलाने नैवेद्य खाल्लाच पाहिजे म्हणून हट्ट करणारे व विठ्ठल माऊली बधत नाही असे पाहिल्यावर दगडावर डोके आपटून आत्मघात करण्याची धमकी देणारे नामदेवांचे बालरूप आणि ज्ञानेश्वर माऊलींच्या बरोबर भ्रमणासाठी पंढरपूर सोडून जाण्याची वेळ आली तेव्हा विठोबाच्या वियोगाने व्याकुळ झालेले नामदेव म्हणजे शुद्ध सगुण भक्तीचे निरागस रूप होय. पांडुरंगाच्या परवानगीनेच महाराष्ट्राबाहेर पडून कीर्तनाद्वारे नामसंकीर्तनाचा महिमा गात भारतभर ज्ञानाचा दीप प्रज्वलीत ठेवून समाज प्रबोधन करणाऱ्या सर्व संतांच्यामधे नामदेव महाराजांचा पहिला नंबर लागतो. भागवत धर्म व वारकरी पंथाची पताका त्यांनी नुसती अटकेपारच नेली असे नाही तर ती त्या ठिकाणी रोवली व रुजवली. म्हणूनच आजसुद्धा उत्तर भारतामधे त्यांची मंदिरे व अनुयायी दिसून येतात. 'गुरुग्रंथ साहेबा' मधे त्यांचे समाविष्ट केलेले एकसष्ट अभंग हे पण त्याचेच प्रतीक होय.

लौकीक विद्येचा स्पर्श नसूनसुद्धा हजारोंनी अभंग लिहिणारे नामदेव महाराज म्हणजे सरस्वतीच्या मंदिरातील काव्य साहित्याचा गंगौघच आहे. संत तुकाराम महाराजांच्या अभंगांचे मूळ संत नामदेव महाराजांच्या अभंगामध्ये मिळते म्हणून ज्ञानाचा एका तसा नामाचा तुका असे म्हणण्याचा प्रघात पडला.

'कोरडी कां खाता रोटी । मागे परता जगजेठी ।।'

असे म्हणून कुत्र्याच्या मागे तुपाची वाटी घेऊन धावणारे नामदेव महाराज म्हणजे 'शीव भावे जीव सेवा' याचा उत्कृष्ट नमुनाच आहे.

हेचि देवा पै मागत । चरण सेवा अखंडीत ।।
वास द्यावा पंढरीचा । सदासंग हरीदासाचा ।।
जन्म हो का भलते याती । परी मी न चुके हरीभक्ति ।।
नामा म्हणे कमलापती । हेचि द्यावे पुढतों पुढती ।।

अशा तऱ्हेने मोक्षाची तर नाहीच पण कोणतीही अपेक्षा न ठेवता जन्मोजन्मी हरीभक्ति व संत संगतीची इच्छा करणाऱ्या संत नामदेवांना त्रिवार वंदन.

आम्ही उत्कृष्ट अंक आपल्या हातात ठेवू शकतो याचे सर्व श्रेय आपले अनमोल लेख देऊन आम्हाला उपकृत करणाऱ्या विचारवंत लेखकांना जाते. तेव्हा त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

त्याचप्रमाणे ज्यांच्या सहकार्याने हा अंक निघू शकतो अशा सर्व जाहिरातदारांचे, लेखकांचे आणि अंक काढणेसाठी हस्ते परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे पुनरावृत्ती होत असली तरी आभार मानल्याशिवाय रहावत नाही. या सर्वांचे आम्ही सदैव ऋणी आहोत.

वाचकांचा प्रतिसाद, हितचिंतकांच्या सदिच्छा या बळावरच आमच्या ओंकार न्यासाची यशस्वी वाटचाल सुरू आहे. न्यासाच्या उज्ज्वल प्रगतीची वाटचाल अंकामध्ये स्वतंत्रपणे समाविष्ट केली आहे.

जय जय रघुवीर समर्थ

**सौ. रजनी काळे**




ओंकार ट्रस्ट १९९८ च्या **"श्री संत नामदेव महाराज"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.

टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** असून तो विनामूल्य आहे.

(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखांशी संपादक सहमत असतीलच असे नाही.



# अनुक्रमणिका



# कविता

## नामदेवा तुम्ही

नामदेवा तुम्ही थोर
संत कवी साक्षात्कारी
पाषाणाच्या विठोबाला
जेवविले पोटभरी
निराधार जनाईला
दारी दिलात आसरा
गोणाईला भक्ती आणि
दिला कवितेचा झरा
ज्ञानेश्वरांचे चरित्र
अभंगातून गाईले
म्हणोनिया सामांन्यांना
ज्ञानदेव समजले
'गुणी गुणं वेति' हेच
नामा तुम्ही सिद्ध केले
ज्ञानदेव भेटी आले
तेव्हा लोटांगण घातले
बहिणाबाईने म्हटले
'नामा तयाचा किंकर'
केला भक्तीचा प्रसार
नामा विठूचा अवतार
पंजाबात 'ग्रंथसाहेब'
त्यात तुमची चार पानं
भरली विहीर जलाने
राजस्थानी तुम्हा मान
दीप ज्ञानाचा लाविला
केला कीर्तन जागर
नेला भागवत धर्म
ओलांडुनी सीमापार

सौ. सुखदा ऋषी
चंद्रिका सोसायटी, बिबवेवाडी, पुणे ३७.

## नामयाची पायरी

नामयाची पायरी मी पंढरीच्या मंदिरी
दुःख माझे जाणतोना तो विठूही अंतरीं ॥ धृ ॥
सर्वस्व माझे लावुनी पणास
जिवंत करूनी मीच पत्थरास
जेवु घातले आणि ईश्वरास
राहिले सर्व कां हे पोथ्या पुराणांतरी ॥ १ ॥
येतात लाखो भक्त पंढरीला
करितात स्नान चंद्रभागा नदीला
पुनित होवुनी जाति दर्शनाला
ओलांडती कां हे पाषाण पायरी ॥ २ ॥
ज्या नामयाने सर्वस्व अर्पुनी
देव दाविला तो पत्थरांतुनी
त्या आत्म्याच्या अंतरी अजुनी
राहिली खंत ही युगा युगांतरी ॥ ३ ॥
मूक पायरीची या नाही दुजी मागणी
पुनित पावलांनी जावे मला स्पर्शुनी
प्रभू राम जैसे त्या शिळेला स्पर्शुनी
उद्धरून गेली ती अहिल्या वनांतरी ॥ ४ ॥

वि. आ. कुलकर्णी
यशोधन सोसायटी, बी -२, फ्लॅट नं. १२,
चिंतामणीनगर - २, बिबवेवाडी, पुणे ३७.

**मुखपृष्ठ व चित्रे**
सौ. अंजली व अभय पुरंदरे

**अक्षरजुळणी छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

**व्यवस्थापकीय सहकार्य**
शाम देऊळकर
अनंत सर्व्हीसेस, पुणे ३८.

**प्रोसेसिंग**
फिक्सेल ग्राफिक्स प्रा. लिमिटेड,
शनिवार पेठ, पुणे - यांच्या सौजन्याने.

# आरती श्रीनामदेवाची

**डॉ. व. दि. कुलकर्णी**
एम्.ए. पीएच. डी.

१६ वर्षे २ महाविद्यालयात प्राध्यापक. निवृत्त विभागप्रमुख, मुंबई विद्यापीठ. १२ वर्षे ग्रंथसंपदा - समीक्षा - महानुभाव पंथ, अर्वाचीन वाङ्मय-इतिहास, चरित्र आत्मचरित्र इ. संपादक - श्रीगुरुसेवा त्रैमासीक. पुरस्कार - महाराष्ट्र राज्य ग्रंथ पुरस्कार, इचलकरंजी फाऊंडेशन, अखिल भारतीय महानुभव परिषद, मुंबई, मराठी साहित्य संघ, महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, मराठी ग्रंथालय, पुणे, कालिका प्रकाशन मडगाव, याज्ञवल्य आश्रम, पुणे इत्यादी.

जन्मतां पांडुरंगें । जिव्हेवरी लिहिलें । अभंग शतकोटि - प्रमाण कवित्व रचिलें ।। १ ।।

जय जया जी भक्तराया । जिवलग नामया । आरती ओवाळितां। चित्त पालटे काया ।। ध्रु.।।

ध्यावया भक्तिसूत्र । पांडुरंगें अवतार। धरूनिया तीर्थमिषें ।

केला जगाचा उद्धार ।। २ जय. ।।

प्रत्यक्ष प्रचीती हे । वाळवंट परिस केली। हारपली विषमता ।

द्वैतबुद्धी निरसली ।। ३ ।। जय. ।।

समाधी महाद्वारीं । श्रीविठ्ठल चरणीं । आरती ओंवाळीतो ।

परिसा कर जोडूनी ।। ४ ।। जय जयाजी भक्तराया. ।।

श्रीसंत नामदेवरायांची ही आरती परिसा भागवत यांनी गायलेली आहे. परिसा भागवत हे नामदेवांचे पहिले शिष्य. हे विद्वान ब्राह्मण पंढरपूर-क्षेत्री राहत. श्रीरुक्मिणी मातेच्या मंदिरात ते 'भागवता'वर पुराण सांगत आणि 'भागवतपरिसा' म्हणजे 'भागवत ऐका' असं सर्वांना सांगत, म्हणून त्यांचं नाव 'परिसा भागवत' असंच रूढ झालं. त्यांचं खरं नाव 'परसो भाग्यवंत' असं असावं. ब्राह्मण हा सर्व वर्णांत श्रेष्ठ ('वर्णांना ब्राह्मणो गुरुः') या कल्पनेनं आणि आपण विद्वान पुराणिक या भावनेनं त्यांच्या ठिकाणी अहंकार दाटून राहिला होता. संत श्रेष्ठ श्रीनामदेवरायांना ते मानीतही नसत. पण योगायोगाने नामदेवरायांनी त्यांचा अहंकार दूर केला. परिसा भागवत हे नामदेवाचे शेजारी होते. नामदेव हे यातिहीन व ज्ञानहीन म्हणून ते त्यांची हेटाळणी करीत. पण श्रीरुक्मिणीमातेने आपल्या मायेने त्यांना नामदेवांची महती पटवली. परिसा भागवत नामदेवांना शरण गेले आणि त्यांचे अनन्य भक्त झाले.

परिसा भागवतांनी अभंगरचना केली आहे. त्यातील एका अभंगात त्यांनी श्रीज्ञानदेव, श्रीनामदेव आणि श्रीचांगदेव या तिन्ही मूर्ती 'एकच' आहेत, असे उद्‌गार काढले आहेत.

'ज्ञानीं ज्ञानदेव ध्यानीं नामदेव । भक्तीं चांगदेव पुढारले ।
या तिन्ही मूर्ति एकची पैं असती । याची कांही भ्रांति न धरावी ।।
परिसा म्हणे जैशा सरिता सागरीं । तैसे ते श्रीहरी मिळोनि गेले ।।

श्रीज्ञानदेव, श्रीनामदेव, श्रीचांगदेव ही मूळ विष्णूचीच रूपे. ती शेवटी विष्णुरूपात - श्रीहरिरूपात मिळून गेल्याचा प्रत्यय परिसा भागवतांना येतो.

पैल मेळा रे कवणाचा । नामा येतो केशवाचा ।।

पंढरीचा वैष्णव-मेळा हा केशवाच्या-नामदेवाचा आहे, असा प्रत्यय त्यांना येतो.

परिसा भागवतांच्या अभंगात त्यांच्या नामदेवावरील भक्तिभावाचे उत्कट दर्शन घडते. नामदेव आणि श्रीविठ्ठल ते एकरूपानं पाहतात.

परसा म्हणे नाम्या मीं तुज देखिलें । प्रत्यक्ष विठ्ठलें ऐसी जाण ।। १ ।।
तूंच तूं विठ्ठल तूंच तूं विठ्ठल । हाचि सत्य बोल जाण आम्हां ।। २ ।।
तुवां पदे केलीं राऊळें सांगितली । येरी कवित्वें केली आपल्या मतें ।।३ ।।
तूं शिंपी नामा आम्ही उत्तम याती । वायां अहंवर्ती पडलो देखा ।। ४ ।।
आम्ही एक आपुलें दृष्टीनें देखिलें । देवभक्त झाले दोन्ही एक रूप ।। ५ ।।
तुझें नाम जपतां महा पातकें जाती । तेणें होय मुक्ती म्हणे परसा ।। ६ ।।

श्रीविठ्ठल हा देव आणि त्याचा भक्त श्रीनामदेव हे दोन्ही एकच झाल्याचे - देवभक्त एकरूप झाल्याचे - परिसा भागवतांच्या अनुभवास आले. हीच अनुभूती आणखी उत्कटत्वानं त्यांनी ज्या अभंगात गायली तो अभंग पहा -

कवित्वापरीस कवित्व आगळें पै आहे ।
परि ते न कळे सोय नामयाची ।। १ ।।
नाम बरवें, नामदेव बरवा ।
एकत्व बरवा परमात्मा ।। २ ।।
दुधावरील साय तें मी वाणूं काय ।
तैसें गाणें गाय नामदेव ।। ३ ।।
नामा तोचि कुडी, केशव तोचि देव ।
तेथील अनुभव परिसा म्हणे ।। ४ ।।

परिसा भागवतांनी श्रीनामदेवांचे पूर्वावतारही एका अभंगात व्यक्त केले आहेत.

कृतायुगीं नामा प्रल्हाद पैं झाला । स्तंभीं अवतरला नारायण ।। १ ।।
त्रेतायुगीं नामा अंगद कपि असे । रामचंद्रें त्यासी आलिंगिला ।। २ ।।
धन्य तो नामा, धन्य तो नामा । पढिये पुरुषोत्तमा जीवाहुनी ।। ३ ।।
द्वापारीं नामा उद्धव गहन । नारायण क्षण न विसंबे ।। ४ ।।
कलियुगीं नामा संत साकार । न कळे तो पार ब्रह्मादिकं ।। ५ ।।
चहूं युगीं नामा वेगळा नाही झाला । म्हणवूनी पुरला नारायण ।। ६ ।।

विष्णुदास नामा केशवीं रंगला । देव आला झाला म्हणे परसा ।। ७ ।।

परिसा भागवत श्रीनामदेवांच्या भक्तिभावावर त्याच्या विठ्ठलप्रेमावर, त्यांच्या कवित्वावर उचंबळून बोलताना दिसतात. श्रीनामदेवांचं कवित्व म्हणजे 'टांकसाळीचें नाणें' असे परिसा भागवतांनी म्हटलं आहे. टांकसाळीचं नाणं हे हुकमी असतं; सर्वत्र ते हक्कानं चालतं, त्याला कुणीही नाकारू शकत नाही; तसं नामदेवांचं 'गाणं' हे अधिकाराचं, सामर्थ्ययुक्त असं 'भक्ति-गाणं' आहे.

असे हे नामदेवरायांचे अनन्यभक्त परिसा भागवत आपल्या गुरुरायांची भावभक्तीनं आरती गात आहेत -

'विठ्ठलानं नामदेवाच्या जिभेवर त्याच्या जन्मक्षणीच शतकोटी अभंगांचं प्रमाण लिहून ठेवलं होतं. ईश्वर आपल्या भक्ताला एकेक जीवितकार्य नेमून देतो; नामदेवांनी शतकोटी अभंग पुरे करावेत हे कार्य देवांनी नेमून दिलं होतं. (हे कार्य पुरं झालं नाही; ते पुढं श्रीतुकारामांकडून पुरं करून घेण्यासाठी श्रीविठ्ठल हे नामदेवांना घेऊन तुकारामांना स्वप्नात भेटले.) नामदेव हे स्वतः पांडुरंगाचे अवतार; ते भक्तीचं निमित्त करून सृष्टीत अवतरले. तीर्थयात्रेच्या मिषानं सर्वत्र भक्तिसूत्र त्यांनी गुंफलं. सर्वजण भक्तिरसानं एकजीव झाले. पंढरीचं चंद्रभागेचे वाळवंट भक्तिपरीस झालं. तिथं येईल तो जीविताचं सोनं होऊन राहिला. सारा भेद मिटला. अभेद एकत्व प्रकटलं. नामदेवांच्या कृपेनं कायापालट, चित्तपालट झाला. नामदेवांनी सर्वांना 'नामजप' दिला आणि स्वतः 'नाम हाच देव' अशा अभेद-भावानं ते श्रीविठ्ठल चरणी समाधिस्थ झाले.'

आज पंढरीत श्रीविठ्ठल मंदिराच्या महाद्वारी पहिल्या पायरीवरच श्रीनामदेवांची समाधी आहे. या पायरीला नमस्कार करूनच भक्त भागवत श्रीविठ्ठल मंदिरात प्रवेश करतो. 'भागवत पुराण' हे भक्तितत्त्वाचं पुराण आहे. भगवंताच्या भक्तीचं माहात्म्य त्यात गायलं आहे. जन्मभर 'भागवत' सांगूनही कोरडा राहिलेला 'परिसा भागवत' अखेर श्रीनामदेवरायाच्या भक्तिगंगेत न्हाऊन निघाला आणि अंतर्बाह्य भक्तिमय झाला; नामदेवरायांची आरती गाऊ लागला.

जय जया जी भक्तराया । जिवलग नामया ।
आरती ओवाळिता । चित्त पालटे काया ।। धृ. ।।

डॉ. व. दि. कुलकर्णी
१५, वृंदावन सोसायटी,
७५९/१२६ बी, प्रभात रस्ता
पुणे ४११ ००४.



# नामदेवांचे कौटुंबिक जीवन

**डॉ. सुशीला पाटील**

एम. ए. मराठी, पी.एचडी,
एम. ए. इतिहास

मराठी विभाग प्रमुख शासकीय विदर्भ महाविद्यालय अमरावती १९६३ पासून मराठीचे अध्यापन. प्रकाशित पुस्तके - आधुनिक मराठी साहित्यातील कर्ण, यज्ञ, संभवा, भूमिसंभवा, ज्ञानदेवांचे व्यक्तिमत्त्व (पी. एचडी प्रबंध) बोली अरूपाचे रूप, आदिशक्ती मुक्ताई १५० लेख वाङ्मयीन नियतकालिकांतून संशोधनपर रसग्रहण. फुले-आंबेडकर पुरस्कार १९९४, प्रा. मं. ग. नातू पुरस्कार १९९६.

ज्ञानदेवांनी पायाभरणी केलेल्या भागवत धर्माची पताका पंजाबपर्यंत पोहोचविणारे नामदेव विठ्ठलाचे निस्सीम भक्त होते. हातात टाळ घेऊन विठ्ठलनामाचा गजर करीत देवाच्या दारी अहर्निश नाचण्यात ते दंग असत. त्यांची भक्ती क्रमशः अधिकाधिक प्रगल्भ होत गेली. प्रारंभी नेणत्या वयात 'विठ्ठलाने नैवेद्य खाल्लाच पाहिजे' असा आग्रह धरणारे ते बालभक्त होते आणि पुढे संतमंडळींबरोबर तीर्थयात्रेस जाण्याच्या वेळी 'पंढरीनाथाला सोडून मी यात्रेला येणार नाही', असे म्हणणारे नामदेव वयाने प्रौढ झाले तरी भक्तीच्या स्तरावर बालभक्तच राहिले होते. पण तेच बालभक्त नामदेव नंतर ज्ञानदेवांच्या सतत सहवासाने आणि विसोबा खेचरांच्या गुरुपदेशाने ज्ञानी भक्त झाले. प्रत्येक जीवमात्रात त्यांना परमेश्वर दिसू लागला. पंढरपूरच्या सगुण साकार स्थलकालबद्ध विठ्ठल मूर्तीवरून त्यांची भक्ती अशी अणू-रेणूत व्यापलेल्या निर्गुण निराकार परम तत्त्वापर्यंत पोहोचली. 'जे जे भेटिजे भूत ते ते मानिजे भगवंत' ही त्यांची स्थिर निष्ठा झाली आणि म्हणूनच त्यांच्या शिदोरीतली पोळी पळवणाऱ्या कुत्र्याच्या मागे 'देवा, तुम्ही कोरडी पोळी कशी खाणार?' - असे म्हणून तुपाची वाटी घेऊन नामदेव धावले. नामदेवांच्या भक्तिमार्गावरील या प्रवासात त्यांचे कौटुंबिक जीवन गौण होते. तरी पण ते त्यांच्या गाथेत प्रतिबिंबित झाले आहे.

नामदेव हे मराठीतील पहिले आत्मचरित्रकार म्हणावे लागतील. त्यांच्या आत्मचरित्रपर अभंगात अलौकिकात रमणारे नामदेव जसे दिसतात तसेच त्यांचे गृहजीवनही दिसते. कुटुंबातील व्यक्तींची नामदेवांप्रत प्रगट झालेली तळमळ या अभंगातून प्रगटते. गोणाई-दामाशेटीचा पुत्र, राजाईचा पती, नारा-महादा यांचा पिता म्हणूनही नामदेवांचे दर्शन होत राहते. पण कुटुंबातील कोणत्याही नात्यापेक्षा विठ्ठलाशी जुळलेले त्यांचे भावभक्तीचे नाते अधिक दृढ होते आणि म्हणून ते मोलाचे होते असे म्हणावेसे वाटते.

वयाच्या अकराव्या वर्षी गोविंदराव शेटी सदावर्ते यांच्या मुलीशी - राजाईशी त्यांचे लग्न झाले. परंतु विठ्ठलमय नामदेवांचे चित्त संसारात कधीच गुरफटले नाही. वडिलोपार्जित शिंप्याच्या व्यवसायातही त्यांचे मन रमले नाही. ते म्हणतात -

'सिंपियाचे कुळी जन्म माझा जाला । परि हेतु गुंतला सदाशिवी । रात्रि माझी सिवी दिवसामाजि सिवी । आराणूक जीवी नोव्हे कदा । सुई आणि सुतळी कात्री गज दोरा । मांडिला पसारा सदाशिवी । नामा म्हणे सिवी विठोबाची अंगी । म्हणोनिया जगी धन्य जालो ।'

- आपला परंपरागत व्यवसाय, संसार आणि सारे लौकिक जीवनच नामदेवांनी सदाशिवाच्या ठायी समर्पित केले होते. त्यात त्यांना आनंद होता, पण त्यांच्या कुटुंबियांना मात्र समाधान नव्हते. आई गोणाई, पत्नी राजाई आणि वडील दामा शेटी या साऱ्यांनीच नामदेवांना ईश्वर भक्तीकडून संसाराकडे वळवण्याचा आटोकाट प्रयत्न केला. पण नामदेवांच्या ईश्वरनिष्ठेपुढे त्या साऱ्यांचे प्रयत्न विफल ठरले. त्यांच्या अनुनयाने नामदेव जराही विचलित झाले नाहीत. उलट - 'इष्ट मित्र बंधू सज्जन सोयरा माझिया संसारा हाचि एक' ही त्यांची विठ्ठलश्रद्धाच अधिक दृढ होत गेली. विठ्ठलाचे त्यांना क्षणभरही विस्मरण होत नसे.

'आसनी शयनी न विसंबे भोजनी । घालीन मुरडोनि हृदयामाजि ।'

संसारात रमण्याऐवजी विठ्ठलभक्तीतच ते अधिक रमत.

ते म्हणतात -

'या देवासी भेटी जन्ममरण तुटी मावळली गोष्टी संसाराची ।' देवाच्या भेटीत त्यांना मोक्ष लाभला आणि त्यांच्या दृष्टीने संसार मावळला. देवाचे त्यांना वेड लागले. आई, वडील, पत्नी आणि इष्ट मित्र या सर्वांनी नामदेवांच्या 'देवपिसे'पणाबद्दल नाराजी व्यक्त केली. संसार सांभाळून फावल्या वेळी नामदेवांनी भक्ती करावी असे त्यांचे सांगणे होते. पण नामदेवांना देवाचा विसर जराही पडत नव्हता. परिणामी त्यांना लौकिकाची किंचितशीही ओढ नव्हती.

त्याऐवजी -

'विठोबा माऊली शब्द माझा कानी पडता तत्क्षणी येतसे टाकोनी झेपावत ।' विठोबाच्या अशा भरभक्कम आधाराने ते स्वस्थ होते. विठ्ठलाच्या रूपात त्यांना - 'मायबाप सखा जिवलग सोइरा' भेटला होता. त्यामुळे स्वाभाविकच जवळच्या नातलगांकडेही त्यांचे दुर्लक्ष होत होते. आपल्या भक्तीभावात ते मग्न होते. सांसारिकतेवर मात करणारी नामदेवांची ही भक्ती पाहून त्यांच्या आई-वडिलांना आणि पत्नीला त्यांची काळजी वाटत होती. त्यामुळे नामदेवांना सांसारिक समज देण्याचा त्यांनी वारंवार प्रयत्न केला.

आई गोणाईच्या - 'सांडि देवपिसे नको करू ऐसे । बळे घर कैसे

बुडविसी ।' - अशा प्रश्नाला ते उत्तर देत नसत. तेव्हा गोणाई समजुतीच्या स्वरात नामदेवांना म्हणायची -

'कापड घेऊनी जाय बाजारासी । गोणाई नाम्यासि शिकवितसे ।
लोकांचे हे पुत्र संसार करिती । आमुची फजिती केली नाम्या ।
नाम्या विठोबाचा संग नव्हे बरा । मैंद हा खरा गळा कापू ।
याचे संगतीने संसार जाळावा । भोपळा हा घ्यावा भीक मागू ।
नको संग धरू नाम्या ऐक गोष्टी । गोणाई हनुवटी धरूनि सांगे ।'

पण नामदेवांना आईचे हे शब्द जणू ऐकूच जात नसत. 'जीवि विठ्ठलाचा छंदु' घेतलेल्या नामदेवांची अवस्था 'लौकिक व्यवहार नाठवेचि काही' अशी होत असे. मुलगा ऐकत नाही हे पाहून गोणाई अनेकदा पंढरीनाथावर खवळायची. त्याला बोल लावायची.

'माझे बाळ तुझ्या दर्शनासी आले । ते त्वा भुलविले केशिराजा ।
रात्रिदिवस तुझ्या नामाचा रे छंदु । गोविंद गोविंद म्हणतसे ।
तान्ह भूक विसरला पिसार पै झाला । नोळखे मजला काय करू ।'

गोणाई हताश होते, आणि -

'माय दुखवुनि मोहिसी बालके । देवपण निके कैसे तुझे ।'

असा विठ्ठलाला प्रश्न विचारते. स्वतःच्या दयनीय अवस्थेकडे विठ्ठलाचे लक्ष वेधून घेते.

'अगा ये विठोबा पाहे मजकडे । का गा केले वेडे बाळ माझे ।
तुझे काय खादले त्वा काय दिधले । भले दाखविले देवपण ।'

विठ्ठलाला गोणाईचे खोचक बोलणे समजते आणि -

'तुझ्या नाम्याला तू घेऊन जा', असे विठ्ठल म्हणतो.

'नेई आपला नामा काय चाड आम्हा । जरी आहे तुज प्रेम ममत्वाचा ' गोणाई खूष होते. नाम्याला घेऊन घराकडे निघते. थोड्या अंतरावर गेल्यानंतर मागे वळून पाहते तो नाम्याच्या जागी विठ्ठल दिसतो. तेव्हा ती पुन्हा चिडते.

'माझा नामा मज देई । जीव देईन तुझे पायी ।
पुंडलिका भुलविले । तैसे माझे बाळ केले ।
ते गा न चले मजपासी । दे गा माझ्या नामयासी ।
तुज संगती जे लागले । ते त्वा जितेची मारिले ।
विठ्ठल म्हणे गोणाई आपुला नामा घेऊनि जाई ॥'

गोणाई-नामदेव, गोणाई-विठ्ठल असे संवाद नामदेवांनी अभंगात रंगवले.

'देव जाला नामा नामा जाला देव । गोणाईचा भाव पाहावया ॥' शेवटी गोणाईला नामदेव आणि विठ्ठल यांच्यातील एकरूपता जाणवते आणि तिची विरोधाची धार बोथट होते.

वडील दामाशेठी देखील नामदेवांना विठ्ठलभक्तीच्या समाधीतून सावध करण्याचा प्रयत्न करतात.

'बोले दामा सेठी । नाम्या ऐकावी हे गोठी ।
पाहे संसाराची सोये । हाटा बाजारा सि जाये ।
कुटुंब चालवणे तुज । वृद्धपण आले मज ।
तुजसाठी नवस केला । सेखी हाचि कामा आला ।
दामा म्हणे नामयासि । किती शिकवावे तुजसि ।'

दामासेठीलाही गोणाईसारखाच नामदेवाच्या भक्तीचा चमत्कार दिसतो. त्यामुळे 'वेर्थ म्या छळिले तुज बाळा ।' असा पश्चात्ताप ते बोलून दाखवतात. त्यांचीही नामदेवांच्या विठ्ठल भक्तीला विरोध करण्याची वृत्ती शेवटी बोथटते.

आई-वडिलांच्या सुरात सूर मिळवून पत्नी राजाईदेखील नामदेवांना भक्तीपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करते. ती म्हणते -

'आई जे शिकवी ती ते तुम्ही नाईका । नाही भय शंका लौकिकाची ।
लावोनि लंगोटी जालेसी गोसावी । आमुची उठाठेवी कोण करी ।'

असा प्रश्न राजाई नामदेवांना विचारते. घरात चौदा माणसे आहेत. त्यांचे कसे होणार हा प्रश्न राजाईला अस्वस्थ करतो. गोणाई-दामासेठी विठ्ठलाकडे तक्रार करतात तर राजाई रखुमाईपुढे आपले गाऱ्हाणे मांडते.

'अहो रखुमाबाई विठ्ठलासि सांगा । भ्रतारासि का गा वेडे केले ।
वस्त्र पात्र नाही खाया जेवायासि नाही । नाचे अहर्निशी निलज्जसा ।
चवदा मनुष्ये आहेत माझ्या घरी । हिंडती दारोदारी अन्नासाठी ।
बरा मार्ग तुम्ही उमजोनि सांगा । नामयाची राजा भली नव्हे ॥'

नामदेवांच्या कुटुंबातील चौदा माणसांची नावे आणि त्यांचे नातेसंबंध जनाबाईने आपल्या अभंगात सांगितले आहेत.

'गोणाई राजाई दोघी सासू सुना । दामा नामा जाणा बापलेक ।
नारा विठा गोंदा महादा चौघे पुत्र । जन्मले पवित्र त्यांचे वंशी ।
लाडाई गोडाई येसाई साखराई । चवघी सुना पाही नामयाच्या ।
निंबाई लेकी आऊबाई बहिणी । पंधरावी ती दासी जनी ।'

जनाबाईसह पंधरा माणसांचे हे कुटुंब ! एवढ्या मोठ्या संसाराची जबाबदारी राजाई मोठ्या धीराने पेलते. कधी कधी ती कातावते. रागावते. आदळ-आपट करते. पण त्यातही संसार उभा करण्याचा प्रयत्न करते. संसाराची चिंता तिला भंडावून सोडते. आपली सांसारिक व्यथा ती अनेकदा बोलून दाखवते.

'खाया ना जेवाया लेया ना नेसाया । दैन्य भोगावया आले जन्मा।' असे म्हणून आपल्या नशिबाला बोल लावते,

'मोडके घर वारा येतो भरभराट । बहु होती कष्ट सांगू कोणा ।' असे ती म्हणते. प्रपंचाचा गाडा नीट चालवण्याकरता नामदेवांनी व्यवसायात लक्ष घालावे असे तिला वाटते. ती पुनः पुनः नामदेवांना सावध करते. एकदा नामदेव तिला म्हणतात,

'पुत्र कलत्र येथे कायसी बापुडी । जेणे रौखकुंडी वास घडे ।
तू जरी म्हणसी सत्य संसारसुख । तरी हे केवळ विख विस्तारले ।'

हा नामदेवांचा स्थिर समज असल्यामुळे त्यांचा एकच व्यवसाय उरतो -

'आम्ही कीर्तन कुळवाडी आणिक नाही उदीम जोडी ।
देवाच्या सख्याचासाठी पडाव्या जिवलगासि तुटी ।'

असा नामदेवांचा निश्चय आहे आणि म्हणूनच राजाई त्यांना म्हणते - 'सर्वस्व सांडोनि धरीला तुम्ही देव ।' राजाईला एकटीला संसाराचा भार पेलवत नाही ती वैतागते. चंद्रभागेत मुलासह जीव

देण्याचा विचार करते.

'एकला मी बाळे काय करू आता । आहा पंढरीनाथा काय केले ।
एक बांधले पाठीसी दुजे बांधिले पोटासी वेणुनादा पासी वाहवत गेली।।'

पण तेवढ्यात विठ्ठलाने त्या सर्वांना वाचवले. त्वरित वर काढले. विठ्ठल आपल्याला सुखाने मरूही देत नाही म्हणून राजाई त्याच्यावर रागावते. जमिनीवर डोके आपटते. पुन्हा पाण्यात उडी मारते. परत विठ्ठल तिला बाहेर काढतो. राजाई वैतागून जाते. मुलांना घेऊन घरी जात असताना रस्त्यात तिला एक मेलेला साप दिसतो. मरणाचा आणखी एक विचार तिच्या मनात तरळतो. तो साप ती घरी नेते. त्याला शिजवते. तो आपण खावा नि मुलांनाही खाऊ घालावा म्हणजे आपल्याला मरण येईल आणि या दैन्यावस्थेतून आपली सुटका होईल अशी तिची समजूत असते. पण भांड्यावरचे झाकण काढताच राजाईला आत सोनेच सोने दिसते. ती अतिशय आनंदित होते. सोन्यामुळे संसार सुखाचा होणार, खायला-प्यायला मिळणार म्हणून ती हर्षभरित होते. आनंदातिरेकाने ते कौतुक ती नामदेवांना दाखवते. नामदेवांच्या डोक्यात तिडीक उठते. आपल्यासाठी हिने पांडुरंगाला किती त्रास द्यायचा या विचाराने नामदेव अस्वस्थ होतात. ते सोने ब्राह्मणांना वाटून टाकतात आणि शांतपणे झोपून राहतात. राजाईने थोडे सोने बाजूला काढून ठेवलेले असते. पण थोड्या वेळाने पाहिले तर त्या सोन्याचे कोळसे झालेले तिला दिसतात. राजाईला नामदेवांच्या महानतेचा आणखी एक अनुभव येतो. निद्रिस्त नामदेवांच्या अंतरंगातून 'विठ्ठल विठ्ठल' असा ध्वनी ती ऐकते.

'तव नामदेव निजला देखिला अंतरी उठला विठ्ठल ध्वनी ।
राजाई म्हणे प्रयत्न न चले तेथे आता प्रार्थू पंढरीनाथा बहुतांपरी ।'

शेवटी तीही विठ्ठलभक्तीकडे वळते -

'राजाईने धरिले विठ्ठलाचे पाय । कृपादृष्टी पाहे आम्हाकडे ।'

अशी विठ्ठलाला ती विनवणी करते.

अशा रीतीने नामदेवांच्या भक्तीने त्यांच्या कुटुंबियांना जिंकले. त्यांनी 'देवपिसेपण' सोडावे आणि संसाराकडे वळावे असे म्हणणारे आई-वडील, पत्नी सारेच भक्तिमार्गाला लागले. मुले, सुना, मुलगी, बहीण यांचाही मोहरा विठ्ठलाकडे वळला. 'नारा म्हणे माझ्या बापाचे साधन सापडली खूण अंतरीची' नारा आणि विठ्ठल यांचा संवाद साधू लागला. 'तुज मी अनन्यशरण' असे नारा म्हणतो. याचे कारण म्हणजे 'नारा म्हणे नाम्याने सांगितले बीज तेचि मजसि गुज बोले काही' नामदेवांना लागलेली भक्तिसुखाची आस नारानेही अशी बोलून दाखवली.

'नामयाचा महादा' अशी उपाधी लेवून नामदेवाच्या दुसऱ्या मुलाने महादानेही विठोबापाशी 'भक्तिचा ठेवा' मागितला. तर तिसऱ्या गोंदाने नामदेवचरित्र गायिले. 'भजावे भजन नामयाचे परी' असे म्हणून नामदेवांसारखीच अखंड भजनाची लालसा बाळगली. चौथा मुलगा विठा 'नामयासारखा आणिक कोण आहे ?' असा प्रश्न विचारतो आणि त्याद्वारा नामदेवांचे अद्वितीयत्व अधोरेखित करतो.

नामदेवांची सून लाडाईदेखील भक्तीकडे वळली,

'लाडाई म्हणे देह अर्पीन विठ्ठला । म्हणोनि आदरिला प्राणायाम ।
नामयाची लेकी निंबाई म्हणे । देवा कृपाळू केशवा सांभाळावे '

मुलीबरोबरच बहीणही - ईश्वरमग्न झाली.

'नामयाची बहीण आऊबाई शून्यी सामावली ।
विठ्ठली राहिली चित्तवृत्ती' दासी जनी तर 'नामयाची जनी' म्हणून लहानपणापासूनच विठ्ठलभक्तीत तल्लीन झाली होती. पण अखेर ती दासी होती. नामदेवांच्या कुटुंबियाच्या तुलनेत तिच्या भक्तीची क्वचित उपेक्षा होत असावी. ती म्हणते -

'राजाई गोणाई अखंडित तुझे पायी ।
मज ठेवियले द्वारी नीच म्हणोनि बाहेरी ।
नारा गोंदा महादा विठा ठेवियले अग्रवारा ।
देवा केव्हा क्षेम देसी आपुली म्हणोनि दासी जनी ।।'

असा हा नामदेवांच्या कुटुंबजीवनाचा आलेख गाथेतून रेखाटता येतो. नामदेव संसारात कधी रमले नाहीत. सुख-दुःखात गुरफटले नाहीत. त्यामुळे सांसारिक असूनही त्यांना संसाराचा संग कधी बाधला नाही. सरोवरातील कमलपत्राप्रमाणे लौकिक संसारात ते अलिप्त राहिले. केवळ विठ्ठलभक्तीतून लाभलेल्या जीवनरसाने ते संतृप्त झाले आणि त्यांच्या संतृप्तीच्या छायेत त्यांचे समग्र कुटुंब विसावले !

डॉ. सुशीला पाटील
ज्ञानदीप, राठीनगर, अमरावती - ४४४६०३.

# ॥ 'नामयाची वाणी - अमृताची खाणी' ॥

**डॉ. हे. वि. इनामदार**

एम. ए., एल. एल. बी., पी. एचडी.

'संत नामदेव' या विषयावर सेवानिवृत्त प्राचार्य एस.एन.डी.टी. अध्यक्ष गीता धर्म मंडळ, पुणे. २०-२५ पुस्तके प्रसिद्ध. 'ज्ञानेश्वरी प्रबोध' संपादन. विद्यापीठ पातळीवरील उत्कृष्ट शिक्षक म्हणून राज्य पुरस्कार. विद्यापीठावर मार्गदर्शक अध्यापक.

संत नामदेवांची अभंगवाणी ही पारमार्थिक भावकविता आहे. 'कविता म्हणजे भावनाशील मनाचा उचंबळून आलेला उद्‌गार ' हे वर्णन त्यांच्या अभंगसंपदेला लागू पडते. 'प्रेम - पिसें भरूलें अंगीं । गीतसंगे नाचों रंगीं' असं नामदेव स्वतः सांगतात. त्यांच्या अंतःकरणाचं स्वच्छ प्रतिबिंब त्यांच्या काव्यात उमटलं आहे. स्वतः नामदेव हाच त्यांच्या काव्याचा विषय आहे; त्यांचं काव्य हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचं उघडं गवाक्ष आहे. कवितेमागील कवी पाहण्याची ज्यांना उत्कंठा असेल, त्यांना नामदेवांची अभंगवाणी खचितच आवडेल. त्यांची विठ्ठल भक्ती, नामस्मरण, ज्ञानदेवनिष्ठा, भागवतधर्म प्रचार, भक्तप्रेम अशा विविध विषयांवरील त्यांची अभंगवाणी भावमधुर आणि रससंपन्न आहे. नामदेव-गाथेतील अकरा निवडक अभंगांच्या आधारे त्यांच्या अमृतोपम काव्यसंपदेचा परिचय इथे करून दिला आहे.

### १. विठ्ठल नामाची माधुरी

अमृताहूनि गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे ॥ १ ॥
सांग पंढरिराया काय करूं यासी । कां रूप ध्यानासी न ये तुझें ॥ २ ॥
कीर्तनीं बैसतां निद्रे नागविलें । मन माझें गुंतलें विषयसुखा ॥ ३ ॥
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति । न ये माझ्या चित्ती नामा म्हणे ॥४ ॥

विठ्ठलनामाचा महिमा गाणारे काही अवीट अभंग नामदेवांनी रचले आहेत. त्यामध्ये प्रस्तुत अभंग हा विशेष मधुर आहे. वारकरी-भजनामध्ये हा अभंग आवडीने गायिला जातो. नामदेव म्हणतात, "परमेश्वरा, तुझे नाव अमृतापेक्षाही अधिक मधुर आहे. तरीही माझे मन तुझ्या नामस्मरणाकडे का वळत नाही, हे मला समजत नाही. मी ध्यान-धारणा करू लागतो, तेव्हा तुझी मूर्ती माझ्या डोळ्यांसमोर येत नाही, याचे मला दुःख होते. विठ्ठला, मी काय करावे म्हणजे मला हे जमेल ? तुझ्या नामाचे कीर्तन जिथे चालू असते, तिथे मी जाऊन बसतो. पण कीर्तनात तल्लीन होण्याऐवजी मला डुलकी लागते. झोप आल्यामुळे कीर्तनसुखाला मी वंचित होतो. शारीरिक सुख, उपभोग आणि आसक्ती यांच्या ठिकाणी माझं मन गुंतून पडतं. विठ्ठलाचे भक्त त्याचा नाममहिमा कीर्तनातून मोठमोठ्याने सांगत असतात. पण माझ्या मनाला त्याची ओढ वाटत नाही."

या समग्र अभंगात 'विरोधाभास' या अलंकाराचा सुरेख वापर केलेला आहे. नाम अमृताहून गोड आहे. पण माझे मन नामस्मरण करत नाही. कीर्तनाचा गजर चालला आहे, पण निद्रेने मला घेरले आहे. हरिनामाच्या कीर्तीची गर्जना चालू आहे, पण माझे मन त्याविषयी उदास आहे. या सर्व वर्णनातील छाया-प्रकाशाची मौज लक्षणीय आहे. एकीकडे नामाचे माधुर्य आहे, तर दुसरीकडे मनाचे औदासिन्य आहे. या वर्णनात नामदेवांनी स्वतःकडे कमीपणा घेतला आहे. वास्तविक या अभंगातील 'मी' म्हणजे नामभक्तीविषयी उदासीन असलेला सर्वसामान्य प्रापंचिक माणूस आहे.

### २. पंढरीरायाला विज्ञापना

पंढरीनिवासा सख्या पांडुरंगा । करी अंगसंगा भक्ताचिया ॥ १ ॥
भक्त कैवारीया होसी नारायणा । बोलतां वचना काय लाज ॥ २ ॥
मागें बहुतांचें फेडियेलें ऋण । आम्हांसाठी कोण आली धाड ॥ ३ ॥
वारंवार तुज लाज नाही देवा । बोल रे केशवा म्हणे नामा ॥ ४ ॥

नामदेवांच्या अभंगवाणीत त्यांच्या अंतरीचे उमाळे उमटले आहेत. त्यांचा अभंग हा त्यांच्या भावक्षुब्ध मनाचा उचंबळून आलेला उद्‌गार आहे. उत्कंठा, उत्कटता, अधीरता, आर्तता, अनुताप अशा भावनांच्या प्रवाहात ते सापडले आहेत. पांडुरंगाला आवाहन करणारी त्यांची कविता भावोत्कट आहे. नामदेव विठ्ठलाला साद घालतात; आणि म्हणतात, "श्रीक्षेत्र पंढरी हे पांडुरंगाचं निवासस्थान आहे. हे पंढरीराया ! तू माझा प्राणसखा आहेस; आणि मी तुझा आतुर भक्त आहे. तू मला भेट, क्षेमालिंगन दे. आपण भक्तांचे कैवारी आहोत, त्यांचे पाठीराखे आहोत, असं तुला वाटतं, पण आपलं हे ब्रीद तू पाळत नाहीस; आणि त्याबद्दल तुला कुठलाच संकोचही वाटत नाही. यापूर्वी कित्येक भक्तांवर तू कृपा केलीस. अगदी अजामिळ, अघासुर, बकी आणि पिंगळा अशा दुर्जनांचाही तू उद्धार केलास. मग आमच्यावरच तुझी एवढी अवकृपा का बरं ? आम्हाला तू दर्शन देत नाहीस. तुझ्यावर कोणती धाड भरली आहे ? मी वरचेवर तुझी विनवणी करत आहे. पण तुला त्याची लाज वाटत नाही. आमची तू उपेक्षा करत आहेस. ती कशासाठी, हे सांग बरं ?"

नामदेवांची अभंगवाणी बहुतांशी मृदुमधुर असते. त्यांच्या प्रेमळपणात याचकाची आर्तता, लेकराचा लडिवाळपणा आणि चातकाची अनन्यता असते. पण प्रसंगी ही वाणी परखडही होते. कठोर साधना करूनही देवदर्शन घडेना, तेव्हा त्यांच्या मनानं देवाला बोल लावला. मुंगीच्या गळ्यात मेरू पर्वत बांधावा, तसा प्रकार झाला. ते म्हणाले, "विठ्ठला, मी तुझा दास आहे. मला तू उदास का करतोस ? समर्थांचे बाळ वाकळ पांघरील, तर त्याची लाज कुणाला ? " नामदेवांची पारमार्थिक तळमळ या आणि अशा अन्य काही अभंगांतून प्रभावीपणानं व्यक्त झाली आहे.

**३. भांबावलेली गवळण**

लाजले गे माय आतां कोणा ओवाळूं ।
जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज गोपाळू ॥ १ ॥
ओवाळूं मी गेलें पाय गेलें द्वारके ।
जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज सारिखें ॥ २ ॥
ओवाळूं मी गेले माय सखिया माझारी ।
जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज नरनारी ॥ ३ ॥
ओवाळूं मी गेले माय सारंगधरा ।
जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज परिवारा ॥ ४ ॥
वैजयंती गळां श्रीवत्सलांछन ।
विष्णुदास नामा येणें दाविली खूण ॥ ५ ॥

श्रीकृष्णाच्या अनपेक्षित भेटीमुळं भांबावून गेलेल्या गवळणीचं सुरेख वर्णन या अभंगात नामदेवांनी केलं आहे. श्रीकृष्णाच्या एका सगुण मूर्तीला ओवाळताना, तो परमात्मा सर्वत्र भरून राहिल्याचा प्रत्यय त्या गवळणीला आला आहे. आपली ही संभ्रमावस्था व्यक्त करताना ती म्हणते, ''तबकात निरांजन घेऊन श्रीकृष्णाला मी ओवाळू लागले, तर जिकडं तिकडं त्याचीच चतुर्भुज मूर्ती भरून राहिली आहे, असं मला दिसलं. आता याला कसं आणि किती ठिकाणी ओवाळावं हेच मला समजेना. मी अगदी लाजून गेले. त्या द्वारकेच्या राण्याला ओवाळावं, असं मला वाटलं. पण नुसत्या द्वारकेतच काय, उभ्या विश्वाला तो व्यापून राहिला आहे, याचा मला प्रत्यय आला. माझ्या मैत्रिणींच्या मेळाव्यात मी शिरले आणि कृष्णाला ओवाळायचं ठरवलं, तेव्हा त्याच्यासारखेच चार हात असलेले लोक मला सर्वत्र दिसले. त्या मेळाव्यातील सर्व स्त्री-पुरुष हे श्रीकृष्णासारखेच चार हातांचे आहेत, असं मी पाहिलं. त्या शारंगधराला ओवाळण्यासाठी मी गेले, तेव्हा त्याच्या अवती-भोवतीचे सारेजण त्याच्यासारखेच चतुर्भुज असल्याचं मला दिसलं. त्या कृष्णाच्या गळ्यात वैजयंती माळ शोभून दिसत होती. आपल्या भक्तानं मारलेल्या लाथेची खूण त्यानं प्रेमानं मिरविली होती. त्या खुणेवरूनच असंख्य चर्तुभुज व्यक्तींमधला खरा श्रीकृष्ण कोणता ते मी शोधून काढलं.''

या अभंगातील गोपीची लज्जा, तिची लगबग, कृष्णाविषयीचं तिचं कौतुक, संभ्रमावस्था आणि लज्जेचा भाव या सर्व गोष्टींचं नामदेवांनी केलेलं चित्रण हे सूचक आणि सुंदर आहे. नामदेवांच्या सगुण भक्तीचा हा आविष्कार सरस-रमणीय आहे.

**४. ॥ अपूर्व आत्मविस्मृती ॥**

काळ देहासी आला खाऊं । आम्ही आनंदें नाचू गाऊं ॥ १ ॥
कोणे वेळे काय गाणें । हें तो भगवंता मी नेणें ॥ २ ॥
टाळ मृदंग दक्षिणेकडे । माझें गाणें पश्चिमेकडे ॥ ३ ॥
नामा म्हणे बा केशवा । जन्मोजन्मीं द्यावी सेवा ॥ ४ ॥

समरसतेतील सारं सौंदर्य लेवून नामदेवांची अभंगवाणी प्रगट झाली आहे. व्युत्पन्नतेपेक्षाही प्रेमभावाला प्राधान्य असलेल्या कवित्वाचा नामदेवांनी पुरस्कार केला आहे. विठ्ठलप्राप्ती हे तुकोबाचं ध्येय आहे, तर नामदेव विठ्ठलप्रीतीत तृप्त आहेत. 'रंक होऊनिया पंढरीं चोहटा । राखेन दारवंठा महाद्वारीं ।' असं ते सांगतात. आपल्या मर्यादा त्यांना माहीत आहेत. 'काय म्या बोलावें किती माझी मती । तुम्ही रमापती गोड केलें ।' या जाणिवेतून प्रस्तुत अभंगात नामदेव म्हणतात, ''हा देह नाशिवंत आहे. देहावर काळाची झडप केव्हा पडेल, हे सांगता येत नाही. प्रत्यक्ष यमदूत आमचे प्राणहरण करण्यासाठी आले, तरी आम्ही घाबरणार नाही. अखेरपर्यंत आम्ही आनंदानं कीर्तनात दंग होऊन नाचू आणि गाऊ. हे विठ्ठला ! खरं तर कोणतं गाणं कुठल्या वेळेला म्हणावं, याचं मला ज्ञान नाही. विशिष्ट रागातील पद विशिष्ट वेळेला म्हणायचं असतं असं सांगतात, पण मला याची काहीच माहिती नाही. कीर्तनात माझे टाळकरी साथीदार दक्षिण दिशेला तोंड करून टाळ-मृदुंगाचा नादघोष करतात, तर माझं गाणं पश्चिमेच्या दिशेला चालू असतं. पण या गोष्टीची मला खंत वाटत नाही. माझ्या वेड्यावाकड्या गाण्यातून केशवाची सेवा यथाशक्ती करावी व ती तशी संधी मला पुढील अनेक जन्म मिळत राहावी, एवढीच प्रार्थना आहे.''

नामदेवांची अभंगवाणी ही नेणिवेतील रचना आहे. आपण काव्य करतो याचं भान त्यांना नाही. त्याविषयीची त्यांची आत्मविस्मृती असाधारण आहे. त्यांचं काव्य हे त्यांच्या हळुवार अंतःकरणाचं स्पंदन आहे. 'हासे, नाचे, बोले, स्फुंदतु, डुल्लतु । गातु अहर्निशी नाम तुझें ।' अशी त्यांची स्थिती आहे.

**५. ॥ ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी ॥**

ज्ञानराज माझी योग्यांची माऊली । जेणें निगमवल्लि प्रगट केली ॥ १ ॥
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ॥ २ ॥
अध्यात्म विद्येचें दाविलेंसें रूप । चैतन्याचा दीप उजळिला ॥ ३ ॥
छपन्न भाषांचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव उभारिली ॥ ४ ॥
श्रवणाचे मिषें बैसावें येऊनी । सामराज्य भुवनीं सुखी नांदे ॥ ५ ॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ॥ ६ ॥

ज्ञानेश्वरीचा महिमा व्यक्त करणारा नामदेवांचा हा अभंग केवळ अपूर्व आहे. या अभंगाचा भावार्थ समजून घेतला, तर ज्ञानदेवांच्या भावार्थदीपिकेचे मर्म ध्यानात येते. त्या दृष्टीने प्रस्तुत अभंग अभ्यासणं उपयुक्त ठरेल. 'ज्ञानराज माझी योग्यांची माऊली' असं नामदेव म्हणतात. योगेश्वर ज्ञानदेव सर्व योगीजनांना आईच्या ठिकाणी आहेत. ज्ञानदेव एकीकडं ज्ञानयोगाच्या क्षेत्रातले राजे आहेत; आणि दुसरीकडं भक्तियोगाच्या प्रांतात त्यांना माऊलीची पदवी लाभली आहे. ज्ञानदेवांनी निगमवल्ली प्रगट केली आहे. वेदरूपी वेल त्यांनी सर्वांना दाखविली आहे. संस्कृतमध्ये लिहिलेल्या चारही वेदांतील अवघड तत्त्वविचार मराठी गीताटीका लिहून ज्ञानदेवांनी लोकांना सोपे करून सांगितले आहेत. ज्ञानेश्वरी हा भगवद्‌गीतेचा अलंकार आहे. गीतेवरील हा मराठी भाष्यग्रंथ म्हणजे एक अमोल लेणं आहे. गीता मराठीत मांडताना ज्ञानदेवांनी विदग्ध रसवृत्ती प्रगट केली; आणि अलंकाराचा साज चढवून आपला ग्रंथ आकर्षक केला.

ज्ञानेश्वरीतून ब्रह्मानंदलहरी हेलावली आहे. तिच्यातून आत्मानंदाच्या

लाटा उचंबळून आल्या आहेत. ज्ञानदेवांनी परब्रह्मरसानं मधुर झालेली अक्षरं ओवीछंदात गुंफली आहेत. ज्ञानदेवांनी आपल्या या ग्रंथात अध्यात्मविद्येचं रूप दाखविलं आहे. अध्यात्माची विद्या त्यांनी जणू गोचर स्वरूपात मांडली आहे. परमार्थबोधाचा प्रदेश ज्ञानेदवांनी आपल्या श्रोत्यांसमोर साक्षात् उभा केला आहे. या ग्रंथाच्या रूपानं चैतन्याचा दीप उजळला आहे. अंधाऱ्या रात्री दिवा लावला म्हणजे प्रकाशानं आसमंत उजळून निघतो. ज्ञानेश्वरीही साधकाच्या जीवनात असंच परिवर्तन घडवून आणते. ती साधकांचं अज्ञान दूर करते आणि त्याला चैतन्यतत्त्वाचा साक्षात्कार घडविते. जगात आनंदाचं आवार मांडते. मराठीतील ही गीताटीका लिहून ज्ञानदेवांनी छपन्न देशी भाषांचा गुणगौरव केला आहे. कलिंग, काश्मिरी, मागधी, नेपाळी, केरळी, मल्याळी, सिंहली, कानडी, कनोजी, वंग, गांधारी, कुंतली इत्यादी छपन्न प्राकृत भाषांना प्रतिष्ठा प्राप्त करून देण्याचं कार्य ज्ञानदेवांनी साधलं. गीतेचा भावार्थ मराठीसारख्या एका प्राकृत भाषेत त्यांनी सांगितल्यामुळे सर्वच प्राकृत भाषांचा गौरव झाला. गीतेतील तत्त्वज्ञान मराठीत मांडून ज्ञानदेवांनी सामान्य लोकांसाठी भवरूपी अर्णवात, म्हणजे संसाररूपी सागरात जणू एक नाव उभी केली. संसाररूपी समुद्र तरून जाण्याचं साधन आपल्या ज्ञानेश्वरीच्या रूपानं त्यांनी सामान्य माणसाला मिळवून दिलं. ज्ञानेश्वरी दुःखितांना दिलासा देते व मोक्षाच्या मार्गावर त्यांना आणून सोडते हे गीताभाष्य श्रवण करण्याच्या मिषानं, म्हणजे ते ऐकण्याच्या निमित्तानं, भक्त-भाविकांनी इथं येऊन बसावं, असं आवाहन नामदेवांनी केलं आहे.

ज्ञानेश्वरी हा केवळ मनात वाचण्याचा ग्रंथ नाही. इथं श्रवणसुखाची राणीव आहे. अमृतालाही पैजेवर जिंकणारे मऱ्हाटा बोल इथं कानांवर पडतील. हे शब्द जो कुणी ऐकेल, तो सामराज्य-भवुनी सुखानं नांदेल. शांतीच्या साम्राज्य-विश्वात तो सुखानं कालक्रमणा करील. ज्ञानदेवी हा श्रेष्ठ ग्रंथ आहे, असा निर्वाळा नामदेवांनी दिला आहे. काव्य, तत्त्वज्ञान, साक्षात्कार, जीवनदर्शन व भाष्यमयता अशा अनेक अंगांनी हा ग्रंथ श्रेष्ठ आहे. म्हणूनच ज्ञानदेवीची 'एकतरी ओवी अनुभवावी' असं आवाहन नामदेवांनी केलं आहे. ज्ञानेश्वरीचं नुसतं पारायण करू नये, तर तिच्या एखाद्या ओवीतील तरी संदेश आपल्या आयुष्यात आचरण्याचा प्रयत्न करावा, असं नामदेवांचं कळकळीचं सांगणं आहे.

### ६. समाधीसाठी सिद्धबेट

कैलासाचा वास अधिक सिद्ध बेट । विष्णूचे वैकुंठ पुरातन ॥ १ ॥
भूमिवरी पंढरी तैसी अलंकापुरी । पंच कोशावरी पुण्यभूमी ॥ २ ॥
सुखाची हे मूर्ति नीलकंठलिंग । चक्रतीर्थ सांग मोक्ष भेटे ॥ ३ ॥
परमार्थ सुअर्थ देखतांची संत । सांगितली मात अनुभवाची ॥ ४ ॥
नामा म्हणे देवा हे स्थळ चांगले । चित्त मन रंगलें ज्ञानोबाचें ॥ ५ ॥

श्रीज्ञानदेवांनी आळंदीस संजीवन समाधी घेतली. ज्ञानदेवांच्या समाधीचे साद्यंत वर्णन करणारे अभंग नामदेवांनी लिहिले आहेत. किंबहुना, ज्ञानदवांनी घेतलेल्या समाधीचा वृत्तान्त नामदेवांच्यामुळेच उपलब्ध झालेला आहे. समाधीचे स्थळ नामदेवांनी प्रथम वर्णिले आहे. ते सांगतात, ''श्रीक्षेत्र आळंदीस इंद्रायणी नदीच्या काठी 'सिद्ध बेट' हे स्थान आहे. श्री शंकराचा निवास असलेला हिमालयावरील कैलास अथवा श्रीविष्णूचे निवासस्थान असलेले प्राचीन वैकुंठ या दोहोंपेक्षाही सिद्ध बेट हे श्रेष्ठ आहे. या पृथ्वीवर जसे पंढरपूर क्षेत्र आहे, तसेच अलंकापूर किंवा आळंदी हे पवित्र क्षेत्र आहे. आळंदीच्या भोवतालची पाच कोसांची (म्हणजे दहा मैलांची) भूमीसुद्धा अतिशय पवित्र आहे. तिथे नीळकंठ लिंग म्हणजे शिवलिंग आहे. ती सुखाची मूर्ती आहे. तसेच चक्रतीर्थ या स्थानाच्या दर्शनाने त्वरित मोक्ष प्राप्त होतो. आळंदीत संत सज्जनांचे दर्शन घडताच परमार्थ प्राप्त होतो; आणि स्वार्थ म्हणजे आपले स्वतःचे हित, हेही लाभते. माझ्या अनुभवाचीच ही गोष्ट मी सांगतो. हे देवराया, जिथे ज्ञानदेवांचे मन रममाण झाले, ते हे सिद्ध बेटाचे स्थान अतिशय चांगले आहे, असे मला, नामदेवाला वाटते.''

आळंदीस समाधी घेण्याचा निर्णय ज्ञानदेवांनी घेतला आहे, असे जेव्हा संतजनांना समजले, तेव्हा पंढरीचे वारकरी आळंदीस जमले. त्यांच्या दिंड्या इंद्रायणीच्या तीरावर जाऊन पोहोचल्या. 'अल्याड-पल्याड पताकांचे भार । मध्ये मनोहर इंद्रायणी' आणि 'धन्य इंद्रायणी पिंपळाचा पार । धन्य ज्ञानेश्वर पूण्यभूमी ।' अशा शब्दांत नामदेवांनी समाधीच्या वर्णनाची पार्श्वभूमी सांगितली आहे. त्यानंतर श्रीक्षेत्र आळंदीतील पवित्र स्थानांचा नेमका तपशील त्यांनी दिला आहे. या सर्व वर्णनातून एक उदात्त वातावरण त्यांनी चित्रित केले आहे.

### ७. ॥ 'संत कासावीस सारे' ॥

वोसंडोनि निवृत्ति आलिंगो लागला । आणिकांच्या डोळां अश्रु येती ॥१॥
अमर्यादा कधी केली नाही येणें । शिष्य गुरुपण सिद्धि नेलें ॥ २ ॥
गीतार्थाचा अवघा घेतला सोहळा । गुह्यगौप्यमाळा लेवविल्या ॥ ३ ॥
फेडिलीं डोळ्यांची अत्यंत पारणीं । आतां ऐसें कोणी सखे नाहीं ॥ ४ ॥
काढोनियां गुह्य देवें केलें फोल । आठवती बोल मनामाजी ॥ ५ ॥
नामा म्हणे संत कासावीस सारे । लाविती पदर डोळियांसी ॥ ६ ॥

प्रत्यक्ष समाधी घेण्यापूर्वी ज्ञानदेवांनी आपले श्रीगुरू आणि वडील बंधू असलेले संत निवृत्तिनाथ यांच्यापुढे हात जोडले. 'पाळिलें पोसिलें चालविला लळा । बा माझ्या कृपाळा निवृत्तिराजा ॥' या शब्दांत ज्ञानदेवांनी आपली कृतज्ञता व्यक्त केली. त्या प्रसंगी निवृत्तिनाथ सद्गदित झाले. त्या प्रसंगाचे वर्णन करताना नामदेव म्हणतात. ''ज्ञानदेवांचे बोलणे ऐकून निवृत्तिनाथांना आपले दुःख आवरेना. अपार प्रेमाने त्यांनी नामदेवांना मिठी मारली, ते हृदयस्पर्शी दृश्य पाहून संतजनांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागल्या. ज्ञानदेवांनी गुरुच्या आज्ञेचा केव्हाही भंग केला नाही. गुरु आणि शिष्य यांचे संबंध कसे आदर्श असू शकतात, याचा जणू वस्तुपाठच त्यांनी सादर केला.

ज्ञानदेवांनी भगवद्गीतेचे मर्म सामान्य माणसाला समजेल, अशा सोप्या मायबोलीत सांगितले, आणि गीतेचे महत्त्व स्वजनांच्या लक्षात आणून दिले. ज्ञानदेवांनी आमच्या डोळ्यांचे पारणे फेडले. त्यांच्या दर्शनामुळे आम्ही धन्य झालो. आता यापुढे ज्ञानदेवांसारखा जिव्हाळ्याचा सखा लाभणे अशक्य आहे. वेदातील जे तत्त्वज्ञान सामान्य माणसाच्या आटोक्यात नव्हते, ते तत्त्वज्ञान ज्ञानदेवांनी आपल्या भावार्थदीपिकेच्या

माध्यमातनू प्रगट केले. देवदेवतांसंबंधीच्या उथळ कल्पनांतील फोलपणा समजावून सांगितला. क्षुद्र दैवतांच्या उपासनेतील अप्रयोजकता स्पष्ट केली. ज्ञानदेवांच्या शिकवणीतील हे सारे गुणविशेष संतजनांना आठवू लागले. ज्ञानदेवांचा आणि आपला आता वियोग होणार हे समजल्यामुळे सगळे संत कासावीस झाले. आपले अश्रू पुसण्यासाठी त्यांनी डोळ्याला पदर लावला, असे मी, नामदेव म्हणतो."

निवृत्तिनाथ हे स्वतः अधिकारी सत्पुरुष होते. नरदेह नश्वर आहे याचे त्यांना पूर्ण ज्ञान होते. पण तरीही ज्ञानदेवांच्या वियोगाच्या कल्पनेने त्यांना आपले दुःख आवरता आले नाही. दैवी गुणांनी संपन्न असलेल्या निवृत्तिनाथांच्या व्यक्तित्वालाही मानवी मर्यादा होती. या मर्यादेतच त्यांचे मोठेपणही आहे. निवृत्तिनाथांच्या चित्ताची व्याकुलता नामदेवांनी सूचित केली आहे. 'वोसंडूनि निवृत्ति आलिंगो लागला' या पहिल्या ओळीतच नामदेवांनी निवृत्तिनाथांच्या मनस्थितीचे मार्मिक वर्णन केले आहे. खुद्द निवृत्तिनाथांची ही अवस्था, तर 'संत कासावीस सारे ।' यात नवल ते कोणते ?

## ८. ॥ 'दशदिशा पाडस भ्रमताती' ॥

निवृत्तिदेव म्हणे करितां समाधान । कांही केल्या मन राहात नाही ॥ १॥
बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ॥ २ ॥
बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळा पांगलेसें ॥ ३ ॥
हरिणीवीण खोपी पडियेली वोस । दशदिशा पाडस भ्रमताती ॥ ४ ॥
मायबापें आम्हां त्यागियलें जेव्हां । ऐसें संकट तेव्हां झालें नाही ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा, पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचें ॥ ६ ॥

ज्ञानदेवांनी समाधीच्या पाळीत उतरून प्रत्यक्ष समाधी घेतली, तेव्हा निवृत्तिनाथांच्या मनाची जी शोकाकुल अवस्था झाली, तिचे करुणरसपूर्ण वर्णन नामदेवांनी या अभंगात केले आहे. परकायाप्रवेश करावा, त्याप्रमाणे जणू निवृत्तिनाथांच्या अंतःकरणात शिरून नामदेवांनी, निवृत्तिनाथांच्या शब्दांतच त्यांचे हृद्गत व्यक्त केले आहे. निवृत्तिनाथ म्हणतात, "ज्ञानदेव समाधिस्थ झाला. माझा हा धाकटा भाऊ मला अंतरला. मन शांत व्हावे यासाठी मी पुष्कळ प्रयत्न करीत आहे. पण माझ्या मनाची अस्वस्थता थांबत नाही. पाण्याने ओतप्रोत भरलेल्या तळ्याचा बांध फुटल्यावर आतले पाणी बारा वाटांनी वाहू लागते. बांधलेल्या गवताचा भारा सुटला म्हणजे ते गवत वाऱ्याच्या झोताने रानोमाळ सर्वत्र उडून जाते. हरिणी दूर जंगलात गेल्यावर रिकामी खोप पाहून तिची पाडसे आईला शोधण्यासाठी दहा दिशांना भटकतात; पण तिची भेट न झाल्यामुळे ती निराश होतात आणि थकून जातात. तशीच काहीशी स्थिती आमची झाली आहे.

आळंदीच्या ब्रह्मवृंदांच्या छळाने आमच्या माता-पित्यांनी जलसमाधी घेतली, तेव्हा त्यांच्या वियोगानं जे दुःख झाले, त्यापेक्षाही जास्त विरह-वेदना या ज्ञानदेवरायाच्या वियोगाने होत आहेत. हा विरहाग्नि प्रज्वलित झाल्याने निवृत्तिराय अत्यंत व्याकुळ झाले आहेत. तेव्हा हे पंढरीनाथा, आपण त्यांचे समाधान करा." असे नामदेवराय म्हणतात. 'कविता म्हणजे भावनाशील मनाचा उचंबळून आलेला उद्गार', असे विल्यम वर्ड्स्वर्थ याने म्हटले आहे. काव्याचे हे वर्णन करुणरसपर रचनेला विशेष लागू पडते. आपल्या आईच्या चिरवियोगाचे दुःख कवीला असह्य झाले; आणि मग, 'ये रागवावयाही । परि येई येई वेगें ।' असे त्याने आईला आवाहन केले. हृदय शोकाने भरून आल्यानंतर बाहेर पडणारे उद्गार उत्कट असतात.

निवृत्तिनाथ हे मूळचे योगमार्गातले. मनाचा संयम हा त्यांच्या वृत्तीचा स्थायीभाव. नात्याने ते वडीलधारे आणि अधिकाराने गुरुस्थानी होते. असे असूनही ज्ञानदेवांच्या वियोगाचे दुःख त्यांना आवरता आले नाही. समर्पक दृष्टान्त देऊन नामदेवांनी निवृत्तिनाथांच्या शोकाची परिसीमा सूचित केली आहे. तळ्याचा पाट फुटावा, पेंढीचा आळा सुटावा किंवा आईविना पाडसांनी इथे-तिथे हिंडावे, हे सारेच दाखले समर्पक आहेत. माता-पित्यांची ताटातूट झाली, तेव्हाही जेवढे दुःख झाले नाही, तेवढे दुःख ज्ञानदेवांच्या चिरविरहामुळे झाले आहे, या कल्पनेतले कारुण्य काळजाला जाऊन भिडणारे आहे.

## ९. ॥ 'करूं भागवत धर्म' ॥

आम्हां सांपडलें वर्म । करूं भागवत धर्म ॥ १ ॥
अवतार हा भेटला । बोलूं चालूं हा विसरला ॥ २ ॥
अरे हा भावाचा लंपट । सांडुनि आलासे वैकुंठ ॥ ३ ॥
संतसंगतीं साधावा । धरूनि हृदयीं बांधावा ॥ ४ ॥
नामा म्हणे केउता जाय । आमुचा गळा त्याचे पाय ॥ ५ ॥

नामदेवांनी भागवत धर्माचे, म्हणजे वारकरी संप्रदायाचे संवर्धन केले. आपले हे उद्दिष्ट स्पष्ट करताना ते म्हणतात, "भागवत धर्माप्रमाणे आचरण करणे हे परमेश्वरप्राप्तीचे रहस्य आहे. ते रहस्य आमच्या हाती आले आहे. मूळचा निर्गुण निराकार असलेला हा परमात्मा सगुण-साकार झाला. त्याने विठ्ठलाच्या रूपाने अवतार घेतला. त्यामुळे त्याची आणि आमची भेट झाली. या भावोत्कट भेटीमध्ये बोलण्या-चालण्याचाही आम्हाला विसर पडला. परमात्मा प्रेमभावामुळे वश होतो. भक्तीचे बळ मोठे आहे. त्यामुळे वैकुंठाचा, म्हणजे आपल्या निवास-स्थानाचा त्याने त्याग केला. पुंडलिकाच्या भक्तीला तो भुलला. त्याने टाकलेल्या विटेवर विठ्ठल येऊन उभा राहिला. संतांच्या संगतीने पांडुरंगाची प्राप्ती करून घ्यावी. आपल्या हृदयात त्याला बंदिस्त करून ठेवावे. विठ्ठलाचे चरण आमच्या गळ्याजवळ आम्ही गोवले आहेत, आता कुठे जाऊ शकणार आहे ? आमच्यापासून तो अलग होणार नाही."

'करू भागवत धर्म ।' हे नामदेवांचे प्रतिज्ञोत्तर या अभंगात स्पष्टपणे व्यक्त झाले आहे. विठ्ठलभक्ती, भागवत धर्माची अनन्य निष्ठा आहे, हे नामदेवांनी या अभंगात स्पष्ट केले आहे. संतसज्जनांचा सहवास हा भक्तिमार्गाचा मोठा आधार आहे, हेही त्यांनी सूचित केले आहे. संतसंगती आणि विठ्ठलभक्ती हे कर्म किंवा रहस्य नामदेवांनी ओळखले आहे. त्याच्या बळावर वारकरी संप्रदाय उभा राहणार आहे, असा पुकारा त्यांनी केला आहे. 'नामा तयाचा किंकर । तेणें केलासे विस्तार ॥' असे संत बहिणाबाईंनी म्हटले आहे. ज्ञानदेवांनी भागवत धर्माची पायाभरणी केली. 'ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया॥'

नामदेवांनी या भक्तिमंदिराचा वाढविस्तार केला. पंढरीपासून पंजाबपर्यंत वारकरी पंथाचा ध्वज त्यांनी मानाने मिरवीत नेला. 'जिकडे पाहे तिकडे अवघा विठोबा।' असे आपल्या अभंगावाणीतून ते सांगतात, तर 'इभै बीठलु, उभै बीठलु, बीठलुबिन संसार नही ।' इथे विठ्ठल आहे, तिथे विठ्ठल आहे, विठ्ठलावाचून या जगात रिकामी अशी एकही जागा नाही, असा संदेश गुरुग्रंथातील आपल्या 'मुखबानी'त ते देतात. अशा रीतीने 'करू भागवत धर्म' हा आपला निश्चय नामदेवांनी तडीस नेला आहे.

## १०. '॥ हे संतमंडळी सुखी असो ॥'

आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळा । माझिया सकळां हरिच्या दासां ॥ १ ॥
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । हे संतमंडळी सुखी असो ॥ २ ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसां । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥
नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

'आता विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥' हे ज्ञानेश्वरीतील प्रसादाचं मागणं प्रसिद्धच आहे. या पसायदानात लोककल्याणाचा मंत्रजागर आहे. पसायदान हे एक अलौकिक प्रार्थनासूक्त आहे. 'आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा' हा नामदेवांचा अभंग ज्ञानदेवांच्या पसायदानाचा वारसा सांभाळणारा आहे. नामदेव म्हणतात, ''संत कुळातील सर्व हरिदास हे माझे जिव्हाळ्याचे आप्त आहेत. त्यांना कल्पाच्या अंतापर्यंतचं आयुष्य लाभावं. हरीचे भक्त दीर्घायुषी व्हावेत. या संतजनांना मायेची बाधा कधीही होऊ नये. 'ब्रह्म हे सत्य आहे आणि जग हे मिथ्या आहे.' मायेनं निर्माण केलेल्या या जगातील वैभवाचा मोह त्यांना होऊ नये. संत जनांना शाश्वत सुखाचा लाभ घडावा. या विष्णुदास भक्त-भाविकांना वृथा अभिमानाचा स्पर्शसुद्धा होऊ नये. पांडुरंगाचं नाम हा मोठा ठेवा आहे. आपल्या मुखानं त्या नावाचा जप करणाऱ्या या सर्व भक्तांचं सदैव कल्याण असावं.''

ज्ञानदेव-नामदेवांप्रमाणं संत तुकाराम आणि समर्थ रामदास यांनीही विश्वकल्याणाचं सुंदर स्वप्न रंगविलं आहे. व्यक्तीच्या अंतर्यामी वसणाऱ्या दैवी गुणांना आवाहन करताना तुकोबांनी 'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म' हा अभंग लिहिला आहे. 'कोणाही जिवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचे ॥' असं तुकोबांनी म्हटलं आहे. 'श्री वनभुवनी' या आपल्या काव्यात रामदासांनी आदर्श राज्याचं चित्र उभं केलं आहे. समर्थ रामदास म्हणतात, 'स्वप्नीं जें देखिलें रात्रीं ॥ तें ते तैसेचि होतसे। हिंडता फिरता गेलों । आनंदवन - भुवना ॥' ज्ञानेश्वरीच्या समारोपात पसायदानाचा जो भव्य आदर्श उभा केलेला आहे, त्याचा प्रभाव सर्वच संत कवींच्या रचनेवर पडला आहे. 'हे संत मंडळी सुखी असो' या शब्दांत नामदेवांनी केलेली प्रार्थना पसायदानाच्या परंपरेतील 'नामदेवांची पायरी' आहे.

## ११. '— जय पांडुरंगा !'

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगी रखुमाई दिसे दिव्य शोभा।
पुंडलिका भेटी परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥ १॥
जयदेव जयदेव जय पांडुरंगा ॥धृ.॥
तुळसी माळा गळां कर ठेवून कटी । कासे पीतांबर कस्तुरी लल्लाटीं ।
देव सुरवर नित्य येती भेटी । गरूड हनुमंत पुढें उभे राहती ॥ २ ॥
जयदेव जयदेव जय पांडुरंगा ॥धृ.॥
आषाढीं कार्तिकीं भक्तजन येती । चंद्रभागेमाजी स्नाने जे करिती ।
दर्शन हेळामात्रें तयां होय मुक्ति । केशवासी नामदेव भावे ओवाळिती ॥३॥
जयदेव जयदेव जय पांडुरंगा ॥धृ.॥

संत नामदेवांची ही आरती भक्त-भाविकांमध्ये अतिशय लोकप्रिय आहे. भक्तराज पुंडलिकाने टाकलेल्या विटेवर श्रीविठ्ठल गेली अठ्ठावीस युगं उभे आहेत. नामदेवांच्या आरतीतून त्या भक्तवत्सल विठ्ठलाचं गुणगान तन्मयतेनं केलेलं आहे. 'आरती' म्हणजे भक्तानं आपल्या दैवताची 'आर्त' वाणीनं केलेली विनवणी. 'सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची ।' (श्रीगणेश), 'लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा ।' (श्रीशंकर), 'दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं ।' (श्रीदेवी), 'सत्राणें उड्डाणें हुंकार वदनीं ।, (मारुती), 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा ।' (श्रीदत्त) इत्यादी आरत्या भक्तांच्या नित्य पठणातल्या आहेत. आरत्यांचे काही लोकप्रिय प्रकारही आहेत. शेजारती, काकड आरती, धूपारती, दीपारती, नैवेद्य आरती, नीरांजन आरती अशा आरत्या विविध प्रसंगी गायिल्या जातात.

संत नामदेव म्हणतात, ''माझा श्रीविठ्ठल गेली अठ्ठावीस युगं भक्तांची वाट पहात उभा आहे. त्याच्या डाव्या बाजूला रुक्मिणी उभी आहे. आपल्या मातापित्यांच्या सेवेत गुंतलेल्या पुंडलिकाच्या भेटीसाठी प्रत्यक्ष परब्रह्म विठ्ठलाच्या रूपानं आलं आहे. त्याच्या पायाशी भीमा नदी वाहात आहे. विठ्ठलाच्या चरण-स्पर्शानं पवित्र झालेली ही नदी जगाचा उद्धार करण्यासाठी वाहात आहे. श्री पांडुरंगाचा मी जयजयकार करतो. राही आणि रखुमाई यांचा तो प्रियकर आहे. तो मला पावावा. याचं ध्यान सुंदर आहे. त्याच्या गळ्यात तुळशीच्या माळा घातलेल्या आहेत. तो पीतांबर नेसला आहे. त्याच्या कपाळावर कस्तुरीचा टिळा आहे. कंबरेवर हात ठेवून तो उभा आहे. मोठ मोठे देव त्याचं दर्शन घेण्यासाठी नेहमी येतात. गरुड आणि मारुती हे दोघेजण त्याच्या सेवेसाठी पुढं उभे आहेत. आषाढ आणि कार्तिक या मासातील एकादशीला लाखो भाविक लोक पंढरीस येतात. चंद्रभागा नदीमध्ये ते स्नान करतात. (भीमानदी पंढरीस चंद्रकोरीप्रमाणे आकार घेते, म्हणून ती चंद्रभागा) श्रीविठ्ठलाचं भक्तांना ओझरतं दर्शन जरी झालं, तरी त्यांना मोक्ष लाभतो. अशा या केशवाला नामदेव भक्तिभावानं ओवाळतात.''

## समारोप

संतनामदेवांची अमृतमधुर अभंगवाणी स्वतःची एक परंपरा घेऊन विकसित झाली आहे. ही अभंग कविता संत तुकारामांमध्ये कळसाला पोहोचली आहे. 'ज्ञानाचा एका आणि नामाचा तुका' हे वचन प्रसिद्ध आहे. अभंग हे जसे एक वृत्त आहे, तशीच ती एक वृत्तीही आहे. या माध्यमातून नामदेवांनी आत्मनिवेदन केले आहे. 'हा रस अद्‌भुत निरूपम' असा या काव्याचा प्रकार आहे. ब्रह्मास्वादाच्या अलौकिक आनंदाने हरखून जाऊन नामदेवांनी अभंगरचना केली आहे. 'हें तो प्रचीतीचे बोलणे' आहे !

डॉ. हे. वि. इनामदार
३१, मेहता महल, फाळके मार्ग, मुंबई - १४.

# नामदेवांची कविता

**डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे**

पी.एचडी. डि.लिट

संशोधन लेखन महाराष्ट्रातील संतसाहित्य, लोकसाहित्य, दैवते, संप्रदाय, सामाजिक परिवर्तनाची आंदोलने इ. संपादित पुस्तके १०० चे वर, सन्मान - ९ शासकीय पुरस्कार, साहित्य अकादमी पुरस्कार पुणे विद्यापीठ, महाराष्ट्र साहित्य परिषद व इतर सांस्कृतिक संस्थांचे अनेक पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाची गौरववृत्ती.

संत नामदेवांची कविता ही पहाटेच्या प्रहरी परिमळणाऱ्या पारिजाताच्या फुलांसारखी आहे. कोवळी आणि सुगंधी. त्या कवितेच्या कोवळेपणाने विटेवरच्या सावळ्या शिळेतून चैतन्याचे कळे उमलले आणि तिंच्या सुगंधाने मराठी मनाचे गाभारे दरवळून गेले. नामदेवांच्या कवितेचा हा सुगंधी कोवळेपणा त्यांच्या वत्सल भक्तीचा सहजाविष्कार आहे. नामदेवांच्या भक्तीचे स्वरूप प्राधान्याने वत्सल आहे. त्यांनी कधी सवंगडी बनून कृष्ण सख्यांबरोबर चेंडूफळीचा डाव मांडला असला आणि कधी गोपी बनून त्याच्या विरहमीलनाचा छाया-प्रकाश अनुभवला असला, तरी ते अगदी अल्पकाळ-भक्तीचे रुचिवैविध्य अनुभवण्यापुरतेच. अगदी बालवयातच ते विठाईमाऊलीचे बाळ बनले आणि जन्मदात्या आईच्या पदराऐवजी जन्म-मरण चुकविणाऱ्या विठाईच्या पदराची पाखर मागू लागले.

### यक्षिणी वाणी

नामदेवांचा हा भक्तिक्षेत्रांतला बालभाव एवढा प्रांजळ आहे, एवढा उत्कट आहे की, त्या भावाची अभिव्यक्ती करणारी वाणी ही प्रभूलाही प्रभावित करणारी ठरली. 'योगिया दुर्लभ' असलेले, ध्यानालाही न आतुडणारे, 'तपातीर्थांचे डांगोरे' निष्फळ ठरवणारे ते अगम्य परमतत्त्व नामदेवांच्या या बालभावाने पराजित केले आणि आपला सारा कठोरपणा दूर दवडून ते आई बनून या भक्ताकडे झेपावले. विठ्ठलाला - बौद्धरूप होऊन मौनात विसावलेल्या विठ्ठलाला विठाई माऊली बनविणारे नामदेव हे खरोखरच भक्तीच्या क्षेत्रातले किमयाकार आहेत आणि गहन गूढ परमतत्त्वाचे एवढे कोवळे नाते, एवढे सुगम सुलभ रूप ज्या वाणीने मराठीच्या मंदिरात नांदायला लावले, ती वाणी खरोखरच यक्षिणी आहे.

टाळ दिंडी हाती उभा महाद्वारी । नामा कीर्तन करी पंढरीये ॥
आवडीचेनि सुखें वोसंडतु प्रेमें । गातो मनोधर्मे, हरिचे गुण ॥

हेच नामदेवांच्या कवितेचे प्रयोजन. आवडीचे सुख हृदयी दाटले आहे. प्रभुप्रेमाचे उमड वोसंडत आहेत, अशा वेळी गाणे अनिवार होते. ते सुरांच्या मिळणीसाठी अडत नाही, की शब्दांच्या जुळणीसाठी नडत नाही. नामदेव 'मनोधर्मे' गात राहतात आणि शब्द सुरांचा साजिरा शृंगार लेवून त्यांचे ते कोवळे गाणे हळुवारपणाने आपल्या ओंजळीत झेलीत राहतात. नामदेवांच्या 'मनोधर्मी' गाण्याने सुरांना माहेर भेटते, शब्दांना अर्थ झटतो.

तूं माझी माउली, मी वो तुझा तान्हा ।
पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे ॥

अशा आर्ततेने नामदेवांनी त्या विठाईला हाक दिल्यावर तिचे अतृप्त वात्सल्य या एकाच लेकरावर मायेचा वर्षाव न करीत राहिले तरच आश्चर्य !

### वात्सल्याची वर्तुळे

नामदेव या वत्सल नात्याची अनेक, परंतु एकात्म रूपे एकापाठोपाठ एक उभी करतात. माऊली आणि तिचा तान्हा या नात्याबरोबरच माऊली आणि तिचे वासरू, हरिणी आणि तिचे पाडस, पक्षिणी आणि तिचे पिल्लू - अशी त्या परिघांतली वत्सल नात्यांची एक मालिका दृष्टीपुढे उभी राहते. माऊलीच्या भेटीसाठी तहानलेल्या तान्ह्याबरोबरच, सायंकाळच्या वेळी गोठ्यात बांधलेल्या वासराची गाऊलीच्या भेटीसाठी सैरभैर झालेली ती दृष्टी, घरट्यांत पक्षिणीच्या पंखांच्या उबेसाठी आणि तिच्या चोचीतल्या चाऱ्यासाठी आसुललेल्या पिलाची ती करुणार्त चिवचिव, वनांत हरिणींच्या माग चुकलेल्या पाडसाची ती अगतिक तडफड - ही सारी दृश्ये रसिकांच्या चित्तांत वात्सल्याची अनेक वर्तुळे निर्माण करतात आणि त्या वर्तुळांच्या मध्यबिंदूतून नामदेवांचा मातृविरहाचा भाव कृष्णकमळासारखा उमलून येतो.

नामदेवांची शब्दावली त्यांच्या भावनेचे सहज अनुसरण करते. मातेची माऊली बनते आणि गाईची गाऊली. या गाऊली-माऊलीला मग दुधावरच्या सायीचे मवाळपण लाभते. मग तिला संबोधताना स्वरांत हळवेपण अवतरते. 'मी वो तुझा तान्हा,' हे नाते उच्चारताच तान्हुल्याची तहान तीव्र होते आणि त्या तीव्रतेची कळ माऊलीच्या उरी उसळते.

### वेदनेची नव्हाळी

नामदेव हे प्रारंभापासून ज्या बालभावाने भक्ति करू लागले, तो भाव त्यांच्या साऱ्या मराठी कवितेला व्यापून राहिला आहे. त्यामुळे त्या भावाचे प्रकटन अनेकदा एकसुरी बनल्यासारखे वाटते. त्याच त्या प्रतिमा, तेच ते दृष्टांत पुनरावृत्त होत राहतात. परंतु तरीही ती पुनरावृत्ती रसिकांच्या चित्तवृत्तीला कंटाळा आणीत नाही. कारण त्या प्रत्येक आवृत्तीत नामदेवांच्या उत्कटतेचे आवर्त अनुभवायला मिळते. 'तू माझी पक्षिणी, मी तुझे अंडज' असे विठाईला सांगणारे नामदेवच केव्हातरी त्याच नात्याचे स्मरण घडवीत म्हणतात -

पक्षिणी प्रभाती चारियासी जाये ।
पिलें वाट पाहे उपवासी ॥
तैसें माझें मन करी वो तुझी आस ।

चरण रात्रंदिवस चिंतीतसें ॥

पुनः पक्षिणी आणि तिचे पिलू, हेच नाते. परंतु त्या नात्याने इथे केवढे उत्कट भावचित्र रेखले आहे; पक्षिणी प्रभातीच बाहेर गेली आहे आणि इकडे घरट्यात पिलू दिवसभर तिची वाट पहात आहे. ती पक्षिणी आहे - पंखांनी गगनवेध घेण्यास समर्थ आहे, तर हे पंखहीन असल्याने एके ठायी अवघडले आहे : ते तिला शोधू शकत नाही. तिने त्याच्या ओढीने परतायला हवे. ती चाऱ्यासाठी गेली आहे, तर हे उपवासी आहे; त्याची भूक तिनेच जाणायला हवी. घरट्यांत दिवसभर वाट पाहणाऱ्या या उपासी पिलाच्या अगतिकतेचे स्मरण देत नामदेव देवाला सांगतात -

तैसें माझे मन करी वो तुझी आस ।
चरण रात्रंदिवस चिंतीतसे ॥

या 'तैसें' शब्दाने त्या पिलाची सारी कासाविशी पकडली आहे आणि 'वो' या संबोधनाने त्या कासाविशीकडे विठाईमाऊलीचे लक्ष खेचण्याचा प्रयत्न आहे. पिलू केवळ दिवसभर वाट पाहते. पण नामदेव रात्रंदिवस चरण चिंतीत आहेत. बाळाला आईच्या मुखाचे दर्शन घेण्याची ओढ असते, नामदेव मात्र इथे चरणांचीच अपेक्षा करतात. चरणी मिठी घालण्यात भक्तीची लीनता आहे; त्या चरणांपासून परमसुखाची पावन गंगा प्रवाहित होते, याची जाणीव आहे. चरण पकडल्यावर दुरावा दूर करता येतो, याचा विश्वास आहे.

नामदेवांनी पुनः एकदा त्याच साऱ्या नात्यांची आठवण देऊन विठाईला हाक दिली -

डोळुले शिणले पाहता वाटुली ।
अवस्था दाटली हृदयामाजी ॥
तूं माझी जननी सरसी ये सांगातिणी ।
विठ्ठले धांवोनि देई क्षेम ॥

माऊलीच्या ओढीचा कोवळा भाव साठवणारे डोळे नामदेवांच्या लेखी 'डोळुले' बनतात. माऊलीच्या पाऊलांनी पावन होणारी वाट 'वाटुली' बनते. हृदयांत विरहभाव दाटून येतो. सारी गात्रे आईच्या स्पर्शासाठी भुकेली बनतात.

विठ्ठले, धांवोनि देई क्षेम ।

हा आक्रोश त्या भुकेतून उसळतो. त्या क्षेमाविना जगणे दुष्कर आहे, असा निराशेचा सूर सूचित होत राहतो. तीच माऊली, तोच तान्हा; तीच गाऊली, तेच वासरू - पण प्रत्येक वेळी वेदनेला वेगळी नव्हाळी आहे.

## माऊलीची मायाभरली मिठी

नामदेव एकदा संसारसासरीच्या जाचणीने व्याकुळ होऊन माहेरासाठी आसुसले आहेत आणि भक्तीच्या पाणोठ्यावर संतसांगातिणींना आपली व्यथा सांगत आहेत -

नेत्र माझे रोडले, आठवे माहेर । कैं भेटेन निरंतर बाइयांनो ॥
चतुर्भुज विठ्ठल, कैं देखेन डोळां । भक्तांचा जिव्हाळा जीव माझा ॥
येणें शोकें रे वाळलों शरीरीं । आठवतो हरी मी काय सांगूं ॥
चारी भुजा उचलोनि क्षेम देईल । कैं मज नेईल पंढरपुरा ॥

माहेरच्या मुराळ्याची वाट पाहून नेत्र रोडावले, शरीर वाळले, पण माहेर काही जवळ करता आले नाही. सासरची जाचणी इतकी भयंकर आहे की, माहेर हे निरंतर भेटावे, असे वाटते. हे वाटणे इतके तीव्र बनते की, विठाई माऊलीला 'दोवरी दोन्ही' अशा चार भुजा फुटतात आणि मग त्या चारी भुजांनी आईच्या मिठीचे सुख अनुभवीत रहावे, अशी इच्छा प्रबळ बनते. आठवाने ऊर फुटतो...

नामदेवांची ही आर्तता त्या माहेरच्या माऊलीला जाणवते. ती माऊली धावत येते. चारी भुजा उचलून नामदेवांना क्षेम देते. त्या क्षेमाने त्यांची सारी गात्रे निवतात. माऊली पितांबराच्या शेवाने मुख पुसते, डोळे टिपते आणि माया भरल्या डोळ्यांनी भक्ताचे रुपडे निरखीत राहते.

अशा वत्सल दृश्यांनी नामदेवांची कविता भारलेली आहे. हीच त्या कवितेची सीमा आहे आणि हीच परिसीमाही आहे. या कवितेने परमतत्त्वाला नुसताच जिव्हाळा दिला नाही, तर माऊलीचा कळवळा दिला. ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगायचे झाले, तर नामदेवांच्या कवितेमुळे प्रमेय रुचीस आले आणि महाबोधाच्या ठायी कोवळीक दुणावली. विठ्ठलाचे नाम उच्चारल्याबरोबर मराठी माणसांच्या मनात अतींद्रिय तरल सुखाचे जे रूप तरळते, ते नामदेवांच्या कवितेच्या प्रभावामुळे.


डॉ. रा. चिं. ढेरे
विदिशा, अभिराज सोसायटी, दशभुजा गणपती जवळ,
सहकारनगर नं. २, पुणे.

# वारकऱ्यांचे संघटक नामदेव

**प्रा. डॉ. अशोक कामत**
एम. ए. पी. एचडी. (मराठी)
पी. एचडी (हिंदी)

प्रमुख नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ १९८५ पासून हिंदी, मराठी, संत साहित्याचे अध्ययन, अनुबंध, अध्यापन, लेखन, संशोधन व शोध कार्यासाठी मार्गदर्शन, सामाजिक प्रबोधन व व्याख्यान एम फिल, पीएचडी पदवीसाठी २८ शोध प्रबंध पूर्ण. ७५ संशोधन प्रकल्प संत साहित्याच्या अभ्यासकांकडून करवून घेतले. संशोधन प्रकल्प कार्यरत.

यादवयुगात सुलतानी-आसमानी संकटांच्या माऱ्यामुळे दक्षिण भारताचे मानचित्र बदलून गेले. एतद्देशियांचे जीवन गुलामगिरीमुळे अधिकच दुःखदारिद्र्याचे झाले. सामान्यजनांना कुणी त्राता उरला नाही. याच इतिहासचक्राच्या संदर्भात संत नामदेवांचे एक वेगळे वैशिष्ट्य सांगण्यासारखे आहे. संत नामदेवांनी पंढरीच्या भक्तांना सहजपणे 'वारीकर' असे म्हणून त्यांच्या दिंडीचे वर्णन एके ठिकाणी वीरांच्या धर्तीवर केले आहे...

आले आले रे हरिचे डिंगर । वीर वारीकर पंढरीचे ॥
ध्वजां कुंचे गरूड ढके । वैष्णव चालले नेटके ॥
आले वैष्णवांचे दळ । भेणे पळे कळी काळ ॥
(महाराष्ट्र शासन नामदेव गाथा ८३३-३४/३१०-११)

यात सूचित झालेली लढाऊ वृत्ती तत्कालीन अन्य कवींच्या अभावानेच आढळते. याच संदर्भात आणखी एक लक्षात येते की नामदेवरायांचे गुरु विसोबा खेचर हे जसे योगिराज होते तसेच ते वीरशैव षटस्थल सिद्धांताचे जाणकार होते. त्यांचा षड्स्थली हा ग्रंथ नवा प्रकाश टाकू शकतो.

वारीची प्रथा नामदेवांच्या घराण्यात प्रथमपासूनच होती. नामदेवांनी आपल्या योजनाकुशल स्वभावाने भक्त-भागवतांचा एकोपा वाढविला. धर्मकारणात उदार विचार आणि उदात्त धारणा प्रत्यक्षपणे याव्यात, यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले. या संदर्भात तुकाराम महाराजांचे एक कथन फार महत्त्वाचे ठरते.

सिंपियाचा पोर एक खेळिया नामा । तेणे विठ्ठल बसवंत केला रे ॥
आपुल्या सवंगडिया सिकवूनि धाई । तेणे सतंतर फड जागविला रे ॥
एक धाई खेळता तो न चुकेचि कोठे । तया संत जन मानवले रे ॥
[तु. गा. (देवडीकर) ३७०८ / ५९५]

या ठिकाणी तुकाराम महाराज सांगतात : पंढरपूरला संत नामदेवांच्या रूपाने एक थोर खेळगडी होऊन गेला. त्याने श्रीविठ्ठलदेवाला आपले परम आराध्य बनवून आपल्या सगळ्या सोबत्यांनाही त्याच अलौकिक आनंदात वाटेकरी केले. वारकरी बांधवांचा फड चंद्रभागेच्या वाळवंटात जागविला. एकत्वाची वृत्ती हे नामदेव कार्याचे सर्वात मोठे वैशिष्ट्य. सांघिक खेळ खेळल्यामुळेच नामदेव आणि त्यांच्या साऱ्या सोबती खेळगड्यांची कुठे फसगत झाली नाही. असे कुशल संघटक संत नामदेव वैष्णवांचे अग्रणी ठरतात.

तुकाराम महाराज हे वारकरी संप्रदायाचे कळस म्हणून प्रसिद्ध आहेत. सांप्रदायिकांमध्ये 'ज्ञानाचा एका आणि नामाचा तुका' अर्थात ज्ञानदेवांचे एकनाथ आणि नामदेवांचे तुकाराम हे अवतार झाले, अशी श्रद्धा आहे. आपल्याला नामदेवरायांनी स्वप्नात येऊन प्रेरणा देऊन कवित्व करावयास लावले असेही तुकोबांनी लिहून ठेवले आहे. त्यांची गाथा ही वारकरी संप्रदायाच्या प्रस्थानत्रयींपैकी एक. त्या गाथेवर नामदेवगाथेचा बराच प्रभाव दिसतो. हे सारे ध्यानी घेतले की तुकोबारायांच्या वरील प्रशस्तीचे महत्त्व आणि मर्म नीटपणे समजू शकते.

जाखाई - जोखाई न मानणारे पण चोखोबा जनाईच्या परिवारांना जवळकी देणारे, त्याचप्रमाणे स्वतः देखिल महाद्वारी उभे राहून विठ्ठल दर्शन घेणारे, ईश्वर सेवेसाठी सारी मांदियाळी एकवटून ज्ञानभक्ती आणि नामसाधना सुदृढ करणारे, संतचरित्रे लिहून त्यांची पाठराखण करणारे, संतचळवळीला भारतीय संदर्भ आणून देणारे नामदेव अनेक अर्थाने 'पायरीचे चिरे आहेत '

'नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे । संत पाय हिरे देती वरू ॥'
हे केवळ त्यांचे वचन नव्हे, ते त्यांचे जीवितध्येय आहे ।

## राजकीय स्थितीचे चित्रण

इस्लामी राजकीय आक्रमणाचा फटका उत्तर भारतात दहाव्या शतकाच्या आरंभापासून बसला होता. त्या मानाने तो महाराष्ट्र/कर्नाटकाला बऱ्याच उशिरा बसला. पण ज्या वेळी १२९४ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीच्या आक्रमणाबरोबर तो बसला, त्या वेळी मात्र दक्षिणेतील बलाढ्य यादवसत्ता पत्त्याच्या बंगल्यासारखी कोसळली, हा आपला इतिहास आहे. एकतर यवनांचा हल्ला केवळ युद्धभूमीवरून नव्हता, तो सामाजिक सांस्कृतिक स्वरूपाचाही होता. इस्लामचा सक्तीने प्रचार, अन्य धर्मियांचा छळ या यावनी युद्धाबरोबर होत राहिला. नामदेवराय मूळचे मराठवाड्यातील. वारींच्या निमित्ताने त्यांना जनांची जवळून ओळख. त्यांना वास्तवाचे दर्शन तीव्रतेने घडले.

युद्धकाळात यादवांच्या सेनाबळाबरोबरच सर्वसामान्य प्रजेचीही ससेहोलपट झाली. हे पुसट वर्णन महानुभवीय कृतींतून विशेषकरून 'स्मृतिस्थळातून' आढळून येते.

इस्लामी आक्रमणामुळे मराठी मुलखावर नेमक्या कोणत्या आपत्ती ओढवल्या त्यांचा मराठी वाङ्मयातील एक जुना म्हणता येईल असा उल्लेख आपल्याला नामदेव गाथेत मिळू शकतो. संत साहित्यातील

इस्लामविषयीची ही प्रतिक्रिया जरी वरवर पाहता सौम्य असली तरी ती नेमकी आहे, कलियुगकल्पनेच्या रूपाने ती व्यक्त झालेली आहे. संत नामदेव म्हणतात :

यवनांच्या भ्रष्ट वागण्यामुळे सर्वत्र अन्याय दिसू लागला. दोषांनी झाकळून गेलेल्या कलियुगात आता देवावतारच काय तो जनांना तारू शकेल ! पाखंड फारच वाढले. आता पापांचा निरास करावयाचा तर हरिनामस्मरण हेच श्रेष्ठ साधन ठरेल.

राजे भ्रष्ट यवन झाले । ठायी ठायी दोष घडले ।
मग यीही अवतार घेतले । कलिदोष हरावया ।
नामा म्हणे पुढे हे जन । यवनसंसर्ग कठीण ।
होता गाती हरीचे गुण । ते उद्धरती सर्वथा ॥
पाखांडे बहुत कली माजी । वर्णाश्रम सकळी बुडविले तरी ।
पापाचिया राशी जळता नामी । निश्चय हरिनामी नामा म्हणे ॥
कलीचिये अंती होणार कलंकी । मारील म्लेंछ की घोड्यावरी ।
फिरून उभारिल धर्माची गुडी । कृतयुग प्रौढी करी तोची ।
तौंवरी साधन हरिनाम कीर्ती । संतांची संगती नामा म्हणे ॥
(२०९०/९१-७९५)

या प्रतिक्रियेवरील 'तोवरी हरिनाम साधना करावी, संतांची संगती स्वीकारावी' असा आशावाद नामदेवांच्या परमार्थप्रिय जीवन दृष्टीतून आलेला आहे. पण येथे मात्र हरिहरि करावे इतकेच म्हटलेले नाही. सर्वसामान्य माणसांनीही एकाग्र चित्ताने आत्मचिंतन करायला हवे. जेव्हा राजसत्ताच अतिभ्रष्ट होते तेव्हा कुणी महामानव अवतार घेऊन देवकार्य करतो अशी श्रद्धा सर्वांनी मनी ठेवावी, त्याजबरोबर 'यवनसंसर्ग कठीण' आहे / ज्याच्याशी दोन हात करायचे तो सामान्य नाही याचीदेखील जाण असावी. पाखांडे वा कर्मकांडापेक्षा नामस्मरणासारख्या सुलभ सोप्या साधनेने ईश्वर तुष्ट होईल असे सुचविताना संत नामदेव बरेच काही सांगून जातात. फिरून जर धर्माची गुढी उभारायची असेल तर सद्धर्मविषयक मूलभूत विचार आवश्यक असे ते सांगत आहेत.

## सामाजिक विषमता आणि दैन्याचे चित्रण

नामदेव हे शिंपी जातीत जन्मले. त्यांचे मूळ गाव मराठवाड्यातल्या परभणी हिंगोलीजवळचे नरसी बामणी. त्यांचा ग्रामीण जीवनाशी आणि समाजात ज्यांना जन्मगत प्रतिष्ठा नव्हती, अशा व्यक्तींशी अधिक संबंध आला आहे. त्यांच्या काव्यात क्वचित येणारे भेदक समाज दर्शन तत्कालीन विषमतेचे प्रभावी अंकन करणारे आहे. उदाहरणार्थ :

एक बैसती अश्वावरी । एक चालती चरणचाली ।
एक जेविती मिष्टान्न । एका न मिळे कोरान्न ॥ (१२८२/५३२)

या अभंगात आरंभी 'ज्याचे दैव त्या सांगाते । मला नवल वाटते' अशी तटस्थ भूमिका ते घेतात. पण यथार्थ चित्रण भेदकपणाने करीत जातात.

नामदेवांच्या एखाद्या अभंगातील दैन्य-दारिद्र्याचे वर्णन इतके उत्कट तीव्र असते की, ते भावकाला अतिशय अस्वस्थ करून सोडते. यथा,

तुम्हां घरीं बोचकी लुगडी । आम्हां घरी पोरे उघडी ।
तुम्हां दुर्ग दारवंटा । आम्हां घरी बारा वाटा ।
तुम्हां घरीं गाई म्हशी । आम्हां घरीं उंदीर घुशी ॥
तुम्हां घरी सवर्ण मडकी । आम्हां घरीं खापरे फुटकी ॥
(१७३९/६७६)

हे केवळ दीनदुबळ्यांच्या दुःखाचे चित्रण नव्हे तर त्यांच्याकडे प्रतिष्ठितांनी जिव्हाळ्याने, सहानुभूतीने पाहावे यासाठी पोटतिडकीने केलेले आवाहनही आहे. स्वतः नामदेवराय हे दामा श्रेष्ठींचे सुपुत्र होते. त्यांचे भले थोरले कुटुंब मानाने पंढरीत राहात होते. ते सारे भक्तिसांप्रदायात समरस झालेले असल्यामुळेच अशा दीनदुःखी जनांना जिव्हाळ्याने जवळ करीत संत नामदेव विशुद्ध भक्तीची शिकवण सुबोध रीतीने सांगतात. कधी आपल्या जातीचा स्पष्ट उल्लेख करून ते जातपात कशी महत्वाची नाही, माणूस आणि त्याची कृती हीच महत्त्वाची कशी, हे अनेक समर्पक उदाहरणांनी विशद करतात. हा अभंग पाहा :

कुश्चळ भूमीवरी उगवली तुळशी । अपवित्र तियेशी म्हणो नये॥
काकविष्ठेमाजी जन्मे तो पिंपळ । तया अमंगळ म्हणो नये ॥
दासीचिया पुत्रा राज्यपद आले । उपमा मागील देऊ नये ॥
नामा म्हणे तैसा जातीचा मी शिंपी । उपमा जातीची देऊ नये ॥
(१२३९/५१३)

या ठिकाणी तुळशीचा चपखल दाखला तर दिलेला आहेच पण अश्वत्थ वृक्षाचाही उल्लेख वैशिष्ट्यपूर्ण वाटतो. जातीचा उल्लेख दोनदा करून जात ही कमी महत्वाची हेही मोठ्या मार्मिक पद्धतीने पटवून दिले आहे. असाच भाव त्यांच्या हिंदी पदातही आढळून येतो. गुरु ग्रंथसाहिबात समाविष्ट असलेले त्यांचे एक पद असे आहे :

कहाँ करी जाति कहाँ करी पाति । रामको नामु जपहु दिनराती।
रांगनि रांगउ सीवनि सिवउ । रामनामु बिनु घरीय न जीवउ ।
भगति करउ हरिके गुन गावउ । आठ प्रहर अपना खसमु थिआवउ ॥
सुइनेकी सुई रूपेका धागा । नामेका चितु हरि सिउ लागा ॥ (पं. ना. १८/८)

ज्ञानदेवांनीही 'जे जे भेटे भूत ते ते मानिजे भगवंत' हा सिद्धांत सांगितला होता. पण नामदेव निःसंदिग्ध शब्दात जातपात मानणे अयोग्य असल्याचे सांगतात. कधी तर ते आपल्या ज्ञातिविशिष्ट व्यवसायाचेच दाखले देत, अमेयाची अंगी शिवण्याची विराट कल्पना करून जातातः

सिंपियाचे कुळी जन्म माझा झाला । परि हेतु गुंतला सदाशिवी ।
रात्री माजी शिवी दिसामाजी शिवी । आराणुक जीवी नोहे कदा ॥
सुई आणि सुतळी कात्री गज दोरा । मांडिला पसारा सदाशिवी ॥
नामा म्हणे शिवी विठोबाची अंगी । म्हणोनिया जगी धन्य जालो ॥
(१२३२/५११)

नामदेवांचा हा अभंग त्यांच्यातील प्रपंचनिष्ठा ही परमार्थमयतेने कशी उजळून निघाली हे मार्मिक शब्दात सांगणारा आहे. अशा तऱ्हेचे सर्वांगसुंदर अभंग भक्तिसाहित्यात फार आढळतात असे म्हणता येत नाही.

जात आणि पात हे खरे आपल्या समाजातील दुःखमूळ आहे, हे

अलीकडे महात्मा ज्योतिबा फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यासारख्या समाजपुरुषांनी पाश्चात्त्यांच्या प्रभावानंतर हेरले. सातशे वर्षांपूर्वीच्या काळात ते नामदेवांनी आपल्या परीने सांगितले होते असे म्हणता येते.

## क्रियानष्टतेची नोंद

'सत्य लोपले, धर्म बुडाला । अजुनि काय पाहतोसी उगला, धावे विठ्ठला' अशा अंतरीच्या तळमळीने नामदेव आपल्या उपदेशाचे अभंग रचतात. दांभिक पुरोहितांचा भक्तीच्या नावावर चाललेला विपरीत व्यवहार ते परखड शब्दांत व्यक्त करतात. ते लिहितात :

कांचनिक भक्ती सर्वकाळ करी । बहुतांचे वैरी हित नेणे ॥
लोकांपुढे सांगे हरिभक्त । न होय विरक्त स्थिती त्याची ॥
(१७९०/६९६)

अशी 'साधू' मंडळी 'वेद मर्यादा' सोडून चालतात. स्वतःच्याच 'सुकृताची होळी' करणारे, वाऱ्याबरोबर हुंबणारे वा पाठ फिरवणारे धार्मिक कसे असतील ? असा प्रश्न करून नामदेव तत्कालीन पंडितांचाही आपला अनुभव सांगतात. (१७९०/६९६)

प्रतिष्ठाप्राप्त विद्वान खंडनमंडन करण्यात आणि तर्कजाल विणण्यात दंग होऊन गेले होते. समाजाच्या भवितव्यापेक्षा आपल्या प्रतिष्ठेची चिंता त्यांना अधिक लागून राहिलेली होती. सर्वसामान्य माणूस अशा विद्वज्जनांपासून कितीतरी दूर राही. अशा स्थितीत विठ्ठलाशी संवाद साधला तरच तरणोपाय आहे, असा नामदेवांचा मनोदय ते वारंवार व्यक्त करतात.

नामदेव - काळातील समाजाचे धार्मिक आणि बौद्धिक नेतेपण करणाऱ्या मंडळींच्या अहंकारावर देखील नामदेवांनी नेमकेपणाने बोट ठेवलेले दिसते. त्यातही हे प्रतिष्ठित धर्ममार्तंड विधिनिषेधाचे स्तोम माजवून भेदाभेदात भर घालतात, अशी रोखठोक टीका करणारे संत नामदेव आपल्या स्वानुभवाचे कथन कधी असे करतात :

तत्त्व पुसावया गेलो वेदज्ञांशी । तंव भरले तयापाशी विधिनिषेध ॥
तया समाधान नुमजे कोणे काळी । अहंकार बळी झाला तेथे ॥
स्वरूप पुसाया गेलो शास्त्रज्ञांशी । तंब भरले तयापाशी भेदाभेद ॥
एकएकाचिया न मिळती मतांसी । भ्रांत गर्वराशी भरले सदा ॥
(१५८४/६२७)

हे वास्तव संत नामदेव केवळ कथन करीत नाहीत, ते याबद्दलचा आत्मसंवाद विठ्ठलाला साक्षी ठेवून देखील वारंवार करतात.

पुराणिकासी पुसू स्वरूपाची स्थिती । तंव त्यासी विश्रांती नाही कोठे ॥
विषयी ठेवूनि मन सांगति ब्रह्मज्ञान । जेणे समाधान नुपजे कदा ॥
(१५८४/६२७)

अखेर शेवटी अशा निर्णयाप्रत ते येतात. मग भक्तीचा उपाय ज्यांना सापडला आहे, त्यांचा अनुभव घेतात आणि म्हणतात -

हरिदासासी पुसूं भक्तीचा उपाय । तंव तयापाशी नाही भाव कोठे ॥
वाचेने सांगती नामाचा बडिवार । विषयी पडिभार सदाकाळी ॥
(१५८४/६२७)

यानंतरचे नामदेवांचे संवाद प्रत्यक्ष आराध्य देवाशीच घडतात :

ऐसे विचारिता बहु भागलो । म्हणून शरण आलो पांडुरंगा ॥
भयभीत झालो संसार करिता । नामा म्हणे आता तारी मज
(१५८४/६२७)

नामदेवांचा आत्मसंवाद हा त्यांच्या जीवनदृष्टीची चांगली ओळख करून देणारा आहे. त्यांनी भेदाभेदांनी भरलेले आणि गर्वाने फुललेले अहंमन्य पांडित्य पाहिले, अनुभवले. पण ते त्यामुळे भांबावूनही गेले नाहीत अथवा कावूनही बसले नाहीत. त्यांनी स्वीकारला तो मार्ग विठ्ठलार्पण भावनेचा होता. त्यागाचा, प्रेमाचा आणि स्थिर चित्ताचा होता. त्यांची विरक्ती, भक्ती किंवा शांत-स्निग्ध मनःस्थिती त्यांच्या उदात्त जीवनदृष्टीतून आलेली आहे.

'नलगे तुझी भक्ती न लगे तुझे मुक्ती । मज आहे विश्रांती वेगळीच ।' श्रीविठ्ठलाच्या भक्ती किंवा परमानुभूतीपेक्षा जे आपल्याला 'प्रेमसुख' गवसले ते इतरांना वाटीत राहण्यात खरा आनंद आहे, असा नामदेवरायांचा भाव आहे.

## आत्मविश्वास - जागरण

श्रीविठ्ठलाच्या परमानुभूतीत रमलेले संत नामदेव घर प्रपंचात फार रमत नाहीत, तरीही त्यांनी प्रपंच सोडून दिलेला नाही. उलट त्यांनी आपल्या साऱ्या परिवारालाच भक्तिपंथावर आपल्या समवेत घेतले. त्याचप्रमाणे अवती-भवतीच्या जनांना त्यांच्यातील आत्मविश्वास जागा करीत त्यांनी परमार्थ मार्गावर आणले. धूर्त पंडितांनी नि उच्चवर्णियांनी अव्हेरलेल्या ज्ञानदेवादी भावंडांची ते विनम्र होऊन पाठराखण करतात. जनांनी ओवळ्या मानून वाळीत टाकलेल्या जनाई, चोखोबा, त्यांचा परिवार यांना आपुलकीने सोबत करतात. उत्तरेत बहिष्कृत बहोरदास केसी कलाधारी, लद्धा, विष्णुस्वामी अशा अठरापगड ज्ञातींच्या शिष्यांना विशुद्ध धर्माची शिकवण देतात.

श्रीगुरुग्रंथसाहिबातील नामदेवांचा एक 'शब्द' अर्थात पद असे आहे :

आनीले कुंभ भराईले उदक । ठाकुरको इसनान करौ
बइआलिस लख जी मल महि होते । बीठलु भैला काई करौ ॥
जत्र जाऊ तत्र बीठल भेला । महाअनंद करे सद् केला ॥
आनीले फूल पिरोइले माला । ठाकुर की हौं पूजा करौं ॥ (पंजाबातील नामदेव ३/८३)

देव्हाऱ्यातील देवदेवतांची विधिवत पूजा करावी म्हणून प्रथम त्यांना स्नान घालण्यासाठी ज्यांनी जलाने भरलेले कुंभ आणले आणि ध्यानी आले त्या पाण्यात बेचाळीस लक्ष जीव आहेत आणि तेही श्रीविठ्ठलरूपच आहेत ! आता मी स्नान कुणाकुणाला बरे घालावे ? जिकडे जावे तिकडे श्रीविठ्ठलच भरून राहिला आहे. सारी सृष्टी ही त्यांची आनंद क्रीडा आहे.

देवाच्या गळा माळा घालावी म्हणून फुले आणली, माळ ओवली पण... फुलं आधी भ्रमरांनी आस्वादिलेली होती.

पहिले बास गहिले भवरे । बीठलु भैला काई करौं ॥

आनीलू दूध रिसाइले खीर । ठाकुरको नैवेद करौं ॥
पहिले दूध बिटारिले बछरा । बीठलु भैला काई करौं ॥ (पं.ना. ३/८३)

पण भ्रमरदेखील भगवंत रूपच नव्हेत का ? आता पूजा कोणाची करावी ? मग दुधाची खीर करून नैवेद्य दाखवायचा म्हटले तर दूध आधी वासराने उष्टावले होते. ते वासरूसुद्धा देवरूप. मग आता नैवेद्य कुणी कुणाला दाखवायचा ?

थान थनंतिरि नामा प्रणवै । पूरि रहियो तू सरब माही ॥
ईभैं बीठलु ऊभै बीठलु । बीठलु बिन संसारू नहीं ॥ (पं.ना. ३/८३)

जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी प्रत्येक स्थानी श्रीविठ्ठल भरून राहिलेला आहे. त्याच्याशिवाय विश्वातील कोणतीही वस्तू रिती नाही. इथं तिथं सदासर्वत्र विठ्ठल आहे. तो केवळ देवमूर्तीत वा मंदिरात नाही. हे संत नामदेवांनी उत्तरेत जाऊन पुन्हा पुन्हा का सांगितले ? त्यांना लोकांचा गेलेला आत्मविश्वास जागवायचा होता. तत्कालीन असहिष्णु आक्रमकांनी केलेल्या मूर्तिभंजक वातावरणात जनसामान्यांना दिलासा देऊन समजावून सांगायचे होते. त्यांनी म्हटले आहे :

एकै पाथर धरिए । दूजे पाथर करिए भावो ।
जै एहु देवा तो ओहु मी देवा ॥

एक फत्तराची पायरी असते ती फरशी राहाते. दुसऱ्या फत्तराची आपण मूर्ती करतो. एक पायदळी तुडवितो तर एकीच्या चरणी आपण माथा टेकतो. भाव तिथे देव. जर देव मूर्तीत असेल तर मूर्ती बाहेरही आहेच. म्हणून 'देह देव्हारा' नि 'हृदय संपुष्ट' म्हणावे. 'मधि कृष्णमूर्ती बसविलेली' रहावी. 'प्रेमाच्या पाण्याने प्रक्षाळण' करावे. (ना. गा. १७५६/६८२)

ज्या काळात हिंदूंच्या देवदेवतांची विटंबना केली जात होती, लाचार पंडे पुजारी नि तथाकथित पंडित क्रूर राजसत्तेपुढे अगतिकतेने अथवा लाचारीने नमत होते आणि त्यापैकी काही सर्वसामान्यांच्या श्रद्धेचा स्वतःच्या स्वार्थासाठी उपयोग करीत होते, तेव्हा नामदेव सर्वांना - हिंदू आणि मुसलमानांनाही - विशुद्ध धर्मभावना विशद करून सांगत होते. समाजात मिसळून, आपल्या प्रत्यक्ष आचरणाने 'ज्ञानदीप' लावून जनांचा आत्मविश्वास जागविण्याचे कार्य करीत होते.

## ज्ञानदीप लावूं जगी ।

एकूण मराठी संतमालिकेत संत नामदेवांचे काव्य नि कार्य खचितच वैशिष्ट्यपूर्ण आहे. ते एक ज्येष्ठ वारकरी कीर्तनकार सत्पुरुष तर आहेतच पण ते आद्य अभंगगायक, आद्य संतचरित्रकार, आद्य अस्पृश्योद्धारक आणि वारकऱ्यांचे प्रभावी संघटक अशा अनेक अंगांनी आगळे वेगळे ठरतात.

संत नामदेव हे त्यांच्या अभंगगाण्याबरोबर उत्तरेला ज्ञात असलेले पहिले तत्त्वज्ञ संतकवी आहेत आणि उत्तरभारतीय संतपरम्परेचे / संतमताचे ते आद्य शिल्पकार अथवा प्रवर्तक म्हणूनही प्रसिद्ध आहेत. महात्मा कबीरदास आणि त्यांच्या प्रभावळीतील अनेक हिंदी संतकवींनी नामदेवरायांचे महिमान मुक्तकंठाने गायिलेले आहे. विशेष म्हणजे हिंदीतील ज्येष्ठ अभ्यासक देखिल प्रांजळपणे हे मान्य करतात.

महाराष्ट्रातून निघून पश्चिमोत्तर यात्रा करीत संत नामदेव वायव्य भारतात पोहोचले. आजच्या अमृतसर गुरुदासपूर नजिक घुमान येथे ते दीर्घकाळ राहिले. तेथील जनताजनार्दनांचे त्यांनी उद्‌बोधन केले आणि पुढे निर्माण झालेल्या शीख भक्तिपरंपरेचे एकप्रकारे पायाभरण केले. त्यांची निवडक हिंदी वाणी 'मुखबानी' म्हणून शीख बांधवांच्या गुरुग्रंथसाहिबामध्ये प्रतिष्ठित आहे.

उत्तरेत आणि मुख्यतः पंजाबात धर्माचे बाबतीत आज बराच कडवेपणा आणि अतिरेक दिसत असला तरी संत नामदेव हे महाराष्ट्रातून आपल्याकडे आले आणि त्यांनी आपल्या आद्य गुरु नानकदेवांपूर्वी आपल्या भागात सद्‌धर्म जागरण केले, याविषयी तेथे दुमत नाही.

महाराष्ट्रात मात्र आजही काही अभ्यासक विशेषतः ज्यांचा मराठीतर भक्तिपरंपरांचा फारसा तुलनात्मक अभ्यास नाही/ नामदेवांच्या उत्तरयात्रेबद्दल विरोधी वक्तव्ये करीत असतात.

आज महाराष्ट्रात प्रचलित संत नामदेवांच्या मराठी अभंगगाथेत त्यांच्या पंजाबयात्रेचे तपशील मिळत नाही, हे एक म्हणणे वारंवार पुढे आणण्यात येते. वस्तुतः हे प्रमाण फारसे तार्किक आहे असे नाही. कारण नामदेव उत्तरेत गेल्यानंतर तेथील भाषेतून आपले म्हणणे तेथील जनांसमोर मांडीत राहिले. ते उपलब्ध आहे. ते त्या मंडळींना अमान्यही नाही. असो !

जरी मराठी गाथेवरून नामदेवरायांच्या उत्तर यात्रेबद्दल काही निश्चितपणे बोलायचे म्हटले तरी फार अवघड नाही. एकतर असे अनेक अभंग आहेत जे मराठी/हिंदीत समान आहेत. काही मराठी अभंग नामदेवरायांची उत्तरयात्रा सूचित करणारेही आहेत.

नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी ॥ हे त्यांचे ब्रीद होते. त्यासाठी त्यांनी महाराष्ट्रात अनेक ठिकाणी प्रवास केले; अन्यत्रही केले. पुढे चर्चेसाठी घेतलेला अभंग प्रस्तुत संदर्भात महत्त्वाचा ठरावा.

## माझे गाणे पश्चिमेकडे !

शासकीय श्रीनामदेवगाथेत आणि अन्यही बहुतेक सर्व गाथेत आढळून येणारा एक अभंग नामदेवरायांच्या विलक्षण भक्तिकार्याचे स्वरूप आपल्याला सूचकतेने सांगतो, तो असा :

काळ देहावी आला खाऊ । आम्ही आनंदे नाचूं गाऊं ।
कोण वेळे काय गाणे । हे तो भगवंता मी नेणे ॥
टाळ मृदुंग दक्षिणेकडे । माझे गाणे पश्चिमेकडे ।
नामा म्हणे बा केशवा । जन्मोजन्मी द्यावी सेवा ॥ (श्रीनामदेवगाथा : १६६४/६५२)

या अभंगातील 'आम्ही आनंदे नाचूं गाऊं' ही पंक्ती एकूण वारकरी रचनेत आणि नामदेव काव्यात इतरत्रही मिळते. नामदेवरायांचा वारकरी धर्मच सांगणारी ही सुंदर ओळ आहे. टाळमृदुंगांचा नि गाण्याचा मेळही वारकरी वैशिष्ट्याचाच द्योतक म्हणता येईल. पण दक्षिण-पश्चिम दिशांचा उल्लेख जरा कोड्यात टाकणारा वाटू शकेल. तो पारखून घेण्यापूर्वी मूळ अभंगाचा सहज लागणारा अर्थ पाहू या :

श्री. प्रल्हादबुवा सुबंध यांनी दिलेला अर्थ असा आहे : देहाला

खाण्याकरिता काळ हा टपून बसला खरा, परंतु आम्ही तुमचे नाम आनंदाने नाचत गान करू. हे भगवंता ! कोणत्या वेळेस कोणता राग गावा ह्यासंबंधी मी अनभिज्ञ आहे. दक्षिण बाजूला टाळ, मृदुंग वाजत असताना माझे गाणे पश्चिमेकडे होत आहे. हे केशवराया ! जन्मोजन्मी मला तुमची सेवा द्या, असे नामदेवराय म्हणतात. हा अर्थ पुरेसा स्पष्ट वाटत नाही. दक्षिण बाजूला टाळमृदंग वाजत असताना गाणे पश्चिमेकडे होत आहे, म्हणजे नेमके काय, हे समजण्यासारखे नाही.

## अभंगाचा शब्दशः अर्थ

या अभंगात चार चरण आहेत. त्यांचा शब्दशः अर्थ असा लावता येईल :

१) (हे भगवंता !) काळ देहास खाऊ पहात आहे. तरीही आम्ही आनंदाने नाचू, गाऊ !

२) गाण्यास विशिष्ट काळवेळ (नि ताल) अपेक्षित असतो. मला काळही कळत नाही (आणि तालही कळत नाही.)

३) जरी मी गात आहे तरीदेखिल मी कोणत्या वेळी काय गावे, हे मला नीट समजत (आहे असे) नाही.

४) टाळ-मृदुंग अर्थात् ताल एकीकडे राहतो. (त्यानुसार न गाता माझे गाणे दुसरेच होते.) (पण) मी (गाण्याने) परमेश्वराची सेवा करीत आहे. मला जन्मोजन्मी हीच सेवा मिळावी. (कुठेही, केव्हाही, कुणी बरोबर असो नसो, माझी गाण्याची तयारी आहे.)

## लाक्षणिक अर्थ

अभंगाचा लाक्षणिक अर्थ अधिक महत्त्वाचा वाटतो. तो असा असावा : माझी वारकरी गाण्याची अर्थात् टाळमृदुंगाची परंपरा दक्षिणेकडे राहिली. आज माझे गाणे पश्चिमेकडे आहे. अर्थात् अन्य प्रदेशात आहे. (भारताच्या वायव्य प्रदेशात आहे.) येथील काळही वेगळा. तालही वेगळा. पण तरीही मी (आपल्या परीने) गाण्याचा प्रयत्न करीत आहे. मला असा आनंद आहे की, माझ्या गाण्याने मी भगवंताची भक्तिसेवाच करीत आहे. मला जन्मोजन्मी अशीच सेवा करावयास मिळावी. कुठेही, केव्हाही, कुणी माझ्या सोबत असो वा नसो, माणे गाणे नि त्यायोगे देवाची सेवा करणे सुरूच राहील !

नामदेवरायांनी या अभंगात केलेले काही शब्दप्रयोग फार बोलके आहेत. दक्षिण दिशेच्या विरोधी उत्तर दिशेचा उल्लेख येऊ शकला असता. तो सहज स्वाभाविकही ठरला असता. पण त्यांनी पश्चिम दिशा निवडली. ते पश्चिमोत्तर भारतातच प्रवास करीत गेले होते. दक्षिणेकडे आपले गाणे राहिले असेही त्यांनी म्हटलेले नाही. टाळमृदृंग राहिल्याचे सांगितले आहे. सारा वारकरी मेळा तिकडे राहिला नि आपण ध्येयवादाने पश्चिमेकडे आलो, असे त्यांना म्हणावयाचे आहे.

## काही पाठ

'काळ **देहासी** आला खाऊ' हा पाठ 'काळ **देवासी** आला खाऊ' असाही असू शकेल. नामदेवकाळात उत्तरेत हिंदूंची देवदेवालये नष्टभ्रष्ट केली जात होती. देवांच्या मूर्ती फोडणारे मोठ्या मानाने मूर्तिभंजक 'बुतशिकन्' म्हणून मिरवत होते ! 'काळ' हा शब्द असहिष्णू वृत्तीच्या आक्रमकांना उद्देशून असावा.

'काळ **देशासी** आला खाऊ' असाही पाठ असू शकेल. देशावर/समाजावर परचक्र आले आहे. पण आम्ही विष्णूदास/भक्तभागवत भीत नाही. आम्ही शांतनिवांत आहोत. आम्ही आनंदाने नाचू-गाऊ. कारण ती आमची 'देवसेवासाधना' आहे !

## टाळमृदंग दक्षिणेकडे !

संत नामदेवरायांची उत्तरयात्रा ही केवळ योगायोगाने घडली आहे असे नाही. ज्याप्रमाणे त्यांनी ती यात्रा योजनापूर्वक केली - ठरवून केली - 'ज्ञानदीप लावू जगी' अशा ईर्ष्येने केली, त्याप्रमाणेच त्यांनी ती यात्रा परंपरा अनुसरूनही केली असे म्हणता येते.

इसवीसनाच्या सातव्या शतकापासूनच दक्षिणेकडे बहुजनांचे भक्तिआंदोलन सुरू झाले. आळावार आणि नायनामार संतसज्जनांनी विष्णुशिवाच्या भजनांचे गायन करीत दक्षिणेकडून उत्तरेकडे यात्रांचा आरंभ केला.

पुढे बसवयुगात शिवशरणांनीही जनता जनार्दनाला बरोबर घेऊन देशाटन केले. अनुभव मंटप भरविले. बहुजनांचे सुखदुःख ऐकले. त्यांचे निराकरण करण्याचा प्रयत्न केला.

आद्य शंकराचार्यांच्याही भारतयात्रा प्रसिद्ध आहेत. पुढे रामानुजाचार्य, मध्वाचार्य, निम्बार्क इत्यादी आचार्यांनी स्वमत प्रतिपादनार्थ यात्रा केल्या.

ज्ञानदेवादी भावंडे, नामदेव, गोरोबा, इत्यादींची तीर्थयात्रा प्रसिद्ध आहे. त्यापूर्वीच्या महानुभाव आचार्य महंतांच्या गावोगावच्या यात्रा प्रसिद्ध आहेत. पुढील काळातील महात्मा एकनाथ, समर्थ रामदास इत्यादींनीही उत्तरेकडे यात्रा केल्या.

यात्रा ही दक्षिणेतील पंडितांची नि साधुसंतांची एक सहज प्रवृत्ती आहे. संत नामदेव 'टाळ मृदुंग दक्षिणेकडे' अर्थात आपले संत सांगाती आपल्या देशातच राहिल्याचे सांगतात. ते स्वतः उत्तरेकडे झेपावले. त्यांनी पश्चिमोत्तर भारतात यात्रा केल्या. आजही या प्रदेशात त्यांच्या प्रभावखुणा आढळून येतात. आपली उत्कट भक्तिपदरचना करीत गाणे गात पदयात्रा करीत संत नामदेव पश्चिमेकडे जात राहिले : गुजरात - राजस्थान - माळवा - पंजाब - गांधारपर्यंत ते गेले.

## आम्ही आनंदे नाचू !

ज्ञानदेवांनी 'वाचे बरवे कवित्व । कवित्वी रसिकत्व रसिकत्वी परतत्त्व । स्पर्शू जैसा' म्हटले. नामदेवांनी 'ज्ञानदीप सर्वत्र तेवते' करावेत यासाठी 'कीर्तनरंगी नाचण्याचे' ब्रीद स्वीकारले. आनंदाने सर्वांसह आनंद वाढवावा ही वारकरी संतांची जीवनदृष्टी होती. त्यांच्या उपलब्ध जीवनचरित्रातील अनेक प्रसंगांतून नि त्यांच्या अभंगकाव्यातून ती दृष्टी परोपरीने स्पष्ट होते.

प्रा. डॉ. अशोक कामत
शिवश्री २५८, सहजीवन सोसायटी,
पर्वती पुणे - ४११ ००९.

# संत नामदेवांचे समाज प्रबोधन

**डॉ. निर्मलकुमार फडकुले**
एम. ए., पी. एचडी.

'लोकहितवादी काळ आणि कर्तृत्व' प्राध्यापक संगमेश्वर कॉलेज सोलापूर. २३ पुस्तके प्रसिद्ध. निरनिराळ्या भाषांवर व विषयांवर प्रभुत्व, सामाजिक प्रबोधनाची आवड.

मराठी साहित्याला आणि समाजमनाला घडविण्याचं श्रेय संतांच्या काव्यवाणीला देणं संयुक्तिक होईल. संतांची कविता भावना आणि विचार या दोन्ही अंगांनी संपन्न आहे. महाराष्ट्र संस्कृतीवर या वाणीचे दृढ व खोल संस्कार झाले. महाराष्ट्राच्या इतिहासाचा ज्याला अभ्यास करायचा आहे त्याला संतांचं व्यक्तित्व आणि त्यांनी निर्माण केलेलं साहित्य यांचा विचार केल्याशिवाय गत्यंतर नाही. कारण संत साहित्यानं मराठी संस्कृतीला आकार दिला. आधार दिला. मराठी भाषेला बळ दिलं. मराठी माणसांच्या विचारांना पीळ दिला. संत साहित्याची ही थोरवी नाकारणं करंटेपणाचं ठरेल. ज्ञानेश्वरांपासून सतराव्या शतकाच्या अखेरपर्यंत संतांची काव्यगंगा महाराष्ट्राच्या भूमीवरून वाहात राहिली. मी तर असं विधान करतो की, महाराष्ट्र महान झाला याची काही कारणं संतांच्या श्रेष्ठ व्यक्तित्वांत आणि वाङ्मयात सामावलेली आहेत. ज्ञानोबांचा, नामया-तुकयांचा हा महाराष्ट्र जितका कठोर तितकाच कोमल बनला. गोविंदाग्रजांनी 'मंगल देशा, पवित्र देशा' असा महाराष्ट्राचा केलेला गौरव सार्थ ठरतो तो संतांच्या सारस्वतामुळं.

संतकाव्य हे जीवनाला उजळणारं आणि दिशा दाखवणारं विचारसुंदर काव्य आहे. त्यात ईश्वराची भक्ती आहे हे खरं. पण संतांचा ईश्वर हा माणसातच अंतर्भूत होता. प्रत्येक जीवमात्राच्या ठायी असलेलं ईश्वरत्व जागं करण्याची त्यांनी धडपड केली. ते क्रियाशील विचारवंत होते. केवळ घटपटात्मक चर्चा करणारे निष्क्रिय पंडित नव्हते, याची अनेक उदाहरणे देता येतील. गंगानदी सागराला मिळण्यासाठी प्रवास करते पण ज्या प्रदेशातून ती खळखळत जाते तेथील सारा भूभाग हरितसुंदर बनवते. सौंदर्याचं आणि सौभाग्याचं त्या प्रदेशाला वरदान देते. त्याप्रमाणंच मुक्तीच्या महासागराला मिळण्यासाठी वाहात गेलेली संतांची जीवनगंगा, लोक जीवनाला समृद्ध बनवून गेली. संत 'स्वांतः सुखाय' नव्हते. त्यांचं आयुष्य 'बहुजन सुखाय बहुजन हिताय' होतं, त्यांच्या विचारांचा आणि कार्याचा योग्य त्या संदर्भात अभ्यास केला पाहिजे. त्यांच्यावर देवभोळेपणाचा व भाबडेपणाचा आरोप करणारे काही 'बुद्धिवादी' टीकाकार आहेत. त्यांच्याही भाबड्या बुद्धीची चिकित्सा केली पाहिजे. मध्ययुगात ज्ञानाचा आणि भक्तीचा प्रकाश घराघरांत आणि झोपडी-झोपडीत पोहोचवण्याची संतांची कामगिरी अपूर्व स्वरूपाची आहे यात शंकाच नाही. मानवतावादाचा विचार घेऊन आलेला वारकरीपंथ इथल्या सामान्य माणसाला केंद्रबिंदू समजून त्याला कर्तव्याची जाणीव देत राहिला. समाजमन उत्साही, आत्मप्रत्ययपूर्ण व्हावं यासाठीच संतांचं प्रबोधनकार्य होतं.

संत नामदेवांचे प्रबोधन कार्य खरोखरच स्तिमित करणारं आहे. त्या कार्याचं विवरण करण्यापूर्वी एका घटनेचा उल्लेख केला पाहिजे. भागवत धर्माची पताका खांद्यावर टाकून नामदेव पंढरीपासून निघाले, भजन-कीर्तन व प्रवचनं करीत ते पंजाबला पोहोचले आणि या शिंप्यानं तेथील जनतेची भेगाळलेली मनं आपल्या काव्यवाणीनं आणि हरिनाम गजरानं जोडून टाकली हा इतिहास विलक्षण आहे. वीस वर्षं त्यांनी पंजाबात वास्तव्य केलं. गुरुमुखी भाषा आत्मसात केली. रसाळ कवित्वाचं देणं असलेल्या या संतकवीनं पंजाबातील जनसामान्यांशी त्यांच्या भाषेतून संवाद केला. माणुसकीचा ध्वज आपल्या वाणीतून आणि करणीतून उंच उचलून धरला. हे सारं नामदेवांनी कशासाठी केलं ? समाजमनात प्रबोधनाची उर्मी उत्पन्न व्हावी, माणूस हा ईश्वराचा अंश आहे आणि हे ईश्वरत्व त्याला आपल्या ठायी फुलवता येतं हा विश्वास त्याला देण्यासाठी नामदेवांनी अखंड परिश्रम केले. संत आणि लोकजागृती यांचं एक समीकरण बनवणाऱ्या संतांत नामदेवांचा उल्लेख अग्रक्रमानं करावा लागेल. ज्या कबीरानं उत्तरेत मानवतेची गाथा निर्माण केली त्या कबीराच्या वाणीवर नामदेवांचा संस्कार झाला होता. त्या काळात प्रवासाची साधनं नव्हती. प्रचारासाठी कीर्तन आणि प्रवचन या व्यतिरिक्त माध्यमं नव्हती. लोक केवळ प्रारब्धवादी बनलेले होते. जातीपातींच्या भिंती बुलंद होत्या. अशा काळात नामा शिंपी फाटलेलं आकाश शिवण्यासाठी पायपीट करीत उत्तरेत जातो ही घटना मला तरी एखाद्या राजाच्या दिग्विजयी कथेपेक्षाही अधिक रोमहर्षक वाटते. लोकप्रबोधन हाच संतांचा जीवित हेतू असतो. ते लोकांत राहतात. लोकांच्या सुख-दुःखाशी सहकंप पावतात. लोकांची भाषा हीच त्यांची भाषा असते. भक्ती, प्रेम आणि शांती यांचे सूर आळवीत संतांची पदयात्रा सुरू असते.

संत नामदेवांनी भक्तिमार्गाचा उत्कट पुरस्कार केला. सर्वसामान्य माणसासाठी सगुण भक्ती आणि नामसंकीर्तन ही साधनं अत्यंत महत्त्वाची आहेत. खरं तर भक्ती हे साधन नव्हे ते साध्यच आहे. नामभक्तीचा जेवढा प्रसार नामदेवांनी केला तितका अन्य संतांनी केला नसावा. भक्तीची सनद मिळाल्यामुळं समाजाच्या खालच्या स्तरांतूनही अनेक भक्तकवी उत्साहानं, आत्मविश्वासानं परमेश्वराला आवाहन करणारी आणि आपली सुखदुःख सांगणारी काव्ये लिहू लागले. चोखामेळ्याच्या कवितेवर नामदेवांच्या भक्तिमार्गाचा आणि विचारांचा परिणाम झालेला दिसतो. कीर्तनाच्या रंगात नाचत असताना नामदेवाभोवतालचं वातावरण

भक्तीनं आणि प्रेमानं ओसंडून वाहायचं. या कीर्तनात चोखामेळा आणि त्याचे कुटुंबीय त्याप्रमाणंच अठरा पगड जातीचे लोक सहभागी झालेले असत. एका अर्थानं ही क्रांती आहे. भक्तीतून ईश्वर मिळतो, भक्तीतून भेदभावना वितळून जाते. भक्तीची भावना माणसांना ईश्वराशी जोडते. ही अनुभूती सामान्य माणसाला देण्याचं कार्य नामदेवांनी केलं यात शंका नाही. कीर्तनाच्या रंगात केवळ भाबडी भक्ती नव्हती 'नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी' ही तर नामदेवांची प्रतिज्ञा आहे. या प्रतिज्ञेची पूर्ती त्यांनी आपल्या आयुष्यात अखंड परिश्रम करून केली अशी इतिहासाची साक्ष आहे. आरंभीच्या कालखंडात संत नामदेव सगुण भक्तीच्या प्रवाहात आकंठ बुडालेले होते. पण ज्ञानदेवांचा सहवास, विसोबा खेचरांचा उपदेश, समाजजीवनाचं केलेलं निरीक्षण, व्यापक सामाजिक जाणीव यातून त्यांच्या भक्तीला ज्ञानाची दृष्टी लाभली. पुढे पंजाबात गेल्यानंतर ते भरभरून उपदेश करीत राहिले. त्यातून भक्ती व ज्ञान यांच्या धारा एकत्रित होऊन वाहू लागल्या.

नामदेवांनी स्वतःला 'यातिहीन' म्हटले आहे. तत्कालीन वर्णव्यवस्थेत नामदेवांची जात खालची मानली गेली. याची खंत त्यांच्या चित्तात होती हे त्यांच्या कित्येक अभंगांतून जाणवतं. त्यामुळेच त्यांनी संत चोखामेळ्याला आपल्या हृदयाशी धरलं. त्याला उपदेश केला. नामदेव आणि चोखामेळा दोघेही विषम समाजरचनेमुळे दुःखी होते. ही सामाजिक व्यवस्था उखडून टाकणं त्यांना शक्य नव्हतं. पण या रचनेची बंधनं शिथिल व्हावीत आणि माणूस माणसाला भक्तीच्या क्षेत्रात मुक्तपणानं भेटावा हे नामदेवांचं परमवांछित होतं त्यादृष्टीनं त्यांची कीर्तनं होत असत.

सुंभाचा कडदोरा रकट्याची लंगोटी ।।
नामा वाळवंटी कथा करी ।।

चंद्रभागेच्या वाळवंटात कीर्तनाच्या रंगात जात-पात विरघळून गेली. नामदेव कीर्तन करू लागले की विठ्ठलही नाचत होता. या आख्यायिकेचा अन्वयार्थ इतकाच की भक्तिरसानं ओथंबलेलं नामदेवांचं कीर्तन ऐकताना तो जनसमुदाय जणू विठ्ठलाला सगुण रूपात पाहू शकत होता. महाराष्ट्रात कीर्तनसंस्था रुजविण्याचे श्रेय नामदेवांकडं निःसंदेहपणे जातं. पंढरीच्या भक्तिपीठाचे आणि कीर्तनसंस्थेचे कुलगुरु म्हणून त्यांचा उल्लेख केला जातो तो यथार्थच आहे. आज प्रसारमाध्यमं वाढली. पण आजच्या काळातही कीर्तनसंस्थेची आवश्यकता वाटते. रंजन आणि उद्‌बोधन यांचा मेळ घालून सात शतकांपूर्वी नामदेवांनी हरिकीर्तन सुरू केलं आणि त्या कीर्तनातूनच लक्षावधी भक्तांच्या मनात भक्ती व ज्ञान बरसत राहिले. एक कीर्तनकार या नात्यानं नामदेवांचं कार्य अत्यंत परिणामकारक, व्यापक आहे. या संतकवीनं आपली सारी कलाप्रतिभा कीर्तनात ओतून समाजप्रबोधनाची वाट उजळून टाकली. वारकरी पंथात नामदेवांसारखा रसाळ वाणीचा प्रबोधनवादी कीर्तनकार झाला म्हणूनच ही परंपरा अधिक विकास पावली. आजही एखाद्या कीर्तनप्रसंगी माझ्या कल्पनानेत्रांना सात शतकांपूर्वीचा नामदेव नावाचा संत कीर्तनकार दिसू लागतो; आणि मन रोमांचित होतं.

नामदेवांची विचारसरणी सांप्रदायिक स्वरूपाची नाही. ती मानवतावादी असून माणसातल्या देवत्वाला आवाहन करणारी आहे. त्यामुळं भाषा आणि प्रदेश यांच्या भिंती ओलांडून गुजराथ, उत्तर प्रदेश आणि पंजाब या भागातही आपल्या समतावादी विचारांचा झेंडा त्यांनी फडकावला. संतकार्यावर आक्षेप घेणाऱ्या आक्षेपकांना नामदेवांच्या बहुविध स्वरूपाच्या प्रबोधनकार्याची माहिती नसते. संतांवर पलायनवादाचा आरोप करणाऱ्यांनी केवळ नामदेवांच्या भूमिकेकडं पाहिलं तरी हा आरोप विरघळून जाईल. मराठी बरोबरच पंजाबी भाषेवर प्रभुत्व मिळवून त्यांनी केलेली काव्यरचना लक्षणीय आहे. उत्तरेत नामदेवांची मंदिरंही उभी राहिली. याचा अर्थ लोकमनात या संताला अत्यंत महत्त्वाचं स्थान लाभलेलं होतं. जो संत आत्मकल्याणापेक्षा लोककल्याणाची अहर्निश चिंता वाहतो त्यालाच लोक मस्तकावर धारण करतात. नामदेवांची मंदिरं याच भावनेनं निर्माण झाली.

नामदेवांच्या अभंगांतून केवळ भक्तीची उत्कटता जाणवते एवढंच नसून त्यातून त्यांचा समाजविषयक विचारही प्रकट होतो. उदा.

परिसासी लोह लागती ते कनकचि होती ।
तया मागील ते गति बोलो नये ।।
आड ओहोळ वाहाती ते गंगेसि मिळती ।
तया मागील ते गति बोलो नये ।।
काक विष्ठा करिती तेथे पिंपळ होती ।
तया मागील ते गति बोलो नये ।।
कुश्चळ भूमीवरी उगवली तुळसी ।
अपवित्र तियेसी म्हणो नये ।।
दासिचिया पुत्रा राज्यपद आले ।
उपमा मागील देऊ नये ।।

या अभंगाचा भावार्थ कुळ आणि जाती यांचं श्रेष्ठ कनिष्ठत्व भ्रममूलक आहे हाच आहे. भिन्न भिन्न दृष्टान्त घेऊन हा विचार पटविण्याचा प्रयत्न नामदेव करतात. स्वतः नामदेवांना आपल्या तथाकथित कनिष्ठ जातीची मानसिक टोचणी होती. त्यामुळं तिचा उल्लेख त्यांनी अनेक ठिकाणी केला आहे. तुकारामांइतक्या परखडपणानं ते बोलत नाहीत पण जातीय विषमतेबद्दल त्यांच्या मनात खंत आहे. 'जे जे भेटे भूत ते ते जाणिजे भगवंत' हा विचार आपल्या भाषेतून आणि वर्तनातून त्यांनी जन्मभर विवरून सांगितला. नामदेवांचं आवाहन उत्कट असल्यामुळं सर्वसामान्य माणूस त्यामुळं भारून गेला. अठरा पगड जातीत भक्तीच्या द्वारा एकत्वाची विचारधारा नामदेवांनी ज्या आग्रहानं आणि पोटतिडिकीनं निर्माण केली त्याला तोड नाही. भागवत धर्माचे म्हणजेच भक्ती आणि एकात्मता यांचे सर्वश्रेष्ठ प्रचारक म्हणून त्यांना स्थान दिले जाते हे उचितच आहे. सामाजिक एकतेचा मार्ग हा प्रेमभावनेचाच घटक असतो. माणसं जोडता येणं, त्यांच्यात संवादित्व निर्माण करणं आणि त्या मेळाव्यातून एक सांस्कृतिक जाणीव सिद्ध करणं हे कार्य अवघड असतं. पण नामदेव हे स्वतःच एक भक्तिपीठ बनले होते. त्यांचं भजन आणि कीर्तन सामाजिक जागृतीची माध्यमं

होती. सात शतकांपूर्वी त्यांच्यासारखा लोकांच्या मनात मिसळणारा प्रचारक झाला नसता तर भागवत संप्रदायाचा इतका विस्तार होण्याची शक्यता कमी होती.

नामदेवांची हिंदी-पंजाबी कविता हीदेखील उद्‌बोधनात्मक आहे. आपल्या हृदयातली सुख-दुःखं तिच्यातून त्यांनी सांगितली. खरं तर त्यांची सारीच अभंगवाणी आत्मनिवेदनात्मक आणि उपदेशात्मक आहे. ईश्वरभक्तीचा संदेश झोपडीपर्यंत गेला पाहिजे या इच्छेनं त्यांची कविता साधी, रसपूर्ण आणि प्रसादगुणानं ओथंबलेली आहे. एका पंजाबी कवितेत ते म्हणतात,

मोकऊ तू न बिसरी तूं न बिसारी ।
तूं न बिसारी रामइआ । रहाउ ॥
आलावंती इहु भ्रमु जो है
मुझ उपरि सभ कोपिला ॥
सूद सूद करि मारि उठाइउ
कहा करवू बाप बीठुला ॥
मुए हुए जउ मुकति देहुगे
मुकति न जानै कोइला ॥
ए पंडिआ मोकउ ढेढ कहत
तेरी पैज पिछउडी होइला ॥
तू जू दइआलु क्रिपालु कहीअतु है
अतिभुज भइउ अपारला ॥
फेरि दिआ देहुरा नामे
कउ पंडीअन कउ पिठ वारला ॥

अस्पृश्यता मानणाऱ्या पंड्यांच्या विचारावर या कवितेत हल्ला चढविला आहे. 'शूद्र शूद्र' असं ओरडून या दांभिक पंड्यांनी आपल्याला मारहाण केली. पण परमेश्वरा तू सर्वत्र आहेस. माझा अपमान हा तुमचाच अपमान आहे. अशा आशयाचे हे उद्‌गार सामाजिक एकतेची भावना दृढ करण्यासाठी नामदेव किती धडपडत होते याची द्योतक आहे. जीर्ण परंपरेचा धिक्कार करून माणसातलं देवत्व ओळखणारी नवी परंपरा नामदेवांना इथं अभिप्रेत आहे. जात आणि वंश, वर्ण असल्या क्षुल्लक गोष्टींचं अवडंबर माजवून माणूस माणसापासून विभक्त करणारी स्वार्थी, ढोंगी वृत्ती या प्रबोधनकाराला मान्य नाही. सातशे वर्षांपूर्वी जातिवाद आणि वंशवाद यांना बाजूला सारणारा हा विचार आजही किती आवश्यक आहे हे वेगळं सांगण्याचं कारण नाही.

आणखी एका कवितेत परधन आणि परदारा यांच्यकडं जो दृष्टी वळवीत नाही तो परमेश्वराला आवडतो असं सांगून समाजात कोणत्या गुणांची व प्रवृत्तींची वाढ झाली पाहिजे हे नामदेव स्पष्ट करतात. त्यांच्या चरित्राचा आणि कार्याचा मध्यबिंदू ईश्वरभक्ती, माणुसकी आणि प्रेम हाच होता हे जाणवतं. जग सुंदर व्हावं, समाज विकसित व्हावा, माणूस इथून तिथून एक असावा अशी स्वप्नं दृष्टीत साठवून संत समाजमान घडवीत असतात. नामदेवांनी ज्ञानदेवांपासून प्रेरणा घेऊन पुढं आमरण या दिशेनं जे कार्य केलं ते अलौकिक स्वरूपाचं आहे. भक्ती आणि श्रद्धा यांच्या बळावर पर्वतसुद्धा हलवता येतो हे वचन नामदेवांनी सार्थ केलं. आपलं एक स्वप्न त्यांनी शब्दबद्ध केलं आहे. ते म्हणतात,

आकल्प आयुष्य व्हावे तया कुळां ।
माझिया सकळा हरिच्या दासां ॥
कल्पनेची बाधा न होणे काळी ।
हे संतमंडळी सुखी असो ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा ।
माझ्या विष्णुदासा भाविकासी ॥
नामा म्हणे तया असावे कल्याण ।
ज्यामुखी निधान पांडुरंग ॥

सारी सृष्टी ईश्वररूप आहे असं अनुभवणाऱ्या नामदेवांनी समाजाला भक्तीचा आणि ज्ञानाचा प्रकाश दिला. ज्याचं अंतःकरण प्रेमभावनेनं उजळलेलं असतं तोच सर्वत्र ईश्वरीय प्रकाश पाहू शकतो. नामदेवांनी तो पाहिला आणि समाजाला तो भरभरून दिला यातच त्यांच्या जीवित्वाचं सार्थक झालं. नामदेवाची मुद्रा लोकमनावर प्रदीर्घ काळपर्यंत राहील यात शंका नाही.

डॉ. निर्मलकुमार फडकुले
१० विद्यानगर, उत्तर सदरबाजार,
सोलापूर - ४१३ ००३

# वारकरी संप्रदायातील संत नामदेवांचे स्थान

**प्रा. प्र. द. निकते**
एम. ए. बी. एड, अध्यापक मराठी

लेख - वर्तमान पत्र व मासिक. संत नामदेवांच्या गाथेचा प्रसार व प्रचार, गाथेचे सामुदायिक पारायण, पत्रद्वारा नामदेवगाथेचा अभ्यास. राष्ट्रीय एकात्मतेसाठी नामदेवगाथेची दिंडी ज्या ठिकाणी नामदेवमहाराज गेले होते त्या ठिकाणी.

कीर्तनं नर्तनानंदं, प्रज्वलीतं ज्ञानदीपम् ।
भक्ती भावेश्वरं वंदे, नामदेवं पुनः पुनः ॥

संतांच्या मांदियाळीत संत शिरोमणी म्हणून तर भक्तांच्या मांदियाळीत भक्त शिरोमणी म्हणून संत नामदेवराय ओळखले जातात. भक्तीची मूर्तीमंत मूर्तीच होते नामदेवराय. - श्रीपांडुरंगाचे प्रेमभांडारी तथा लडीवाळभक्त होते नामदेवराय. संत नामदेवांची श्रीपांडुरंगावर अपरंपार उपास्ती होती, तर श्रीपांडुरंगाची संत नामदेवांच्यावर अपरंपार भैदवी होती.

संत जनाबाई म्हणते -
मागे किती संत झाले । नाम्या ऐसे कोणे बोले ।
नामा जाता राऊळासी । देव बोले आधि त्यासी ॥

संत नामदेवराय राऊळात येताच देव त्यांच्याशी प्रथम बोलत. नामदेवराय राऊळात कीर्तन करू लागले की देव त्यांच्यामागे उभे राहून नाचत असत. असे देव व नामदेव यांचे अतूट नाते होते. संत ज्ञानेश्वर महाराज संत नामदेवराय यांच्या अभंगाविषयी म्हणतात -

भक्त भागवत बहुसाल ऐकिले ।
बहु होऊनि गेले होती पुढे ॥
परि नामयाचे बोलणे नव्हे हे कवित्व ।
हा रस अद्‌भुत निरूपमु ॥

भक्त भागवत खूप झाले. पुढे होतील. पण नामदेवरायांचे बोलणे हे केवळ कवित्व नसून निरूपम् म्हणजे ज्याला कशाचीही उपमा देता येत नाही असा अद्‌भुत रसच आहे.

वाचे बरवे कवित्व । कवित्व बरवे रसिकत्व ।
रसिकत्व बरवे परतत्त्व । स्पर्शू जैसा ॥

परतत्वाला स्पर्श करणारं अभंग वाङ्मय आहे संत नामदेवरायांचं. वारकरी संप्रदायातील मराठी वाङ्मयातील अभंग वाङ्मयाचे प्रणेते आहेत संत नामदेवराय. मराठी वाङ्मयात अनेक दालने ही संत नामदेवरायांनी सर्वप्रथम खोलली व मराठी वाङ्मय समृद्ध बनविले. आद्य संत चरित्रकार, आद्य आत्मचरित्रकार, आद्य प्रवास वर्णनकार, आद्य अभंग रचनाकार, आद्य महाराष्ट्रीय हिन्दी संत कवी म्हणून संत नामदेवांचे वारकरी संप्रदायातील स्थान अजोड आहे. वारकरी संप्रदायात आज मोठी परंपरा असणारे अनेक फड आहेत. या सर्व फडामध्ये पहिला फड संत नामदेवमहाराजांनी स्थापन केला. आद्य फडकरी आहेत नामदेवराय.

याबाबत श्रीतुकोबारायांचे एक प्रमाण आहे ते असे -

सिंपियाचा पोर एक खेळिया नामा ।
तेणे विठ्ठल बसवंत केला रे ॥
आपुल्या सवंगड्या सिकवूनी घाई ।
तेणे सतत फड जागविला रे ॥

संत नामदेवरायांनी वारकऱ्यांचा पहिला फड स्थापन करून भक्तीचा प्रसार व प्रचार केला. भावभक्तीच्या गंगेत सकलांना न्हाऊ घातले. कीर्तनाचे रंगी नाचत ज्ञानदीप लावले. संत नामदेवरायांच्या नामभक्तीने सकलांना भारावून टाकले. संत नामदेवांची नामभक्ती व संत ज्ञानदेवांची ज्ञानभक्ती एकरूप झाली. भक्तीला नाम व ज्ञान यांची जोड मिळाली. परिणाम मराठी सरिता पावन झाली. संत नामदेवांच्या नामभक्तीला तथा संत ज्ञानदेवांच्या ज्ञानभक्तीला वारकरी संप्रदायात फार महत्त्व आहे. वारकरी संप्रदाय हा भक्तीच्या भक्कम पायावर उभा आहे. त्याचा धर्म आहे भागवत. भगवंताविषयीची भक्ती त्यात आहे. असा भगवद्‌भक्तांनी भागवत धर्म जोपासला. संत ज्ञानोबारायांनी त्याचा पाया घातला तर संत नामदेवरायांनी किंकर म्हणजे सेवक बनून त्याचा आसेतू हिमाचल विस्तार केला. भागवत धर्माच्या प्रचाराचे व प्रसाराचे महनीय कार्य संत नामदेवरायांनी केले.

संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥
ज्ञानदेवे रचिला पाया । उभारिले देवालया ॥
नामा तयाचा किंकर । तेणे विस्तारिले आवार ॥

वारकरी संप्रदायातील भागवतधर्माच्या मंदिराच्या उभारणीत संत नामदेवमहाराज यांचे योगदान फार मोलाचे आहे. त्याकरिता ते सेवक बनले. भारतभर तीर्थाटण त्यांनी केले. महाराष्ट्राबाहेर उत्तरेत खास करून पंजाबमध्ये त्यांनी बराच काळ वास्तव्य केले. सर्व प्रकारचे भेदभाव मिटविले. भागवत धर्माच्या ध्वजासमीप त्यांना संघटीत केले. एका अर्थाने राष्ट्रीय ऐक्यच साधले. माणूस धर्म जोपासला.

'नामे नारायण नहीं भेद ।'

ही विचारधारा जीवनधारा बनवून तिला आनंदधारा केले. परिणाम आज पंजाबात जागोजागी संत नामदेव महाराजांची भव्य मंदिरे, गुरुद्वारे पहावयास मिळतात. 'गुरुग्रंथसाहेब' यात संत नामदेवांची ६१ पदे वाचावयास मिळतात.

खरोखरीच वारकरी संप्रदायातील संत नामदेवांचे स्थान व त्यांचे

कार्य हिमालयासारखे उत्तुंग आहे. वारकरी संप्रदाय हा सर्वसमावेशक आहे. इथे कोणताही भेदभाव नाही.

यारे यारे लहान थोर । याति भलती नारी नर ।।
अशा या वारकरी संप्रदायात सर्वांना अधिकार आहे.
सकळाशी येथे आहे अधिकार ।
कलियुगी उद्धार हरिनामे ।।

संत नामदेवांनी या विचारास अनुसरून मोठी क्रांतीच केली आहे. एक आदर्श घालून दिला आहे. संत नामदेवांनी संत चोखोबाराय यांना शिष्यत्व दिले. पुढे मंगळवेढ्यास गावकूस बांधताना ते कोसळले आणि संत चोखोबाराय त्यात गाडले गेले. तेव्हा संत नामदेवराय यांनी मंगळवेढ्याहून त्यांच्या अस्थी पंढरपुरी आणल्या आणि आपला लाडका शिष्य संत चोखोबाराय यांची समाधी पंढरपुरी, महाद्वारातच श्रीविठ्ठलमंदिरासमोर बांधली. संत जनाबाईंसही आपल्या घरी आणून, आपल्या परिवारातील एक सदस्य बनविले. इतकेच नव्हे तर देवालाही तिच्या जात्यावर दळताना आनंद वाटू लागला. हा अधिकार संत जनाबाईंस लाभला तो संत नामदेवांच्या सहवासात.

सत्संगत भवति साधुतः ।।

वारकरी संप्रदायात नामस्मरणाला विशेष महत्त्व आहे. संत नामदेवांनी नामस्मरणाचा अपरंपार महिमा गाइला आहे. नामस्मरण रूप 'हरिपाठ' ही वारकऱ्यांची संध्या आहे. संत नामदेवांनी चोवीस नामांचा महिमा हे अभंग प्रकरण लिहिले आहे. खरोखरीच वारकऱ्यांनी संध्येसारखे नित्य म्हणावे असे हे अभंग प्रकरण आहे. भक्तीभाव, भक्तीप्रेम वृद्धिंगत करणारे आहे.

नामस्मरण हा वारकऱ्यांचा मूलाधार आहे. म्हणून संत नामदेवांनी या नामस्मरणाचा महिमा गाताना सांगितले आहे की, 'नामस्मरण' हे सांप्रत कलियुगातील सर्वात सोपे असे भक्ती करण्याचे साधन आहे. तिथे कोणताही भेदभाव नाही. तिथे कशाचेही बंधन नाही. न काळाचे न वेळेचे. व उंच-नीच योनीचे. सकळाशी येथे आहे अधिकार हे सांगताना संत नामदेव म्हणतात -

काळ वेळ नसे नामसंकीर्तनी ।
उंच-नीच योनी हेही नसे ।।
या करिता एकच करा,
धरा नाम कंठी सदासर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ।।

असा सर्वांना हवासा वाटणारा; सर्वांना सहज करता येणारा आचारधर्म वारकरी संप्रदायात आहे. त्याचाच महिमा नामदेवरायांनी गाऊन वारकरी संप्रदाय सर्वांना जवळचा केला. सकलांना नामस्मरणाची अवीट गोडी लावली. वारकरी संप्रदायात कीर्तनास अत्यंत महत्त्व आहे. कीर्तन हे जनजागृतीचे अत्यंत प्रभावी साधन आहे. संत नामदेवराय हे तर कीर्तनाचे मुकुटमणीच होते. भागवत धर्माच्या प्रचार व प्रसारासाठी त्यांनी कीर्तन हे माध्यम स्वीकारले व जनजागृतीचे महनीय कार्य भारतभर केले. संत नामदेवराय यांच्या कीर्तनाचे वैशिष्ट्य म्हणजे बोलू ऐसे बोल । जेणे विठ्ठल डोले ।। संत नामदेवांच्या कीर्तनाने आनंदून प्रत्यक्ष श्रीपांडुरंगही डोलत असत. असे भक्तीरसपूर्ण कीर्तन होते संत नामदेवांचे. संत नामदेवांनी कीर्तनरंगाचे माध्यमातून विठ्ठल भक्तीची आणि वारकरी संप्रदायाची पताका उत्तर भारतात अगदी सरहद्दीपर्यंत मोठ्या डौलाने फडकविली. संत नामदेवांच्या कीर्तनरंगाने वारकऱ्यांची निष्ठा दृढ झाली. पंढरीच्या वारीला मोठ्या भक्तीभावाने व मोठ्या संख्येने वारकरी येऊ लागले. दिंड्या पताकांचे भार दिसू लागले. वैष्णव त्यात तन्मयतेने नाचू लागले. दिंड्या पताका वैष्णव नाचती । असा पंढरीच्या वारीचा सोहळा थाटामाटाने होऊ लागला. त्याचे वर्णनही संत नामदेवांनी आपल्या अभंगात केले आहे. ते असे -

कार्तिकी एकादशी । पोहा मिळाला पंढरीसी ।।
दिंड्या गरुड टकयांचे भार । वैष्णव नाचती जयजयकार ।।

वारकरी संप्रदायात संत नामदेवांच्या कीर्तन रंगाने वारकऱ्यांना अक्षरशः रंगून टाकले. पंढरीची वारी म्हणजे त्यांना सुगीचेच दिवस वाटू लागले.

आषाढी कार्तिकी हेचि आम्हा सुगी ।
शोभा पांडुरंगी धनवटे ।।

स्वतः श्रीपांडुरंगही संत नामदेवांच्याकडे आपले गुपीत सांगताना म्हणतात -

आषाढी कार्तिकी विसरू नका मज ।
सांगतसे गूज पांडुरंग ।।

संत नामदेवांनी आपल्या कीर्तन रंगातून भगवंताच्या हृदयातील गुपीत सांगितले. असा कीर्तनरंग होता संत नामदेवांचा. सर्वांना भारावून टाकणारा. संत नामदेवांनी कीर्तनाचे द्वारे जनजागृतीचे महनीय कार्य केले. विठ्ठलभक्तीची एक प्रचंड लाटच निर्माण केली.

धर्म व नीतीचा पाया असणारे तत्त्वज्ञान सुलभ केले. धर्म व तत्त्वज्ञान याचा कणा असणारी नीति सोप्या भाषेत सांगितली. भक्ती हेच साधन व साध्य आहे आणि तेच मानवी जीवनाचे सर्वश्रेष्ठ ध्येय आहे हे सांगून भक्तीचा डांगोरा पिटला. सकल सद्गुणांची जोपासना केली. भक्तीपथावरील पांथस्थ बनविले. लोकांचे जीवन भक्तीने भरून गेले व इतरांना त्यांनी भारावून टाकले. वारकरी संप्रदायात संत नामदेवांच्या कीर्तन भक्तीचा प्रभाव मोठा विलक्षण होता.

वारकरी संप्रदायातील संत नामदेवांचे कार्य महनीय आहे व त्यांचे त्यातील स्थानही मोठे आहे. मानवी जीवनात विवेक फार महत्त्वाचा. संत नामदेव आपल्या उपदेशपर अभंगातून वारकऱ्यांनी विवेकाची कास धरावी. आत्मनात्म विवेक ठेवावा असा उपदेश ते करतात. त्यामुळे संत नामदेवमहाराज यांचे उपदेशपर अभंग हे वारकरी संप्रदायाची आचार संहिताच आहे.

संत ज्ञानदेवांच्या प्रमाणे संत नामदेवांनीही पसायदान मागितले आहे. त्यात संत नामदेवराय सूक्ष्म विचार करतात. कल्पाच्या अंतापर्यंत हरिदासांच्या कुळांना आयुष्य मागतात. त्यामुळे समाजात सज्जनांची

मांदियाळी निर्माण होईल. कल्पनेच्या बाधेचा ते विचार करतात. अहंकाराचा वारा सुद्धा माझ्या राजसांना लागू देऊ नको अशी विनंती करतात. शेवटी ज्याच्या मुखी पांडुरंग हा निधानासारखा आहे. खजिन्यासारखा आहे, पांडुरंगाचे नाव ज्याला खजिना वाटतो त्याचे कल्याण असू दे. अशी पसाय प्रार्थना ते करतात. वारकरी संप्रदायात कीर्तन समाप्ती होते ती या संत नामदेवांच्या पसायदानाने.

संत नामदेवराय पसायदान मागताना म्हणतात,

आकल्प आयुष्य व्हावे तया कुळा । माझीया सकळा हरिचिया दासा ।।१ ।।
कल्पनेची बाधा न हो कोणे काळी । ही संत मंडळी सुखी असो ।। २ ।।
अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासा भाविकासी ।। ३ ।।
नामा म्हणे तया असावे कल्याण । जया मुखी निधान पांडुरंग ।। ४ ।।

वारकरी संप्रदायातील संत नामदेवांचे स्थान खरोखरीच फार मोठे आहे. दीपस्तंभासारखे आहे.

प्रा. प्र. द. निकते
'श्रीयोगीराज' गाताडे, प्लॉट नं. ४३६८ / १ ब १,
पंढरपूर - ४१३३०४ (फोन ०२१८६ - २४३८५)

# हमारा संत नामदेव और उनकी हिंदी सेवा

**डॉ. चंद्रकांत म. बांदिवडेकर**

अवकाश प्राप्त प्रोफेसर एवं अध्यक्ष हिन्दी विभाग मुंबई, विश्वविद्यालय हिन्दी और मराठीके २८ पुस्तके प्रकाशित. राज्यीय / राष्ट्रीय नौ पुरस्कार प्राप्त. विश्वविद्यालय अनुवाद आयोगकी एमरेटस फेलोशिप. ३०० से अधिक लेख हिन्दी, मराठी, अंग्रजीमें प्रकाशित. ५० से अधिक राष्ट्रीय सेमिनारोमें सहभाग. हिन्दी-मराठी समीक्षक.

समूचा मध्ययुगीन भारतीय सन्त साहित्य विलक्षण समृद्ध है और सन्त साहित्य में जितने महान कवि हुए उनकी समकक्षता करनेवाला दूसरा युग-साहित्य नहीं है। इस युग के भक्त कवियों में मनुष्य जीवन के मूल्यों एवं दार्शनिक विचारधारा को लेकर अद्‌भुत समानता है। ये सारे सन्त ईश्वर के प्रति समर्पित और ऐहिक जीवन की ऐंद्रिय सुख संवेदना के प्रति उदासीन है। भगवान उनके लिए अंतिम प्राप्य है। और उसकी ओर जाने का रास्ता उनकी दृष्टि में भगवत्-भक्ति ही है। चूँकी यह भगवान उच्चतम मूल्यों का विग्रह है, भगवान की सही भक्ति एक प्रकार से आदर्श मनुष्य की उदात्त सेवा ही है, अतः मनुष्य जीवन से वह दृढतापूर्वक जुडी है। नामदेव उसी सन्त परंपरा के प्रमुख आधार स्तंभों में से एक थे।

नामदेव का जन्म २६ अक्टूबर १२७० में हुआ और मृत्यू ३ जुलाई १३५० में। नामदेव के पिताश्री का नाम दामाशेटी था और माता की नाम गोणाई। सामान्यतः यह माना जाता है कि मराठवाडा में नरसी-बामणी गाँव के रहनेवाले दर्जी परिवार में नामदेव का जन्म हुआ। लोक प्रचलित यह भी मान्यता है कि विठ्ठल की मनौती के फलस्वरूप नामदेव के पिता-माता को पंढरपुर में यह पुत्ररत्न प्राप्त हुआ। यह निश्चित है कि नामदेव पर विठ्ठलभक्ति का जो गहरा संस्कार हुआ वह उनके परिवार का ही विरसा था। नामदेव का विवाह राजाई नामक स्त्री से हुआ और उन्हें नारायण, महादेव, गोविंद और विठ्ठल नामक चार पुत्र हुए। नामदेव की विठ्ठल के प्रति भक्ति बढने लगी और गृहस्थ धर्म के प्रति उदासीनता भी। परिणामतः उनकी भक्ति का घर में विरोध भी होने लगा, लेकिन नामदेव पर भक्ति का नशा ऐसा चढा था जो अन्त तक नहीं उतरा।

नामदेव और ज्ञानेश्वर की भेंट १२९१ के आसपास हुई और ज्ञानेश्वर के अनुरोध पर वे तीर्थयात्रा करने निकले। वैसे नामदेव के गुरु विसोबा खेचर माने जाते हैं। ज्ञानेश्वर के साथ यात्रा में जीवन और जगत्संबंधी उनके ज्ञान का विस्तार हुआ। तीर्थयात्रा से लौटनेपर ज्ञानेश्वर ने १२९६ में समाधि ली और नामदेव ने उर्वरित जीवन के ५४ वर्ष भागवत धर्म के प्रचार में लगा दिया इसी उद्देश्य से नामदेव ने दक्षिण और उत्तर की कई यात्राएँ कीं। "कीर्तन के रंग में नाचे और दुनिया में ज्ञानदीप लगाएँ।" यह नामदेव के जीवन का उद्देश्य था।

उत्तर भारत में यात्रा करते समय उन्होंने हिन्दी सिखी और कतिपय रचनाएँ हिन्दी में की। गुरुग्रंथ साहब में उनके ६१ पद समाविष्ट हैं। नामदेव के करीब सवा सौ पद हिन्दी में हैं। कहा जाता है पंजाब में नामदेव की शिष्य परंपरा बडी है। नामदेव के कुछ शिष्य पंढरपुर आये। पंजाब में के कई मंदिर आज भी दिखाई देते हैं। राजस्थान एवं उत्तरप्रदेश में भी नामदेव के मंदिर विद्यमान हैं। उत्तर भारतीय संत रैदास या रविदास, धना, रज्जव, तुलसीदास, पीपा, रामानंद, कबीर आदि ने नामदेव का गौरवपूर्ण उल्लेख किया है। गुजरात के महान कवि संत नरसी मेहता ने नामदेव का अनेक बार उल्लेख किया है। मीराँबाई के एक पद में उल्लेख आता है कि भगवान ने नामदेव की कुटिया छवायी थी। नामदेव ने दक्षिण यात्रा में श्री शैल शिखर, अरुणाचलम्, चिदंबरम्, विष्णुकवी, रामेश्वर आदि स्थानों को देखा। दक्षिण के दर्जी लोगों ने अपनी जाति को नामदेव जाति कहना शुरू किया। समूचे भारत में नामदेव ने यात्राएँ कीं।

अस्सी वर्ष के बाद उन्होंने प्राणत्याग करने का निश्चय किया और विठ्ठल से आज्ञा मांगी। असाढ वद्य त्रयोदशी को उन्होंने महासमाधी ली। पंढरपुर के देवालयके महाद्वार की पहली सीढी पर ही समाधिस्थान तैयार किया गया क्योंकि नामदेव की इच्छा थी कि विठ्ठल के दर्शन के लिए आये भकत की पदरज उनके माथे पर लगे। यह भी कहा जाता है कि नामदेव के अनेक परिवारवालों ने उसी समय समाधी ली।

नामदेव के पदों के संकलन को 'नामदेव गाथा' कहा जाता है। अनेक विद्वानों ने गाथाएँ संपादित की परंतु इस दिशा में हुए प्रयास उतने शास्त्रीय नहीं हैं। महाराष्ट्र शासन द्वारा नियुक्त नामदेव गाथा समिति ने नामदेव गाथा संपादित की हैं। इसमें मराठी २१०७ और हिन्दी २३७ अभंग हैं। कुछ विद्वानों ने नामदेव के कुल अभंग चार-पाँच सौ ही बताए। नामदेव के नामपर अनेक उत्तरवर्ती संतों और कवियों ने रचनाएँ लिखीं। नामदेव के अनेक अभंगों में अपने चरित्र के कुछ प्रसंगों, कुछ घटनाओं का उल्लेख किया गया है। अतः अभंगों के आधार पर नामदेव का चरित्र भी प्रस्तुत किया जाता है। परंतु अभंगों की प्रामाणिकता के संबंध में संदेह प्रकट करते हुए संत साहित्य के प्रकांड विद्वान डॉ. श्री. दे. कुलकर्णी ने अनेक अभंगों को प्रक्षिप्त बताया है।

नामदेव के अभंगों में विठ्ठल भक्ति उत्कट रूप मे व्यक्त हुई है। भक्ति की प्रक्रिया में अपने छोटे छोटे अपराधों, गलतियों को बडा पाप कह कर पीडित होना प्रायः सभी संतों का वैशिष्ट्य दिखता है। नामदेव भी इसके अपवाद नहीं हैं।

नामदेव के अभंगों में परिवार के सदस्यों के साथ उनके संघर्ष का रूप नाट्यमय ढंग से चित्रित हुआ है । नामदेव भक्तिमार्ग में पारिवारिक कर्तव्यों के प्रति उदासीन रहे और धन कमाने की ओर ध्यान न दे पाये । इसको लेकर नामदेव की माँ और नामदेव के बीच हुए संघर्ष का मनोरम वर्णन अभंगों में मिलता है । आखिर नामदेव की माँ गोणाई भगवान को भी आडे हाथों लेती है । नामदेव की पत्नी के स्वर में तीखापन है । वह कहती है - 'लावोनि लंगोटी जालेती गोसावी। आमची उठाठेवी कोण करी ॥' 'अर्थात् लंगोटी लगाकर आप तो संन्यासी हुए, हमारी फिक्र कौन करेगा ।' राजाई चिढकर पूछती है 'काय खावे आता दिवस किती । घालू या पोरास काय आता ॥' अर्थात् अब हम क्या खायें इनके विठ्ठलने तो हमे भीख माँगने को बाध्य किया । मैं कितने दिन अनशन करूँ और इन बच्चों को क्या खिलाऊँ? आखिर निराश और हताश होकर वह जहर खाने का निश्चय करती है - 'बाळेंसहित विष घेईन मी आता । पाहे पंढरीनाथा बुडवीन घर ।' अर्थात् बच्चों के साथ मैं अब जहर खा लूँगी और देख पंढरीनाथ मैं घर को डुबों दूँगी । लेकिन इस समस्त पीडा के बीच नामदेव की विठ्ठल भक्ति अविचल रही ।

नामदेव भगवान विठ्ठल के प्रेम में लीन होकर उत्कटता से गा उठते हैं।

प्रेमपिसे भरले अंगी । गीतें छंदें नाची रंगी ।
कोण वेळे काय गाणे । हे तो भगवंता नेणें ॥

अर्थात् प्रेम के पागलपन का शरीर पर दबाव पैदा होने पर गीत एवं पद लिखे जाते हैं । नाच में तल्लीन होना होता हैं । किस समय क्या गाया जाय यह तो भगवान को ही मालूम नहीं होता । आगे वे लिखते हैं ऐसे बोल बोलूँगा कि जिनसे विठ्ठल डोलने लगे, सभी अंगों मै प्रेम भर जाता हैं । वाणी मै रखुमाई का उद्‌घोष रहता है, कीर्तन के रंग में नाचा जाता हैं । दुनिया में ज्ञानदीप लगाये जाते हैं । कहा जाता हे कि नामदेव ने सौ करोड अभंग रचने की प्रतिज्ञा की थी और प्रतिज्ञा को पूर्ण करने की जिम्मेदारी पांडुरंग पर छोडी । अतः पांडुरंग ने सरस्वती को नामदेव की जीभ पर विराजमान होने को कहां ।

नामदेव ने मुक्तक स्वरूप की रचना की । उनकी अभंगवाणी एक प्रकार से उनके उत्कट अनुभवों की अभिव्यक्ति है । उसमें भक्ति भावना की तीव्रता है, आत्मकथात्मक प्रसंगों का सहज प्रकटीकरण है, कीर्तन के अवसर पर श्रोताओं के सामने अवसर के अनुसार प्रकट किये हुए भाव एवं विचार हैं, विठ्ठल के प्रेम के आवेश में उत्पन्न तरंगों की निश्चल अभिव्यक्ति हैं । नामदेव ने विशेष अध्ययन नहीं किया था परंतु उस समय के वातावरण में व्याप्त दार्शनिक विचार उन्होंने अपनी सहज बुद्धि से ग्रहण किये थे । वे कबीर की तरह ही बहुश्रुत थे । नामदेव के गुरु योगाचार्य थे । अतः योगमार्ग संबंधी उल्लेख उनकी कविता में इसीलिए आये हैं । ज्ञानदेव के सानिध्य के कारण उनकी प्रकांड विद्वत्ता का प्रभाव भी नामदेव ने ग्रहण किया था । विठ्ठल के अनेक रूप नामदेव की कविता में आते हैं परंतु मुख्य माता का रूप अधिक उत्कट रूप में प्रकट होता है । माँ के निश्चल, निःस्वार्थ, असीम और निरपेक्ष प्रेम का नामदेवजी पर बहुत जबरदस्त आकर्षण था । वे लिखते हैं - तुम मेरी माँ हो, मैं तुम्हारा नन्हा बालक हूँ । हे पांडुरंग तुम मुझे अपने प्रेम का दूध पिला दो । तुम माँ हो तो मैं बछडा हूँ, पांडुरंग दूध को रोकना नहीं । तुम हरिणी मैं छौना हूँ, पांडुरंग, मेरे सांसारिक बंधन छुडवाने में सहायता करो । तुम पक्षिणी हो मैं अंडज हूँ । पांडुरंग, मुझे चारा खिला दो । कछुवे की नजर सदैव अपने बालक पर रहती है वैसी ही दया पांडुरंग तुम मुझ पर करो । भक्ति में इतनें एकाग्र हैं कि कहते हैं कि विठाई विना आँखो को कुछ नहीं दिखाई पडता और अन्य सभी बातों के प्रति सर्वथा ऊब पैदा हो गयी है ।

प्रायः नामदेव सभी देवताओं के प्रति सहिष्णु हैं और समभाव से ही देखते हैं । परंतु विठ्ठल के प्रति तीव्र प्रेमावेग में वे कभी कभार एकाग्र तल्लीनता का अनुभव करते हैं । वे कहते हैं - शिव विष्णु दोनो एक ही अवश्य हैं, वेदोंने यही स्पष्टतः कहा है, नामदेव कहते हैं कि इनको लेकर पर-भाव नहीं रखना चाहिए । जो विष्णु है वही शिव है जो शिव है वही विष्णु है । पंढरी का माहात्म्य, नामस्मरण की महत्ता, देह कष्ट के प्रति अरुचि, उनके अभंगों के अन्य विषय हैं । यद्यपि धीरे धीरे सगुण भक्ति से वे निर्गुण भक्ति की ओर उन्मुख हुए दिखते हैं, फिर भी मुक्ति पर भक्ति को तरजीह देने में संकोच नहीं करते । वे भक्तिरस को प्राप्त करने के लिए बार बार जन्म लेना चाहते हैं । वे कहते हैं जो पंढरपुर की वारी छोड कर मुक्ति की माँग करते हैं वे भिखारी हैं । वे लिखते हैं कि भक्ति के आनंद और उत्कट संवेदन में ही मुक्ति हैं । वे पांडित्य पर विश्वास नहीं करते । वेदों को पढने का श्रम क्यों कर रहे हैं ? अपनी वाणी से सतत हरिनाम लो । कहीं उनका उपदेश हैं नाचते, उडते, रोते, गिरते, आते, जाते, हँसते, बोलते, खाते, वे मुख से हरिनाम लेना पसन्द करते हैं । नामदेव ने उपहास अनुष्ठान, दान-व्रत, यज्ञ आदि का अवलंब करने की अपेक्षा हरिनाम स्मरण को महत्त्व दिया है । शरीर को दंडित कर कृछ साधना करने वाले की वे भर्त्सना करतें हैं । अघोरी पूजा का विरोध करते हैं । नामस्मरण, कीर्तन, भजन पर आधारित वैष्णव धर्म जातिभेद, पंथभेद, लिंगभेद, से ऊपर उठाता हैं । वे कहते हैं : "ब्राह्मण हो शूद्र वैश्य नाहीतर । सर्वांसी आधार नाम सत्य । सोवळे ओवळे उंच नीच वर्ण नाही देखे गुण दोष काही ॥" अर्थात्, ब्राह्मण वैश्य, शूद्र, नारी कोई भी हो सभी का आधार हरिनाम हैं । पवित्र अपवित्र, ऊँच-नीच वर्ण ऐसा कुछ भी अन्तर यहाँ नहीं हैं ।

नामदेव मराठी साहित्य के पहले गीति कवि हैं । गीतिकाव्य के वैशिष्ट्य उनकी रचना में प्रचूर मात्रा में दिखते हैं । उन्हें अलंकारों का आकर्षण नहीं हैं । वे विशिष्ट भाव का प्रभाव उत्पन्न करने के लिए पुनरुक्ति का सहारा लेते हैं । प्रायः उनकी भाषा बोली भाषा के निकट रही है और उसमें संस्कृत प्रचुरता का अभाव हैं; क्योकि वे लोक कवि थे । वात्सल्य, करुणा और भक्ति रस उनकी कविता मै प्रचुर रूप मै प्रकट हुए हैं, अपनी पीडा, दीनता, विवशता का आर्त स्वर में प्रकटीकरण करते हुए विठ्ठल से भक्ति का वरदान माँगते हैं ।

नामदेव महाराष्ट्र के भागवत धर्म के अग्रयणी प्रचारक हैं और उन्होंने अपनी उत्तर दक्षिण की यात्राओं में मराठी से अन्य भाषाओं में

रचनाएँ की हैं। उनकी प्रचुर हिन्दी रचना पायी जाती हैं। उत्तर भारत के संतों को प्रभावित करने वाले वे एकमात्र मराठी संत हैं। उत्तर में हिन्दू-मुसलमान धार्मिक संघर्ष से भी उनकी हिन्दी रचना प्रभावित हैं। नामदेव का एक हिन्दी पद द्रष्टव्य हैं।

हिंदु अंधा तुरकु काला
दुहाँ से गिआनी सिआणा।
हिंदु पुजैं देउरा मुसलमान, मसीहत
नामे सोई सेविआ जई देहुरा न मसीत ॥

हिंदू-मुसलमानों के धर्म भेद के संघर्ष में प्रायः सभी सन्तों ने महान मानवीय मूल्यों का समर्थन करते हुए इस संघर्ष की व्यर्थता को बताया हैं। नामदेव ने भी यह कार्य किया हैं।

नामदेव की हिन्दी पर मराठी का प्रभाव हैं। वह व्याकरण की शुद्धता की पर्वाह नहीं करते, लोक संप्रेषण ही उनका प्रमुख उद्देश्य रहा है। नामदेव भारतीय भाषाओं में सहिष्णुता और भावात्मक एकता उत्पन्न करनेवाले पहले मराठी के हिन्दी सेवी कवि थे। सर्वधर्मसमभाव रखनेवाली उदार और मानवीय मूल्यों से ओतप्रोत वैष्णव भक्ति को जनसामान्यों में प्रचार प्रसार करनेवाले जन कवियो में नामदेव शीर्षस्थ कवि थे।

गुजरात, मध्य प्रदेश, सिंध, पंजाब, हिमाचल प्रदेश में नामदेव ने यात्राएँ की और सत्संग किया। इसी का फल हैं कि उन्होंने संपर्क भाषा के रूप में हिन्दी की उपयोगिता और महत्त्व को जाना और हिन्दी में अनेक रचनाएँ की।। 'नामदेव अनेक भाषाओं के जानकार थे परंतु मराठी के अतिरिक्त हिन्दी में ही सर्वाधिक रचना उन्होंने की। यह इस बात का प्रमाण है कि आवागमन के आधुनिक साधनों के अभाव में भी जब पैदल तीर्थ-यात्राएँ भारत भर में होती थी, तब संपर्क भाषा के रूप में हिन्दी को सहज रूप में स्वीकार किया गया था। वैसे ज्ञानेश्वर से लेकर तुकडोजी महाराज तक महाराष्ट्र के सैकडो संतों ने हिन्दी में थोडी बहुत रचनाएँ की है परंतु नामदेव की हिन्दी सेवा विशेष महत्त्वपूर्ण मानी जाती है। एक दक्षिणके मराठी संत की हिन्दी रचना का इतने बडे पैमाने पर गुरुग्रंथ साहब में समाविष्ट किया जाना भारत के लोक-मानस की अखंडता का प्रमाण है। इससे बढकर भारतीय एकात्मता का और प्रमाण क्या चाहिए ?'

नामदेव ज्ञानेश्वर की भाँति ज्ञानी भक्त नहीं थे। वे भक्ति का प्रचार करनेवाले भावुक भक्त थे। अतः उनके पदों में भक्त की व्याकुलता, पीडा, प्रतीक्षारतता, आतुरता व्यक्त हुई है। भगवान के प्रति वे इतने समर्पित थे कि तल्लीनता में उन्हें सर्व विठ्ठल ही नजर आता था। वे विठ्ठल को माता मानकर एक निष्पाप बालक की भाँति उसके साथ अपना नाता जोडते हैं।

वारकरी समन्वयवादी उदार पंथ हैं। इसमें विष्णु और महादेव एक ही भगवान के रूप हैं। नामदेव जैसे सौजन्यशील, विनयी और सहिष्णु व्यक्तित्व के अनुकूल यह बात थी। वे कहते हैं -

इसी राम को वे विठ्ठल कहते हैं और यह विठ्ठल ही विठ्ठल नजर आता हैं। वे इस सर्वत्र व्याप्त विठ्ठल के साक्षात्कार से अनुभूत होकर बोलते हैं -

जब जाऊं तब बीठल भेला
बीठलियाँ राजाराम देवा।
आऊँ तो बीठल जाऊँ तो बीठल।
बीठल व्यापक माया ॥
नामा का चित हरिसुं लागा।
ताथें परम पद पाया ॥

उसी तरह इस भगवान की विश्वव्यापकता का यह उत्कट अनुभव देखिए :

सबै घट रामु बोले राम बोले
रामु बिना को बोले रे ॥
एकल माटी कुंजर चींटी
भाजन है बहु नाना रे ॥
अस्थावर जंगम कीट पतंगम
घटि घटि रामु समाना रे ॥
सकल चिन्ता राखु अनंता
अऊर तजहु सभ आसा रे
प्रणवे नामा भए निहकामा
को अकुल को दासा रे।

राम, विठ्ठल, गोविंद, केशव, माधव, कृष्ण, नारायण हरि सब नामदेव के लिए एक ही हैं - विठ्ठल है, ब्रह्म हैं।

नामदेव के लिए सभी रूपों में एक ही भगवान दिखते हैं उसी तरह उनके लिए मनुष्य भी जात, धर्म, भाषा, प्रदेश, पंथ आदि से परे और ऊपर है। मनुष्य मनुष्य के बीच भेद उत्पन्न करने वाली सभी दीवारों को गिराने के लिए मध्ययुगीन संतों ने अपनी वाणी प्युक्त की थी। नामदेव इसी परंपरा के अगुआ थे। हिंदु और मुसलमान धर्मभेद के नाम पर लडते थे और मानवीय मूल्यों को होम करते थे। उस समय संतों ने भेदों के परे विद्यमान एक तत्त्व का - भगवान का सशक्त संकेत करके भारतीय एकात्मता को सुरक्षित रखा।

नामदेव आंतरिक सात्त्विक शुद्ध भक्ति-भावना के कायल थे। धर्म या संप्रदाय के नाम पर चल रहे पाखंड को वे स्वीकार नहीं करते थे। वे कर्मकांड का मखौल उडाते हुए बोलते है -

आनीले कुंभ भराइले उदकु ठाकुर कऊ इनसानु करऊ
बहआलिस जखजी जल महिं होते बीठलू मैला काई करऊ ॥

हम गागर भरकर पानी लाते हैं और भगवान को नहलाते हैं परंतु वह पानी शुद्ध कहाँ होता हैं। उसको लाखों जीव मैला किए हुए होते हैं।

इसी तरह वे बोलते हैं ठाकुर पर फूल चढाते हैं लेकिन वह भ्रमरोंद्वारा जूठा किया हुआ होता हैं। दूध की खीर बनाकर नैवेद्य अर्पित करते हैं परंतु वह दूध बछडे की जूठन होता हैं।

यह युक्तिवाद, यह तर्क और यह पाखंड के प्रति फटकार कबीर की पूर्ववर्ती परंपरा है। पाखंड करनेवालों को वे साफ बता देते हैं।

पाखंड भक्ति राम नहिं रीझै

बाहरी अंधा लोग पतीजे

एक पद मे पाखंड पर आघात करते हुए वे कहते है -

भगत भला बाबा काइला
बिन परतीतैं पूजै सिला
न्हावै छोवै करै सनान ।
हिरदै आंषिन माथै कान ।।
गलि पहि रैं तुलसी की माला ।
अंतरगति कोइला सो काला ।।
नामदेव लडे ये पेढा बलू
भीती लाव उदरि हिंगलू

नामदेव ने भक्ति का अधिकार सब के लिए प्रदान किया जो वारकरी पंथ की एक विशेषता रही ।

नामदेव ने अपनी विरहार्तता विलक्षण उत्कट आवेश में और साफ शब्दों में व्यक्त की है :

तुम बिन धीर येकु रहुँ नहिं न्यांरा
सुन केसव यह नियम हमारा ।।
जहाँ तुम गिरिधर तहां हम चकीरा
जहाँ तुम चंदा तहां मैं चकोरा ।।
जहाँ तुम तरुवर तहाँ मैं पंछी
जहाँ तुम सरोवर तहाँ मैं मच्छी ।।
जहाँ तुम दिवा तहाँ मैं बत्ती
जहाँ तुम पंथी तहा मैं साथी ।।
जहाँ तुम शिव तहाँ मैं बेलपूजा
नामदेव भाव नहीं दूजा ।।

नामदेव की भाषा विभिन्न भाषाओं के संस्कार ग्रहण कर बनी सधुक्कडी भाषा हैं जिस मैं व्याकरण के नियमों का पालन नहीं हैं, किसी भी अन्य भाषा के शब्दों, प्रभावों से परहेज नहीं है । वे अनेक जातियों के भक्तों से सत्संग करते थे अतः उनके व्यवसायोंके शब्द नामदेव के पदों में भरपूर पाये जाते हैं । वे समाज के शिक्षक थे अतः उन्हें अपनी बात को स्पष्टतापूर्वक लोगों के सामने रखना महत्त्वपूर्ण था भाषाकी शुद्धता, नियमबद्धता, अनुशासन, सौष्ठव एवं सौंदर्य को उन्होंने साफगोई के सामने जरा भी महत्त्व नहीं दिया । उनकी हिन्दी सभी भाषाओं का और सभी भाषिक अदाओं का स्वागत करने वाली समन्वयी हिन्दी भाषा थी । नामदेव की हिन्दी पर उनकी मातृभाषा मराठी का प्रभाव तो है ही । उसके साथ अवधी, ब्रज, राजस्थानी, पंजाबी का भी प्रचुर प्रभाव है । उनके करीब सवा सौ हिन्दी पद ही प्राप्त हैं । लेकिन उनकी लंबी आयु और विपुल यात्राएँ देखते हुए अनुमान हैं कि सैंकडो पद उन्होंने रचे होंगे ।

नामदेव भारतीय भाषाओं में सहिष्णुता और भावनात्मक एकता उत्पन्न करनेवाले पहले मराठी हिन्दी सेवा कवि थे ।

डॉ. चंद्रकांत म. बांदिवडेकर
७, शाकुंतल साहित्य सहवास, बांद्रा (पूर्व), मुंबई - ४०००५१.
दूरभाष - ६४२८६६८

# तीर्थावळीतील भक्तिसंवाद

**डॉ. नरेंद्र कुंटे**

एम्.ए.पीएच.डी.

मराठी विभागप्रमुख, दयानंद कॉलेज सोलापूर. गेली २६ वर्षे अध्यापन. ८ वर्षे सोलापूर संचार व समाचारमध्ये सहसंपादक. आध्यात्म विषयावर विपुल लेखन. १० पुस्तके प्रसिद्ध झाली. संतकृपा, सज्जनगड, प्रसाद इ. मासिकांत लेखन, व्याख्यान व प्रवचन. अनेक ठिकाणी १९७८ पासून श्रीस्वामी समर्थ अक्कलकोट महाराज यांचे वार्षिक पुण्यतिथीचे संयोजन. निंबर्गी संप्रदायाचे श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून अनुग्रह. मातृमंदिर पुरस्कार - निगडी.

## १. श्रीनामदेवराय : चरित्र आणि गाथा...

श्रीसंत नामदेव महाराज हे श्रीज्ञानदेवांच्या समकालीन, पण ज्ञानदेवांच्या पश्चात सरासरी अर्धशतक राहून त्यांनी विठ्ठल-संप्रदाय वाढविला. श्रीनामदेवांचा जन्म शके ११९२ आणि त्यांचा समाधिकाल हा शके १२७२ असा आहे. ते दीर्घायुषी होते. आपल्या ८१ वर्षे असलेल्या आयुष्यकाळात त्यांनी भक्ती केली आणि भक्तिचा प्रसारही केला. महाराष्ट्रातच नव्हे तर विठ्ठलभक्तीची पताका त्यांनी उत्तर हिंदुस्थानापर्यंत, विशेषतः पंजाबात नेली. शिखांच्या 'ग्रंथसाहेब' मध्ये 'नामदेवजीकी मुखबानी' समाविष्ट केली गेली. हा त्यांच्या अलौकीक भक्तिकार्याचा यथार्थ गौरव होय, असेच म्हटले पाहिजे. श्रीनामदेवराय हे व्यवसायाने शिंपी होते. त्यांचे घराणे मूळचे परभणी प्रांतातील नरसीबामणी या गावचे. तेथून त्यांचे आईवडील पंढरपुरास येऊन स्थायिक झाले. ते विठ्ठलभक्ती करीत होते. श्रीनामदेवांचा जन्म पंढरपुरातच झाला. घरात विठ्ठलभक्तीचे संस्कार होतेच. श्रीनामदेवराय हे पांडुरंगाचे थोर सगुणोपासक होते.

## गुरुकृपेने 'पक्का-घट' झाला...

एकदा ज्ञानेश्वरादिक संतांच्या भेटीत श्रीनामदेवरायांचे अज्ञानजन्य गर्वहरण केले गेल्याची एक कथा रूढ आहे. विठ्ठलाचा 'लाडका भक्त' असा संतांनी त्यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आणि श्रीनिवृत्ती, श्रीज्ञानदेव, श्रीसोपान यांनी त्यांचे पायी मस्तक ठेवून त्यांस नमस्कार केला. श्रीनामदेवरायांचा अभिमान आणखी फुलला. मुक्ताबाईने त्यांस नमस्कार केला नाही. उलट ती गोरोबाकाका यांच्या हातातले थापटणे घेऊन आणि ते श्रीनामदेवांच्या मस्तकी थापटून म्हणाली, 'गोरोबाकाका, हे कच्चे मडके आहे.' श्रीनामदेवांस तो मानभंग वाटला. पंढरीस आला तेव्हा विठ्ठलाने सांगितले, 'अरे, अनायसे तुला संतभेटीचा लाभ झाला. त्यांचा उपदेश ऐक.' मुक्ताबाई म्हणाली होती की, 'गुरुवांचूनि तुज नव्हेचि गा मोक्ष.' श्रीनामदेवाने विसोबा खेचरांचे पाय धरले. त्यांनी त्यांस उपदेश केला. गुरुकृपेने 'ज्ञान' झाले. अज्ञानजन्य-गर्वही निमाला आणि हा घट 'पक्का' झाला. 'देव हा फक्त मंदिरातल्या मूर्तीत नाही, तो सर्वव्यापी आहे.' हे विसोबा खेचर यांनी श्रीनामदेवरायास सांगितले. इथून खरी तर परमार्थास सुरुवात झाली. तरीही परमार्थाचा पूर्ण विकास पुढे श्रीज्ञानदेवांच्या संगतीत झाला. श्रीज्ञानदेव आणि श्रीनामदेव यांनी मिळून तीर्थयात्रा केली. त्या वेळी उभयतांत 'भक्तिसंवाद' झाला. त्याचे वर्णन श्रीनामदेवरायांनी 'तीर्थावळीचे-अभंग' लिहून केले आहे.

## ज्ञानदीप लावूं जगी...

श्रीनामदेवरायांनी शतकोटी अभंग रचनेचा संकल्प केला होता. परंतु गाथेत केवळ सुमारे २५०० अभंग उपलब्ध आहेत. 'नाचूं कीर्तनाचे रंगी, ज्ञानदीप लावू जगी' ही त्यांची भूमिका आहे. सगुणोपासना आणि कीर्तनभक्ती हे त्यांच्या परमार्थाचे स्वरूप होय. 'देव माझ्याशी बोलतो, तो माझा नैवेद्य स्वीकारतो' ही सगुणोपासना होती. तर 'कीर्तनात देव येऊन डोलतो' इतका उत्कट भाव भक्तिप्रसारात होता. कीर्तन हे भक्तिप्रसाराचे माध्यम म्हणूनही त्यांनी स्वीकारले होते. अभंगवाणी हीच ज्ञानदीपासारखी असून त्याद्वारे उपदेश करण्याचे महान कार्य त्यांनी केले आहे. त्यांचे अभंग भावोत्कट, रसाळ आणि अनुभवसंपन्न असे आहेत. पंढरपुरात अगर पंढरपुराजवळ नाना जातींमध्ये जे महान भगवद्भक्त होऊन गेले त्यांचे आद्य आचार्य श्रीनामदेवमहाराज हेच होते. 'नामदेव-परिवारातील संतमंडळी' म्हणून ज्यांचा उल्लेख केला जातो, त्यांत गोराकुंभार, विसोबा खेचर, सांवता माळी, नरहरी सोनार, चोखामेळा, जनाबाई, सेना न्हावी, कान्होपात्रा यांचा समावेश केला जातो. श्रीज्ञानदेव-श्रीनामदेव यांनी केलेल्या तीर्थयात्रेच्या वेळी गोरोबा काका, विसोबा खेचर, सांवता माळी हे उपस्थित व सहभागी झाले होते, असा उल्लेख चरित्रग्रंथांतून आढळतो. तसेच 'तीर्थावळी' च्या अभंगातही या संतमंडळींचा नामोल्लेख श्रीनामदेवराय यांनी केला आहे. श्रीनामदेवांनी नामस्मरणाचे महत्त्व विशेष करून सांगितले आहे. 'केशव तोचि नामा, नामा तोचि केशव' इतकी एकरूपता नामदेव आणि विठ्ठल यांची आहे. पंजाबमधून श्रीनामदेवराय पुन्हा पंढरपुरला आले. शके १२७२ मधील आषाढ वद्य त्रयोदशीस त्यांनी आपले अवतारकार्य संपविले. त्यांची समाधी विठ्ठल मंदिराच्या महाद्वारातच असून तिला 'नामदेव पायरी' असे म्हणतात. 'नाम घेतल्याशिवाय देवद्वारी पाऊल पडत नाही' या भक्तितत्त्वाची सहजखूण म्हणून विठ्ठलपायी नामदेव उभा आहे. 'तीर्थावळी' च्या अभंगात श्रीज्ञानदेव-नामदेव यांनी परस्परांच्या सहवासात भक्तिसंवादसुख अनुभवले आहे. ज्ञान आणि भक्ती यांनी परस्परांस दिलेले ते एक दृढ-अलिंगन होय. ते 'संवादसुख' तुम्हा-आम्हास घ्यावयाचे आहे.

## २. नामदेवाभेटी ज्ञानदेव आले...

श्रीनामदेवरायांना मुक्ताबाईने जरी 'कच्चे मडके' म्हटले होते, तरी त्यांची विठ्ठलभक्ती ही वाखाणण्याजोगीच होती. फक्त विठ्ठलाच्या व्यापक रूपाची अनुभूती त्यांना आलेली नव्हती आणि सद्गुरुंना शरण जाऊन त्यांचेकडून उपदेश झाल्याशिवाय ती अनुभूती येणारही नाही. म्हणून मुक्ताबाईने श्रीनामदेवास 'गुरुबोध' करविला आहे. विसोबा खेचर यांचेकडून गुरुबोध होऊन श्रीनामदेवरायांस ज्ञान झाले. परंतु या ज्ञानाचा विकास अद्याप व्हावयाचा होता. त्यामुळेच तीर्थावळी घडली आहे. श्रीज्ञानदेवांच्या संगतीत श्रीनामदेवरायांना ईश्वराच्या व्यापक तत्त्वाची अनुभूती आली. तीर्थयात्रेच्या निमित्ताने 'भक्तिसंवाद' घडला आहे. तीर्थयात्रेची प्रेरणा ही श्रीज्ञानदेवांचीच आहे. भक्तीसुख अनुभवणाऱ्या संताचा सहवास ज्ञानमार्गी संतांना हवा होता. म्हणूनच दोन जिवाभावाच्या आध्यात्मिक सवंगड्यांनी एकमेकांच्या सहवासाचे सुख लुटण्यासाठी केलेल्या या प्रवासात 'हृदय-संवाद' केला. श्रीनामदेवाभेटी ज्ञानदेव आले. श्रीनामदेवाने त्यांचे स्वागत केले. त्यांचे पायी लोटांगण घातले, आलिंगन दिले. म्हणाले, 'धन्य तो अवसरू संत समागमु, करीतसे संभ्रमु आवडीचा ।। नामदेव म्हणे सुफळ माझे जिणे, स्वामीच्या दर्शने धन्य झालो ।। पूर्वपुण्य माझे फळासी हे आले, प्रत्यक्ष भेटले पांडुरंग ।।' एवढे म्हणून ते थांबले नाहीत. तर, 'हे गुरुमाऊली, तुमच्या चरणकमलाचा आधार असल्याने तेवढ्या आधारावर मी संसारसिंधूच्या पैलतीरी सहज जाऊ शकेन. माझा उद्धार होईल.' असाही दृढभाव बोलून दाखविला.

## अंतरीचे गूज बोलू या...

श्रीज्ञानदेव म्हणाले, 'हे नामदेवा, तू जन्मास येऊन हरिचरणाची जोड घेतली आहेस. तू हरिभक्तातील अग्रगण्य भक्त आहेस. तुझा जन्म धन्य, तुझे कुळ धन्य. पण मलाच असे वाटत आहे की, तुझ्याशी एकांतात काही मनातले बोलावे. 'अंतरीचे गूज बोलो काही' असे मला वाटत आहे. मी ज्ञानी असलो तरी भक्तीचा तुझ्यासारखा/तुझ्याइतका अनुभव मला नाही. तुझ्या सहवासात सगुणभक्तीचा प्रेमानुभव मला घ्यावयाचा आहे. नामदेवांनी हा संवाद प्रकट केला आहे. श्रीज्ञानदेव म्हणाले होते की, 'जीवन्मुक्त ज्ञानी जरी जाले पावन, तरि देवतीर्थभजन न संडिती' म्हणूनच 'भूतळीची तीर्थे पहावी नयनी, असे आर्त मनी आहे माझ्या' या शब्दातच श्रीज्ञानदेवांनी प्रवासाचा प्रस्ताव मांडला आहे. 'तुझ्या संगतीचे नित्यसुख घ्यावे' ही इच्छाही त्यांनी नामदेवाजवळ प्रकट केली आहे. 'ज्ञानदेव म्हणे पुरवी मनोरथ. करावा मुहूर्त प्रयाणासी' अशी विनवणीही केली आहे. तीर्थयात्रा करण्यामागे दोघांना परस्परांशी 'भक्तिगूज' करावयाचे होते आणि लोकसंग्रहही करावयाचा होता. तसेच देशकाल परिस्थितीही त्यांना न्याहाळायची होती. तीर्थयात्रा करण्यासाठी पंढरीबाहेर पडण्याचा प्रस्ताव श्रीज्ञानदेवांनी ठेवला खरा. पण तो ऐकताच 'काय द्यावे यासी प्रतिवचन' असा प्रश्न श्रीनामदेवरायांच्या मनात निर्माण झाला. त्याचे कारणही मोठे विलक्षण होते. पंढरी सोडायची म्हणजे पांडुरंगाचा विरह होणार, या कल्पनेनेच श्रीनामदेवराय अस्वस्थ झाले. 'सर्व सुख आहे मज पांडुरंगी, जावे कवणालागी कवणा ठाया' असे त्यांना वाटू लागले. ते श्रीज्ञानदेवांना म्हणू लागले की, 'मला मुक्ती वगैरे काहीही नको. माझे जीवन सर्वस्व हा पांडुरंग आहे. त्याच्या महाद्वारीच राहून मी त्याची भक्तिसेवा करेन. मी मंदिर सोडणार नाही आणि मूर्ती पुढूनही हलणार नाही. या विठ्ठलाच्या सुखासाठी तर मी माझे शरीर करवतीखाली दिले आहे. संसारपाश मी तोडून टाकला. इथे मी त्याचा रंक म्हणून राहात आहे.'

## विठ्ठलाकडे अनुमती मागितली...

विठ्ठल हा कामधेनु असून त्याच्याजवळ माझ्या सर्व याचना पूर्ण होतात, अशीच श्रीनामदेवरायांची भूमिका होती. मंदिर आणि मूर्ती म्हणजेच विठ्ठल, अशी त्यांची मनोधारणा होती. त्यामुळे पंढरी सोडून तीर्थयात्रेस जायला त्यांचे मन तयार होईना. त्यांनी श्रीज्ञानदेवांनाच विनविले की, 'तुम्हीच विठ्ठलास अनुमती मागावी.' त्यावर श्रीज्ञानदेव म्हणाले की, 'कळले गौप्यगुज सर्व तुझे.' श्रीनामदेवाच्या मनाची स्थिती त्यांनी जाणली. त्यांनी श्रीनामदेवास आलिंगन दिले आणि दोघे मिळून ते विठ्ठलाकडे गेले. श्रीज्ञानदेवांनी श्रीनामदेवाची मनोव्यथा सांगितली. त्यावर विठ्ठल हसला आणि म्हणाला, 'सहज तीर्थरूप तूचि निरंतर, असता हा विचार काय करिशी' त्यावर श्रीज्ञानदेव म्हणाले, 'देवा, तुम्ही म्हणता ते खरे आहे. तरीही हा जो देह मी धारण केला आहे त्याचे सार्थक व्हावे म्हणून तीर्थयात्रा आणि संतसहवास घडावा, अशी माझी आस आहे. या तीर्थयात्रेच्या निमित्ताने भक्त श्रेष्ठ श्रीनामदेवरायाचा सहवास मला लाभेल.' श्रीज्ञानदेवांनी एवढे बोलून श्रीविठ्ठलाचे चरण धरिले. श्रीनामदेवांची सगुणभक्ती केवढी श्रेष्ठ होती, हे यावरून कळून येते.

## ३. पंढरीयाची श्रीनामदेवास आज्ञा...

श्रीनामदेवाच्या सहवासाचे भक्तिसुख आपणास मिळावे, म्हणून श्रीज्ञानदेवांनी तीर्थयात्रेचा प्रस्ताव मांडला आणि श्रीविठ्ठलाकडे अनुमती मागितली. पुन्हा पांडुरंग हसला, म्हणाला, 'नामदेवा, तुझे भाग्य केवढे थोर आहे. प्रत्यक्ष परब्रह्म असलेले ज्ञानदेव तुझ्या संगतीचा आदर करतात.' जन्मास येऊन एवढे भाग्य प्राप्त झाले तर आणखी काय हवे? 'जावे स्वस्तिक्षेत्र यावे शीघ्रवत, करावे स्वहित कळेल तैसे' श्रीनामदेवावर विठ्ठलाचेही अपार प्रेम होते. 'तू तीर्थयात्रेला जा. परंतु माझा विसर मात्र पडू देऊ नकोस.' असे पांडुरंगाने श्रीनामदेवास तर सांगितलेच शिवाय त्याने श्रीज्ञानदेवासही एक विनवणी केली. 'हे कृपेचे पोसणे माझे आवडते, क्षण जीवापरते न करी कदा...' 'माझा नामदेव भोळाभाबडा आहे. त्याला सांभाळावे, त्याची तहानभूक जाणावी.' एवढे पांडुरंगाने सांगितले आहे आणि श्रीनामदेवाचा हात श्रीज्ञानदेवाहाती दिला. उभयतांनी विठ्ठलचरणी मस्तक ठेविले आणि चंद्रभागेत जाऊन स्नान केले. श्रीपुंडलीकरायाचे दर्शन घेऊन भीमेच्या पैलतीरी उतरून ते तीर्थयात्रेची वाट चालू लागले.

## विठ्ठलविरहाने नामा व्याकुळला...

श्रीज्ञानेश्वर हे ज्ञानाची मूर्ती व श्रीनामदेव हे भक्तीची मूर्ती असल्याने त्यांच्या संयोगामुळे ज्ञान आणि भक्ती या दोहोंसही महत्त्व चढले. तीर्थावळीच्या प्रवासात ज्ञान आणि भक्ती या दोन्ही विषयीच्या भूमिकाही स्पष्ट झाल्या असून ज्ञानोत्तर भक्तीची श्रेष्ठता प्रतिपादिली गेली आहे. प्रवासापेक्षाही उभयतांतला संवाद सर्वाधिक महत्त्वाचा होय. हा संवाद म्हणजे भक्तियोगाचे सारसर्वस्व आहे. विठ्ठलाच्या वियोगाने श्रीनामदेवराय तळमळतात आणि श्रीज्ञानदेव त्यांना सहजपणे त्यांतले भक्तिवर्म पटवून देऊन त्यांना तीर्थयात्रेचा प्रवास पुढे तसाच चालता ठेवण्यास प्रवृत्त करतात. त्यात ज्ञान आणि भक्ती यांचेच परस्परांशी आलिंगणे होय. श्रीज्ञानदेव विठ्ठलाचे व्यापकत्व पटवून देण्याचा प्रयत्न करतात, तर श्रीनामदेव विठ्ठलप्रेमाचाच लडिवाळ हट्ट उराशी बाळगून बसतात. परस्परांच्या अनुभवाची ही मोठी कसोटीच तीर्थावळीच्या अभंगातून पहावयास मिळते. विठ्ठलासही नामदेवाचा विरह जाणवतो. 'माझे भक्त मला सर्वप्रिय आहेत. मी त्यांचा सोयरा आहे आणि ते माझे सांगाती आहेत. भक्तरूपातच मी सदैव वसतो. दीप आणि प्रकाश कधी भिन्न होईल काय ? तसा मी आणि भक्त कधी भिन्न होऊ काय? नव्हेच नव्हे ! नामदेवावाचून मला चैन पडत नाही, अन्नही गोड लागत नाही, अशी पांडुरंगाची अवस्था झाली. रुक्मिणीने विठ्ठलाची ही अवस्था पाहिली. देवाचे भक्तावर किती प्रेम असते याची खूण तिलाही पटली. श्रीज्ञानदेवाबरोबर श्रीनामदेव हे यात्रा करीत होते तरी त्यांचे मन काही केल्या पंढरीतच अडकले होते. पंढरी नि पांडुरंग यांचा विरह त्यास सहन होईना. श्रीमन्मना विठ्ठलाचे सतत त्यांना स्मरण होऊ लागले. पाऊले पुढे पडत होती, पण मन मात्र माघारीच वळत होते. श्रीनामदेवराय व्याकूळ झाले. म्हणू लागले की, 'चिंतातूर थोर पडिलो ये परजनी, न दिसे माझे कोणी जिवलग ।। फुटोनि हृदय होती दोनी भाग, बहुता उद्वेग वाटताती ।। नामा म्हणे आपुले अनाथा सांभाळी, येऊनि हृदय कमळी राहे माझ्या ।।' तीर्थयात्रेच्या निमित्ताने मला दूर पाठविण्याची आवश्यकता काय ? असाच प्रश्न श्रीनामदेवांच्या मनात वारंवार निर्माण होत होता.

## श्रीज्ञानदेवांनी केलेली समजावणी...

श्रीनामदेवरायांच्या मनाची ही दोलायमान झालेली स्थिती पाहून श्रीज्ञानदेवांनी त्यांची समजून काढली आहे. ही समजावणी म्हणजे एक प्रकारे हितोपदेशच होय. पंढरी, राऊळ, मूर्ती एवढ्यापुरताच विठ्ठल आहे, अशी श्रीनामदेवाची ठाम समजूत होती. देव सर्वत्र आहे, सर्वकाळी आहे... इतकेच नव्हे तर तो तुझ्याजवळच आहे, हे श्रीनामदेवांना पटवून द्यायचे होते. तेच भक्तिकार्य तीर्थावळीत श्रीज्ञानदेवांनी केले आहे. श्रीज्ञानदेव सांगू लागले, 'हे नामदेवा, तू माझे म्हणणे ऐकून घे. म्हणजे तुझ्या जीवाची/मनाची अशी तगमग होणार नाही. तुला खंतही वाटणार नाही. उलट तुला माझे म्हणणे ऐकून सुख/संतोष वाटेल. आपण तीर्थयात्रा करीत आहोत. तू तर भक्तिप्रेमाचा ओलावा असलेला भक्तश्रेष्ठ आहेस. जरा विचार कर...' 'विचारी सावध होऊनि भक्तिराजा, सुखानंद तुझा तुजचि जवळी' इतके सांगूनही श्रीनामदेवाची समजूत काही होईना. उलट ते श्रीज्ञानदेवाला म्हणू लागले, 'तुम्ही ज्ञानी आहात, योगी आहात. तुम्ही म्हणता ते खरेही असेल. पण मी ज्ञानी नाही, योगी नाही. मी अगदी अज्ञ आहे. माझा पंढरीनाथ हेच माझे सुखसर्वस्व/विश्रांतीस्थान आहे. भक्तराज पुंडलिकापुढे जी श्रीमूर्ती/विठ्ठलमूर्ती उभी आहे, तीच मला आवडते. हे ज्ञानराजा, ती श्रीमूर्ती मला दाखवा.' श्रीनामदेव सगुणभक्तीने इतका भारलेला होता की, त्याला विसोबा खेचर यांचेकडून 'गुरुबोध' होऊनही ईश्वराचे व्यापकत्व कळून आलेले नव्हते. देव एकदेशीच आहे, हीच त्याची श्रद्धाभावना होती. श्रीज्ञानदेवांनी त्याची भेदहष्टी नाहीशी केली आहे.

## ४. श्रीज्ञानदेवांची श्रीनामदेवांस विनवणी...

'मला माझा पंढरीच्या राऊळातील श्रीविठ्ठल दाखवा', असे श्रीनामदेवरायांनी श्रीज्ञानदेवास सांगितले तेव्हा त्याचा ईश्वराविषयीचा एकदेशीभाव अथवा त्याची भेदहष्टी नाहीशी करण्याच्या हष्टीने श्रीज्ञानदेव म्हणाले, 'व्यापक विठ्ठलु आहे सर्वदेशी, जरी सांडोनिया पाहसी भेद भ्रमू।। तो नाही ऐसा ठाव उरलासे कवण, सर्वत्र संपूर्ण गगनजैसे ।।' 'अरे नामदेवा, तू जे विठ्ठलरूप मला दाखवा म्हणून म्हणतोस, ते तू केवळ विठ्ठलमूर्तीला उद्देशून म्हणत आहेस. ती मूर्ती एकदेशी आहे. तुझ्याजवळ भेदहष्टी असल्याने तू केवळ त्याच मूर्तीचा ध्यास घेऊन राहिला आहेस. ती भेदहष्टी सोड. देव सर्वव्यापी आहे. तू पाहशील तिथे तो उपस्थित आहे. आकाश जसे सर्वत्र व्यापून आहे, त्याचप्रमाणे विठ्ठल हा सर्वत्र आहे. तो नाही असे स्थानच तुला आढळणार नाही.' इतके सांगूनही श्रीनामदेवराय आपला हट्ट सोडेनात. 'मला त्या सर्वव्यापी देवाचे आकलन होत नाही. काया, वाचा, मने मला पंढरीतलीच विठ्ठलमूर्ती प्रिय आहे. ती पाहूनच मला आनंद होतो.' पुन्हा श्रीज्ञानदेवांनी समजविण्यास प्रारंभ केला. ते म्हणाले, 'ही तुझी भोळीभाबडी समजूत आहे. ती मनातून दूर कर. अव्यक्त ईश्वराचे/विठ्ठलाचे व्यक्त रूप म्हणजे ज्ञानीपुरुष होय. तू अद्वैतपणाने अशा सर्वव्यापी ईश्वराचे सुख जाण. त्या सुखाचा उपभोग घे.' तरीही श्रीनामदेवराय म्हणू लागले. 'तुमच्या अव्यक्त वा व्यक्त अशा ईश्वर स्वरूपाच्या फंदात मी पडू इच्छित नाही. मला पंढरीचाच पांडुरंग हवा आहे. तोच माझे सर्वसुख होय.' त्यावर पुन्हा श्रीज्ञानदेव म्हणाले, 'हे नामदेवा, तू काय म्हणतोस ते मलाही कळते. पण तू फार संकुचित हष्टीनेच एकच विठ्ठलमूर्ती पाहतोस. आम्ही तेच विठ्ठलरूप ज्ञानहष्टीने सर्वत्र पाहतो. तुझ्याही ठिकाणी तेच भगवत्-रूप आहे.' श्रीनामदेवांना ही गोष्ट पटत होती. परंतु लगेचच ती अंगवळणी पडत नव्हती. सगुणोपासनेचा दृढभाव त्यांच्या मनात भरून राहिलेला होता. श्रीज्ञानदेवाचे बोलणे खोटे नाही, हेही त्यांना जाणवू लागले. तरीही 'पंढरीचा पांडुरंग' हाच ध्यास त्यांनी मनात धरून ठेवलेला होता. 'सर्वत्र पृथ्वीवर पाणीच पाणी आहे, तरीही चातकपक्षी मेघांचेच पाणी पिण्यासाठी वाट पाहतो ना ? व्याकूळ होतो ना ! तसे माझे झाले आहे. मी भक्तरूपी चातक, केवळ पंढरीच्या

पांडुरंगरूपी मेघाच्याच कृपादर्शनाची/कृपावर्षावाची वाट पहात आहे...' 'मी न मनी लटकी हे कहाणी, परी जलधारावाचोनि चातक जैसा ।। तैसे माझे मन सारे रात्रंदिवस, पंढरीनिवास जीवन माझे.'

## अनुभवाची कसोटी...

श्रीनामदेवांचा पंढरीचा पांडुरंगाविषयीचा अव्यभिचारीपणा पाहून श्रीज्ञानदेवांनी धन्योद्‌गार काढले आहेत. दोघांच्या अंतःकरणात अपार विठ्ठलभक्ती होती. विठ्ठलाविषयीच्या प्रेमभक्तीची चर्चा करता-करता पुन्हा आणखी एक प्रसंग भक्तिसंवादाचा उद्‌भवला. पण तिथे ज्ञानदेवांनी श्रीनामदेवाला विनविले असून 'तुझ्या अलोटभक्ती प्रेमाची तू महती सांग', अशी सलगीची आज्ञा केली आहे. 'ज्ञानदेव म्हणे परियेसी नामया, अद्वैत आत्मया प्रेममूर्ती ।। भक्तिभाग्य तुवा जोडीले अविनाश, सांग पा सविलास मार्ग त्याचा ।। कैसा तो सांधावा सांग भजनविधी, कैसी नमनबुद्धी सत्वशील ।। कैसा निर्विकार ध्यानाचा प्रकार, हा सर्व विचार सांगे मज ।। कैसे ते श्रवण कैसे मनन, कैसे निजध्यासन दृढ होय ।। कवण ते भक्ती कवण ते धृती, कवण ते विश्रांती दावी मज ।। बहु उत्कंठीत या सुखाकारणे, ते मज पारणे करवी आर्जी ।। सांगे हा अनुभव साधन उपाव, विनवी ज्ञानदेव नामयासी' श्रीज्ञानदेव-श्रीनामदेव हे दोघेही थोर संत होते. श्रीज्ञानदेवांना भक्तिसुख जाणून घ्यायचे होते. श्रीनामदेवासारखा श्रेष्ठ भक्त त्यांच्या सहवासात अनायासेच तीर्थयात्रेच्या निमित्ताने आलेला होता. त्याला निमित्त करून त्याचेकडून भक्तिसुखाचा सोहळा श्रीज्ञानदेवांनी जाणून घेतला आहे. श्रीनामदेवरायांची थोरवी इथे त्यांनी नमूद केली आहे. श्रीनामदेवांचा अधिकार मोठा होता. त्यांच्या मुखातून 'भक्तीचे माहात्म्य' त्यांनी ऐकले आणि सर्वांना ऐकविले आहे. तीर्थावळीच्या अभंगात हा भक्तिसंवाद म्हणजे श्रीनामदेवरायांचे भक्तिसूत्रच होय. 'प्रेमभक्तीच्या बळावर तू अविनाशी-अव्यक्त अशा ईश्वरास जाणले आहेस, जोडले आहेस. तुझा भक्तिमार्ग सांग. तू निरूपण करावेस' अशी विनवणी त्यांनी श्रीनामदेवरायास केली आहे. भक्तिमार्गातील साधने, उपाय आणि अनुभव याविषयीची ही पृच्छा असून श्रीनामदेवरायांनी 'नवविधा भक्तिसूत्र' इथे विशद केले आहे.

## ५. नामदेवरायांनी कथिलेले भक्तिसूत्र...

श्रीज्ञानदेव हे आपल्याला भक्तिमार्गाविषयी काही विवेचन करावे असे सांगत आहेत, यावर श्रीनामदेवरायांना प्रथम आश्चर्यच वाटले. आश्चर्य वाटणे हे साहजिकच होते. श्रीज्ञानदेवांचा अधिकार श्रीनामदेव हे जाणत होते. ते सद्‌गदीत झाले. त्यांचा कंठ दाटून आला. श्रीज्ञानदेवांच्या पायांस मिठी मारून ते म्हणू लागले, 'कृपेचे पोसणे मी पंढरीरायाचे, एवढे भाग्य कैसे जाणिवेचे मज' भक्तिमार्ग विशद करावा एवढे ज्ञान मला कोठून असणार ? असा विनम्रपणाने त्यांनी प्रश्न केला. मी हीनदीन, दुबळा असा दास आहे. मला ज्ञान नाही, मला काही कळत नाही, म्हणून तर विठ्ठलाने ज्ञानदेवाहाती मला सोपविले. हे मजवर फार मोठे उपकारच घडले आहेत. त्या उपकाराच्या बळावरच मी काहीबाही सांगू शकेन. सूर्यास दाखविण्यास दुसऱ्या प्रकाशाची काय गरज आहे ? कृपणाकडे कल्पतरूने कधी याचना केली आहे काय ? कामधेनू कधी 'मी हीनदीन आहे' अशी प्रार्थना करते काय ? नाहीच नाही. तसे मी तुम्हास काय सांगणार ? तुम्हीच ज्ञानसूर्य आहात, कल्पवृक्ष आहात, कामधेनू आहात. एवढेच करा की, 'मातेचिया स्नेहे बालक बोबडे, खेळवी लाडे कोडे नेणे लाजो ।। नामा म्हणे तैसे तुम्ही माझे कवतुक, करूनि सुखे सुख वाढविता.'

## श्रीज्ञानदेवांचे आश्वासन...

श्रीनामदेवरायांना थोडा संकोच वाटत आहे, त्याबद्दलची जाणीव श्रीज्ञानदेवांना झाली. त्यावर ते म्हणाले, 'तुम्ही काहीही संकोच करू नये. मनात कोणतीही शंका धरू नये. माझ्याविषयी दुजाभावही मनात येऊ देऊ नका. आपण दोघांत द्वैतभाव नाही. तू-मी एकच आहोत. सुखानेच सुख भोगावे असा हा भक्तिसंवाद होय. सुखाचा वाटा दुसऱ्यास दिल्याने आपले सुख वाढते. सर्वत्र भरून असलेल्या परब्रह्मरूपी दीपकाचा तू प्रकाश आहेस. तू भक्तिसुख मिळविले आहेस. आम्हासही ते तू प्राप्त करून दे. तू विठ्ठलप्रेमाचा भांडारी आहेस. सुखाचा खजिना तुझ्याच ताब्यात आहे. तू माझ्यासारख्या याचकाला विन्मुख पाठवू नकोस. माझी श्रवणसुखाची इच्छा पूर्ण कर... तू उदासीन होऊ नकोस. जेव्हा वक्ता वैराग्याने बोलतो आणि स्वार्थाऐवजी परोपकारार्थ बोलतो तेव्हा तिथे कमीपणा घेण्याचे कारण नाही.' श्रीज्ञानदेवांनी श्रीनामदेवास आश्वासन दिले की, 'उभयतांतला हा 'भक्तिसंवाद' परस्परांना ज्ञान आणि भक्ती यांची यथार्थ जाणीव करून देईल. साधकांना तो उपकारक ठरेल.'

## नवविधा-भक्तिगुह्य..

श्रीज्ञानदेवांचे 'हृदयसंवादी' बोलणे ऐकून नामदेवरायांचे अंतःकरण दाटून आले. भक्तिसुखाचा प्रेमानुभव आता सांगितलाच पाहिजे, असे त्यांना वाटू लागले. श्रीज्ञानदेव हे कोरडी वैराग्य-धारणा करणारे ज्ञानी नव्हेत, तर ते वैराग्यशील असून प्रेमळ आहेत, हेही श्रीनामदेवांना कळून आले. प्रेम आणि वैराग्य यांचा हा संगम त्यांच्या ठायी आहे, हा योग क्वचितच येतो; हे मनाशी जाणून श्रीनामदेवराय यांनी 'नवविधा-भक्तिगुह्य' विशद करण्यास प्रारंभ केला. ही भक्तिमार्गाची नऊ सूत्रे होत. १) भजन म्हणजे काय ? यावर ते सांगू लागले की, 'ज्या ज्या ठिकाणी व ज्या ज्या स्थितीत मी-तू पणाचा भेदभाव नाहीसा होतो आणि भूतमात्राचे ठिकाणी दया व करुणा उत्पन्न होते, त्यास भजन म्हणावे, हे नसेल तर त्याचा जन्म व्यर्थ आहे.' (२) नमन म्हणजे, 'नम्रता होय. गुणदोष न पाहता अंगी नम्रता असू द्यावी. दंभ असो नये. खोटी नम्रता असेल तर मी तेथे क्षणभरही विश्वास ठेवणार नाही.' (३) निर्विकार ध्यान म्हणजे 'सर्वत्र माझा विठ्ठलच प्रतीत होणे होय. त्याच विठ्ठलमूर्तीचा ध्यास सदैव अंतःकरणात भरून राहणे होय.' (४) श्रवण म्हणजे, 'नादलुब्ध होऊन हरिणी जसे देहभान विसरते, त्या प्रमाणे मन तल्लीन होऊन ईश्वराचे गुणगान ऐकणे होय.' (५) मनन म्हणजे, 'ज्याप्रमाणे कृपण पुरुष कोणताही व्यवहार करावयाचा झाल्यास त्यातील लाभावरच सदासर्वदा नजर ठेवीत असतो, त्याप्रमाणे आपले हित /

पारमार्थिक हित - (व्यावहारिक हित नव्हे) ज्यामध्ये आहे अशा भगवत् स्वरूपाचीच विचारणा, अखंडपणे करणे याचे नाव मनन होय. हे मनन सत्त्वगुणांची वाढ करते.' ६) निजध्यासन म्हणजे, 'परपुरुषाविषयी आसक्त असलेली व्यभिचारिणी स्त्री ज्याप्रमाणे सर्व गृहव्यापार करीत असताना सारखे परपुरुषाचेच चिंतन करीत असते किंवा कोश कीटक ज्याप्रमाणे समोर असलेल्या भिरंगुटीचेच सारखे चिंतन करीत असतो, त्या एकविध-अनुसंधानालाच निजध्यासन म्हणतात.' ७) भक्ती म्हणजे, 'सर्वभावी विठ्ठलाचे ध्यान करणे, सर्वाभूती त्याचेच रूप पाहणे व रजतमावेगळे, सर्वाहून निराळे होऊन, ईश्वरप्रेमाचा आनंद भोगणे होय.' ८) धृती म्हणजे, 'धैर्याने सत्त्व धरून, निःसंग, एकटे होऊन, वैराग्ययुक्त अंतःकरणाने, देहाची आठवण न होता प्रारब्ध्याचे भोग भोगणे होय.' ९) विश्रांती म्हणजे, 'आत्मप्राप्तीच्या आनंदाने मनातील सर्व वासनांचा क्षय होऊन आत्मज्ञान लाभून विकल्प किंवा संशय न राहिल्याने एकांतात प्रेमाने सदा गोविंदाचे चिंतन करीत राहणे होय.' भक्तिमार्गाचे हे 'नवविधाभक्तिसूत्र' विशद करणारे श्रीनामदेवराय ज्ञानी नव्हते असे कसे म्हणावयाचे ? ज्ञान आणि भक्ती यांची मिळणी म्हणजे हा भक्तिसंवाद होय. श्रीज्ञानदेवांना अपार आनंद झाला. त्यांनी नामदेवरायांची पाठ थोपटली. तीर्थयात्रा सुरूच होती.

## ६. श्रीनामदेवाची तहान कुणी भागविली ?

श्रीज्ञानदेव आणि श्रीनामदेव यांची तीर्थयात्रा सुरूच होती. श्रीनामदेवरायांनी कथिलेले भक्तीचे ९ प्रकार ऐकून श्रीज्ञानदेव संतुष्ट झाले. 'परी नामयाचे बोलणे नव्हे हे कवित्व, हा रस अद्‌भुत निरूपण' असे प्रशंसोद्‌गारही त्यांनी काढले. या भक्तिरसप्रेमाला तोड नाही. तीर्थयात्रेप्रसंगी भक्तिसंवाद सुरूच होता. तीर्थयात्रा करीत करीत ते द्वारकेजवळील प्रभासक्षेत्री आले. या क्षेत्रास फार महत्त्व आहे. या क्षेत्री भगवान श्रीकृष्णांनी आपल्या निर्याणसमयी यादवांना एकत्र जमविले होते. द्वारकेलाही श्रीज्ञानदेव-श्रीनामदेव गेले. कारण एकूण सातमोक्षपुरी असून त्यात द्वारकेचा समावेश आहे. तीर्थक्षेत्री स्नान आणि देवदर्शन घेत घेत ते पुढे निघाले होते. श्रीनामदेवरायांचे मन तरीही पंढरीकडेच ओढ घेत होते. मध्येच एक चमत्कार घडल्याचा प्रसंग आहे.

### श्रीनामदेवास तहान लागली...

तीर्थयात्रा करून परतीचा प्रवास सुरू झाला होता. येता येता वाटेत एका वनामध्ये दोघांनाही तहान लागली. श्रीनामदेवराय तर तहानेने अगदी व्याकूळ झाले. कोठे पाणी मिळेल का यासाठी उभयतांची दृष्टी चौफेर फिरू लागली. तोच त्यांच्या दृष्टीला एक विहीर पडली. विहिरीस पायऱ्या नव्हत्या. बाहेरून पाणी खेचून काढावे, तर तसे साधनही जवळ नव्हते. आंत डोकावून पाहिले तर पाणी फार खोल होते. पाणी कसे काढावे ? आणि तहान कशी भागवावी ? यावर दोघेही चिंताक्रांत होऊन विचार करू लागले. त्या वेळी श्रीज्ञानदेव म्हणाले, 'लघिमेचे लाघव करूनि ते अवसरी, उतरूनी भीतरी घेतले जीवन ॥ घेऊनि उदक निघालो बाहेरी, म्हणे अवधारी नामदेव ॥'

लघिमा म्हणजे लहान किंवा हलके होणे. ही सिद्धी श्रीज्ञानदेवांना प्राप्त होती. त्यांनी सूक्ष्मरूप घेतले आणि विहिरीतून पाणी काढून श्रीनामदेवांना दिले. 'संकट प्राप्त झाले असता अभिमानाची आग्रह बुद्धी टाकून द्यावी', असा वर उपदेशही ते श्रीनामदेवास करू लागले. कारण श्रीनामदेव ते पाणी घ्यायला तयार होईनात. त्यांना वाटले की, श्रीज्ञानदेव हे योगी असल्याने आपल्या योगसामर्थ्याचे प्रदर्शन करून मला हिणवू पाहात आहेत. श्रीज्ञानदेवांनी विनवूनही श्रीनामदेवांनी मौन धरले. ते श्रीज्ञानदेवास म्हणाले, 'तुमच्या सिद्धांताप्रमाणे विठ्ठल आत्मरूपाने सर्वत्र व्याप्त आहे तर तो माझ्याही देहात आहे. त्याला मग माझी काहीच काळजी नसावी का ? थोडा वेळ धीर धरा. वाट पहा. माझ्या विठोबाचे कौतुक तुम्हास दाखवितो.' एवढे बोलून श्रीनामदेवांनी पंढरीरायाचा धावा सुरू केला. 'हे अनाथ कैवारी दयाघना माझा अंत न पाहता तू त्वरेने धावून ये. माझी फजिती करू नको. लोक मला हसतील. मी कासावीस झालो आहे. तू आता धावून यावेस', एवढी आर्त हाक घालताच विहिरीतील पाणी उचंबळून वर आले. विहीर तुडुंब भरली. हा चमत्कार पाहून श्रीज्ञानदेवांचा ऊर भरून आला. ते श्रीनामदेवरायांस उद्देशून म्हणाले, 'तू धन्य आहेस. तू देवाला ऋणी करून ठेवले आहेस.' श्रीनामदेव ध्यानमग्न होते. समाधी अवस्था उतरली. उभयतांनी परस्परांस दृढ आलिंगन दिले. श्रीनामदेवांनी श्रीज्ञानदेवांच्या चरणी मस्तक ठेवले. माझ्या भक्तिस्तव देव धावून आला, याचा मनस्वी आनंद झाला.

### भक्तीस सिद्धीचा विटाळ...

चमत्काराच्या या प्रसंगाकडे 'ज्ञान आणि भक्ती यांची परस्पर मिळणी' असेच सर्वांनी पाहिले आहे. श्रीज्ञानदेवांनी या प्रसंगाच्या निमित्ताने श्रीनामदेवांची परीक्षा घेतली व त्यांत श्रीनामदेव तंतोतंत उतरले, असे या प्रसंगावर भाष्य करताना श्रेष्ठ साधक व संतवाङ्‌मयाचे अभ्यासक (कै.) ग. वि. तथा काकासाहेब तुळपुळे यांनी (नामदेव : आध्यात्मिक चरित्र व ज्ञानदीप या ग्रंथात / पृष्ठ ५६-५७) म्हटले आहे. त्यांनी पुढे असे सांगितले आहे की, 'भक्तीस सिद्धीचा विटाळ आहे हेच श्रीज्ञानदेवांना या प्रसंगातून श्रीनामदेवांना समजावून सांगावयाचे होते. संकटकाळी अभिमान सोडावा. विवेक करावा. सर्वाठायी विठ्ठल भरलेला आहे. तर मी पाणी आणून दिले तर ते पिण्यात कमीपणा कसला ?' नामदेव अंतरंग भक्त होते. त्यांनी श्रीज्ञानदेवांचा युक्तिवाद त्यांच्यावरच उलटविला. 'सर्वांभूती विठ्ठल आहे तर माझी चिंता त्याला का नसावी ? हा त्यांचा प्रश्न होता.' ज्ञान आणि भक्ती यांची ही कसोटी होती. त्यांनी पांडुरंगाचा धावा केला. तर तेवढ्यात विहीर तुडुंब भरून वाहू लागली. कै. तुळपुळे यांनी पुढे म्हटले आहे की, '... यांतील चमत्काराचा भाग सोडला तर असे वाटते की, सिद्धीचे महत्त्व नामदेवांना वाटते की काय हे पाहण्यासाठी ज्ञानदेवांनी त्यांची परीक्षा घेतली आणि नामदेव या परीक्षेत पूर्णपणे उतरले. सिद्धीचा मोह त्यांना अशा संकटकाळीही झाला नाही आणि अनन्यभक्ताचे आपले ब्रीद त्यांनी राखले. त्यांची ही एकांतिक भक्ती पाहून ज्ञानदेवांना अत्यंत आनंद झाला; यात काय

आश्चर्य ? प्रेमाचे भरते येऊन त्यांनी नामदेवांना धन्यवाद दिले...' श्रीनामदेवांची तीर्थयात्रा सुरू होणार होती तेव्हा आज्ञा देताना श्रीविठ्ठलाने श्रीज्ञानदेवांजवळ एक गोष्ट सांगितली होती. ती म्हणजे 'माझ्या नामदेवाला सांभाळा. त्याला तहान-भूक लागेल. ती जाणून घ्यावी.' ही तहान भक्तीचीच होती. विठ्ठलभक्तीची तहान श्रीज्ञानदेवांच्या उपदेशवाणीतून आणि त्यांच्या साक्षीत्वाने विठ्ठलानेच भागविली आहे. श्रीनामदेवांचे योगमार्गाविषयी असलेले गैरमत अभिमानकारक हेही त्यांनी या प्रसंगाद्वारे नाहीसे केले. देव योगमार्गेही कळतो आणि भक्तिमार्गेही कळतो याचीच ग्वाही या प्रसंगातून दिली गेली आहे. तीर्थयात्रा संपत आली होती.

## ७. जन्मोजन्मी संतसंग मिळावा...

श्रीनामदेवाच्या, भक्तिप्रेमाने विठ्ठलास प्राप्त करून घेण्याच्या आणि भक्तीला सिद्धीचा विटाळ नको, अशा झालेल्या जाणीवेनंतर जवळ-जवळ तीर्थयात्रा संपतच आली होती. तीर्थयात्रेचे प्रयोजन आता राहिले नाही. 'तीर्थयात्रे जाणे काही नलगे करणे' असे श्रीज्ञानदेवांनी श्रीनामदेवास सांगितले. दोघेही आपापल्या स्थळी परत जाणार याचीच ही पूर्वसूचना होती. भक्तिसंवाद घडून उभयतांस प्रेमसुख प्राप्त झाले होते. ज्ञानी भक्तिसन्मुख झाला. भक्ती ज्ञानसन्मुख झाली. भेददृष्टी गळाली. 'तीर्थे करोनी नामा पंढरीसी आला, जिवलगा भेटला विठोबासी... अज्ञानाचा भाग होता माझे मनी, हिंडलो म्हणोनी दारोदारी' अशी कबुलीही त्याने दिली. 'पंढरीचे सुख मात्र अन्य कोठेही नाही', हेही त्यानी बाहू उभवोन सांगितले. 'अज्ञान गेले, अहंकार गेला' हीच तीर्थयात्रेची फलश्रुतीदेखील त्यांनी प्रकट केली. श्रीनामदेव हे तीर्थयात्रेला गेले होते, त्या काळात विठ्ठलही त्यांच्या विरहाने व्यथित झाला होता. त्याने श्रीनामदेवाला पोटाशी धरले आणि आपल्या गळ्यातील फुले आणि तुळशीमाळा त्याच्या गळ्यात घातली. तीर्थयात्रा करून आल्यावरचे विठ्ठलदर्शन हाच खरा महाप्रसाद होता. नामदेव आणि विठ्ठल ही भक्त आणि देव यांची अविभक्त रूपे आहेत.

## पांडुरंगाचा कृपाप्रसाद...

'केशव म्हणे नाम्या धन्य तुज फावले, बरवे तुला केले आत्महित।। पुण्यवान तीर्थे पाहिली सकळीक, प्रक्षाळली पातके वासनेची ।। धन्य तुवा केले जन्मोनी सार्थक, शोक मोह दुःख निवारले ।।' असेच विठ्ठलाचे कृपावचन होते. तीर्थयात्रेचे उद्यापन करावे म्हणून पुढे नंतर पांडुरंगाने ब्राह्मणभोजन घातले. तत्कालीन ब्रह्मवृंदांना जात आणि कर्म याविषयीचा दुराभिमान होता. पण श्रीनामदेवासाठी विठ्ठल-रुक्मिणी राबले हे पाहून त्यांचा अभिमान दूर झाला. भेददृष्टी नष्ट झाली. पांडुरंगाने द्विजवृंदास स्नानमाहात्म्यही सांगितले. सत्यभाषण हे सर्वश्रेष्ठ स्नान होय. अंतर्बाह्य शुद्धी (पावित्र्य) राखणे हे दुसऱ्या क्रमांकाचे स्नान. इंद्रिय संयम हे तिसरे स्नान. भूतदया हे चौथे स्नान होय. लौकिक स्नान म्हणजे आंघोळ. पाण्यात देह बुचकळून काढणे. संतसंगती ही सर्व प्रकारच्या स्नानाशी निगडीत अशी अवस्था होय. ती मात्र कधीही सोडू नये. उद्यापन म्हणून घातलेल्या जेवणावळीत द्विजवृंद आणि संतमंडळी जेवून तृप्त झाली. पांडुरंगाने सर्वांस 'निजरूप' दाखविले. द्विजश्रेष्ठ आणि संतमंडळी यांनी पांडुरंगाला एकच मागणे मागितले, 'आता सर्वकाळ अविट हे दृष्टी, यासाठी संतभेटी निरंतर' आता पुन्हा कितीही जन्म मिळाले तरी त्या प्रत्येक जन्मी संतसंग मिळावा आणि भक्तिसेवा मिळावी, अशी प्रार्थना सर्वांनी केली आहे. श्रीनामदेवही म्हणाले की, 'हेचि व्रततीर्थ क्रियाकर्म आम्हां, द्यावा नित्यप्रेमा नामयासी.'

## ज्ञानदेव-नामदेवांचा उपदेश...

श्रीज्ञानदेव आणि श्रीनामदेव यांनी सर्व भाविक-भक्तांना उपदेश केला आहे. श्रीज्ञानदेव म्हणाले, 'साधनावाचुनि मार्ग सोपा जाण, करावे कीर्तन रामकृष्ण ।। सर्व काळ कथा संतांची संगती, वाचे नाम किर्ती सर्वकाळ ।। तो हा राजमार्ग सर्वांहुनि चांग, सदा संतसंग वाचे नाम ।। संकल्प विकल्प न धरावे मानसी, मनोभावे संतासी शरण जावे...' 'अठ्ठाविस युगे विठ्ठल उभा आहे. भक्तिनाम हेच तारक आहे. तो देव उदार आहे. विठ्ठलनाम हीच सुखसमाधी होय. नामच श्रेष्ठ आहे. नामाचे स्मरण करणे हीच भक्ती होय...' श्रीज्ञानदेवांनी हा भक्तिमार्ग सांगितला. तीर्थावळीचा समारोप करताना श्रीनामदेवरायांनी देखील उपदेश केला आहे. त्यांनी सांगितले, 'विठ्ठलनाम हेच वेदस्वरूप आहे. नाम हेच ज्ञान, तीच मुक्ती. कलियुगात हे विठ्ठलनामच तारक होय. श्रवण, मनन, निजध्यासन हाच माझा भक्तिमार्ग आहे. नामरूपी श्रवण व्हावे, त्याचेच सतत स्मरण असावे व स्मरणाचे अनुसंधान असावे. नाम हेच परमार्थाचे बीज आहे आणि देव हाच परमार्थाचे फलित आहे. कारण नामयोगे देवप्राप्ती होते. देव हेच भक्तीचे सौभाग्य आहे. नाम हेच श्रीविठ्ठलाचे आनंदनिधान आहे.' तीर्थावळीतील भक्तिसंवाद हा आनंदामृताचा घोट आहे. पुढे नामदेवास कौतुक दाखवावे म्हणून श्रीज्ञानदेवांनी काशीक्षेत्री घडलेल्या एका प्रसंगाची आठवण तीर्थावळीच्या शेवटी श्रीनामदेवांना करून दिली आहे. ते म्हणतात, 'ज्ञानदेव आले काशी, विश्वेश्वर आडवे त्यासी ।।' ज्ञानेश्वर-विश्वेश्वर यांची भेट झाली. श्रीनामदेवांनी उभयतांचे दर्शन घेतले. ज्ञानेश्वर-विश्वेश्वर हे बोलत बोलत गंगेच्या काठी आले. गंगामाईने ज्ञानदेवांच्या चरणी मिठी घातली. 'नामा म्हणे सोडाबाई, ज्ञानेश्वर सर्वांठायी' तीर्थावळीमुळे श्रीनामदेवांना विश्वव्यापक विठ्ठलाचे दर्शन घडले आणि भक्तिगुज उलगडले गेले आहे. पुढे विठ्ठल आणि ज्ञानदेव यांचेतही भेद नाही हे त्यांना कळून आले आहे. श्रीज्ञानदेवांनी तीर्थाटन करविले आणि पुढे त्यांना भक्तिप्रसारकार्याची प्रेरणा दिली. नामदेव उत्तरेत गेले. भक्तिमार्गाची पताका पंजाबातही रोवली. पंढरीत येऊन त्यांनी कार्याची रुजवणी विठ्ठलापायी केली आणि महाद्वाराशी समाधी घेतली. ज्ञानाची पायरी भक्ती हीच आहे. कळसही भक्तिप्रेम हाच आहे. त्यामध्ये समचरण विठ्ठल 'युगे अठ्ठाविस' उभा आहे.

डॉ. नरेंद्र कुंटे
प्रज्ञा, ए/७४, आसरा सोसायटी,
होटगी रस्ता, सोलापूर - ४१३ ००३.

# 'नामदेवांचा शिष्य परिवार'

**डॉ. सौ. पद्मावती श्रीपाद श्रोत्रिय**
एम.ए.पी.एचडी.

यांचे विद्यापिठीय शिक्षण निवृत्तीच्या वयात त्यांनी पूर्ण केले. संत नामदेव अध्यासनात आरंभापासून सेवा कार्य केले. 'संत चोखामेळा आणि त्यांचा परिवार : एक विवेचक अभ्यास' या विषयावर अध्यासन प्राध्यापक व प्रमुख डॉ. अशोक कामत यांचे मार्गदर्शनाखाली १९९२ मध्ये डॉक्टरेट मिळाली.

त्या अखिल भारतीय प्राचीन संत कवयित्रींसंबंधीचे संशोधनात व्यस्त आहेत. पहिले चार खंड महाराष्ट्रातील संत कवयित्रींवरील पूर्ण झाले असून सध्या दक्षिण भारतातील संतस्त्रियांचे परिचयलेखन पूर्ण होत आले आहे. संत साहित्याच्या स्त्री-अभ्यासक म्हणून नुकताच 'याज्ञवल्क्य आश्रम' पुणे या संस्थेतर्फे 'संत मुक्ताई पुरस्कार' देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

डॉ. सौ. पद्मावती श्रोत्रीय यांचे १४.२.९८ रोजी दुःखद निधन झाले. ओंकार ट्रस्टतर्फे त्यांना आदरपूर्वक श्रद्धांजली.

संत ज्ञानेश्वरांच्या प्रकाशमयी मधुर वाणीचा खोलवर ठसा नामदेवांच्या मनावर उमटला होता. त्यांच्या आर्त सगुण विठ्ठलभक्तीला ज्ञानाचे अधिष्ठान लाभले होते. ज्ञानेश्वरांनी आपल्या भाष्यग्रंथात स्पष्ट केलेला 'म्हणौनि कुळजाति-वर्ण । हे आघवेंचि गा 'अकारण' हा 'विचार' ज्ञानदेव-नामदेवांच्या प्रभावळीतील संतांचा 'आचार' ठरला आणि ईश्वरनिष्ठांची एक मोठी मांदियाळीच उदयाला आली. या सर्व वैष्णवांच्या जाति-जमाती भिन्न भिन्न होत्या; सर्वांचे व्यवसायही वेगवेगळे होते, पण त्यांना हवे होते पंढरीचा विठुराया आणि ज्ञानदेव-नामदेवांचा सहवास. या संतश्रेष्ठांचा सहवास हीच त्यांची साधना होती.

नामदेव-शिष्या जनाबाई 'विठु माझा लेकुरवाळा' या रूपकात्मक अभंगांतून जे चित्र रेखाटते ते वस्तुतः नामदेवांच्या संतशिष्य परिवाराचेच रेखाटन आहे. नामदेव हे विठ्ठलाची करंगळी धरून या सर्वांचे मार्गदर्शक बनले आहेत. ज्ञानदेव-नामदेवांचा शिष्यपरिवार मोठा आहे. ज्ञानदेवांच्या ज्ञानयोगापेक्षा नामदेवांचा भक्तियोगच सर्वांना सुलभ सोपारा वाटलेला आहे.

### शिष्य परिवार

नामदेवांच्या शिष्यपरिवाराला 'संत परिवार' म्हणणे अधिक उचित होईल. कारण येथे गुरु आणि शिष्य असा भेद नाही. 'गुरु तोचि शिष्य आणि शिष्य तोचि मित्र' अशी स्थिती आहे. 'हा संतपरिवार विठ्ठलनामाच्या गर्जनेने आणि टाळमृदंगाच्या घोषाने तल्लीन झालेला होता. त्यांच्या छायेत सामान्य जनता सुखाने न्हाली होती. प्रखर ज्ञानाचा सूर्य ज्ञानदेव आणि कोमल भक्तीचा चंद्र नामदेव यांच्या प्रकाशात सारेजण आनंदून गेले होते. नामदेवांच्या भक्तीचा गोडवा, त्यांच्या अनुभवाचा लाभ आणि त्यांचा 'सगुणप्रेमा' सर्वांनाच आकर्षित करीत होता.' [१] हे जोशी यांचे विधान चिंतनीय आहे. नामदेवांच्या आरतीत परिसा भागवताने म्हटल्याप्रमाणे 'तयासि पाहता अनुभव सोपा' अशीच तत्कालीन आणि तुकारामांसारख्या उत्तरकालीन बहुजनांची स्थिती होऊन गेली.

नामदेवांच्या शिष्यपरिवाराचे स्वरूप त्यांच्या लोकोद्धारक प्रकृतीला साजेसे आहे. त्यात तमाम जातिपंथांचे स्त्री-पुरुष आहेत, त्यांची सारी कुटुंबीय मंडळी आहेत. जनाईसारखी दासी म्हणविणारी शिष्या नागरीसारखी त्यांची सासुरवाशीण पुतणी आहे. चोखोबांसारख्या अतिशूद्र भाविक विठ्ठलभक्ताचा सारा परिवार आहे. भागवत-धर्ममंदिराचा कळस शोभणारा तुकाराममहाराजांसारखा 'स्वप्नोपदिष्ट शिष्य' नामदेवांना लाभलेला आहे.

जशी ही मराठी शिष्यपरंपरा आहे तशीच नामदेवांची पंजाबी शिष्यपरंपरा आहे. त्या परंपरेचा परामर्श पुढे घ्यावयाचा आहेच.

### नामदेव परिवाराचे आगळेपण

गुरुशिष्य संबंधापेक्षा वेगळी म्हणून स्पष्ट करता येतील अशी नामदेव परिवाराची अनेक वैशिष्ट्ये आढळतात.

१) नामदेव औंढ्या नागनाथाचे आणि पंढरपूरच्या विठ्ठलाचे भक्त. योगीराज विसोबा त्यांचे गुरु; पण पथदर्शी आहेत ज्ञानदेव. ज्ञानदेवांच्या संजीवन समाधीनंतर नामदेव हे संत-भक्तांचे मार्गदर्शक झालेले दिसतात.

२) ज्ञानदेव-नामदेव दोघेही नाथसंप्रदायी आहेत. दोघांनीही गुरुदीक्षा घेतली. पण नामदेव योगमार्गापेक्षा भक्तिमार्गच अनुसरत राहिले. त्याचा शिष्यपरिवारही योग किंवा शरीरसाधनेवर भर देणारा नाही.

३) नामदेवांचा कोणत्याही संप्रदायाचा आग्रह नाही. काव्याचाही फारसा नाही. कार्याचा मात्र आहे. नामदेवांचा सारा शिष्यरिवार 'मुक्त'पणे कविता लिहीत. आत्मविश्वासाचे बोल बोलत राहिला. त्यातूनच चोखोबांसारख्यांच्या काव्यात साऱ्या उपेक्षितांच्या व्यथांना वाचा फुटली. तुकारामांची वाणी समाजस्थितीचा विदारक आरसा बनली; प्रस्थापितांचा विवेक जागृत करणारी ठरली.

४) नामदेवांच्या प्रभावामुळे त्यांचे सारे कुटुंबच काव्य करू लागले. नामदेव गाथ्यात नामदेवांबरोबर त्यांच्या कुटुंबातील दहा व्यक्तींचे अभंग संग्रहीत आहेत. त्या सर्वांचे मिळून एकूण १८६ अभंगांचे हे 'कुटुंब-काव्य' बारकाईने वाचल्यावर ही सारी रचना नामदेवांपासून स्फूर्ती घेऊनच अवतरली असल्याचे जाणवते.

५) महाराष्ट्रातील पहिला अस्पृश्योद्धारक संत असे नामदेवांचे वर्णन केले जाते ते यथार्थच आहे. पंजाबातही नामदेवांची जनमानसातील प्रतिमा अशीच आढळते. लद्धा, केसो कलाधारी, बहोरदास, जाल्लो हे दलित जमातीतील नामदेव शिष्य आहेत. आजही राजस्थानातील -

पंजाबमधील टांक-क्षत्रिय, छीपा, बावा, तिरखाण, वेदो, सप्पय अशा अनेक दलित ज्ञातीतील समाज नामदेवांना आपला 'आद्य पुरुष' मानतो.

'परसो भाग्यवंत' अथवा परिसा भागवत हे ज्ञानदेवांचे पहिले शिष्य म्हणता येतील. ते उच्चवर्णीय होते. प्रथम नामदेवांना मानीत नसत. रुक्मिणीची उपासना करीत. भागवतावर प्रवचने करीत. 'भागवत परिसा' असे ते इतरांना म्हणत. म्हणून श्रोते त्यांना परिसा भागवत म्हणू लागले. नामदेवांची कीर्तने ऐकून 'मागे होतें तें अवघेचि विसरलों। लोटांगणी आलों नामयासी' अशी त्यांची स्थिती झाली. नामदेवांनी आपल्याला 'निजबोधाची खूण' कशी दाखविली ते परिसा भागवत सांगतात. संकलसंत गाथेत समाविष्ट असणारे भागवताचे अभंग १९ असून नामदेवांबद्दलच्या भक्तिभावाने भरलेले आहेत. त्याने एक हिंदी आरतीही रचली आहे..

परिसा भागवतासारखे प्रतिष्ठित आणि चोखामेळ्यासारखे समाजाने 'दुरित' मानलेले असे दोघेही नामदेवांना गुरुस्थानी मानीत. यातूनच नामदेवांच्या व्यक्तिमत्त्वातील महनीयता प्रकर्षाने दिसून येते.

## नामदेव आणि जनाबाई

संत जनाबाईचे जीवनचरित्र खात्रीलायक पुराव्याअभावी साधार मांडले गेलेले नाही. नामदेवांच्या नरसी नजिकचे गंगाखेड हे त्यांचे जन्मगाव. जन्मतिथी, सांसारिक जीवन, आयुर्मर्यादा, समाधी यांचा तपशील देता येत नाही. पारंपारिक कथेप्रमाणे गंगाखेडचे दमा आणि करुंड हे जनाबाईचे वडील आणि आई. ते पंढरीची वारी करीत. विठ्ठलाच्या आशीर्वादाने त्यांना कन्यारत्न लाभले, ते दृष्टान्ताप्रमाणे नामदेवांचे वडील दामाशेटी यांच्याकडे सांभाळण्यासाठी दिले. [२]

दामाशेटींनी आपल्या मोठ्या कुटुंबात जनाबाईचा सांभाळ स्वतःच्या लेकीप्रमाणे केला. कालांतराने दामाशेटी सपरिवार पंढरपूरनिवासी झाले. नामदेवांचा पारमार्थिक ठेवा जनाबाईना लाभला तो कुटुंबातील इतर कोणत्याही व्यक्तींपेक्षा मोठा होता. नामदेव गाथ्यात एकूण २४७ अभंगांची रचना जनाबाईच्या नावावर आहे. त्यांचा स्वतंत्र गाथा उपलब्ध नाही. नामदेवांच्या सांप्रदायिक गाथेचाच एक भाग म्हणून जनाबाईचे अभंग मिळालेले आहेत.

संत नामदेव हे भागवत धर्ममंदिराचे प्रमुख शिल्पकार ज्ञानदेव यांचे सांगाती. मंदिराचे पायाभरण करण्यात त्यांचे आणि जनाबाईचे कष्टाळू आणि स्नेहशील हात आहेत. [३] इतकेच नव्हे तर ज्या पवित्र उद्देशाने ते मंदिर उभे केले गेले त्याचा उद्गम आणि पूर्ती नामदेव अन् जनाबाई यांच्या जिव्हाळ्याच्या नात्यात आढळून आल्याखेरीज राहात नाही. समाजाच्या तळागाळात जन्मल्या आणि पोरकेपणामुळे जनाबाई दासी म्हणून वावरल्या असे म्हटले जाते. या दृष्टीने त्यांना सर्व उपेक्षितांचा प्रतिनिधी म्हणता येईल.

भक्तिपंथ, नामतत्त्व, पंढरीमाहात्म्य आणि कीर्तनसंस्था यांचे पुनरुत्थान करणाऱ्या नामदेवांच्या घरात जनाबाई वाढल्या, त्यांचा निरंतर सहवास लाभला म्हणूनच अगदी सहजपणे नामदेव हे त्यांचे आध्यात्मिक वाटचालीतील पथदर्शी ठरले.

आत्यंतिक कृतज्ञतेने जनाबाई आपल्याला सांगतात -

नामदेवांचे ठेवणे जनीस लाभले । धन सापडले विटेवरी ।
धन्य माझा जन्म, धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा।।

आपण 'नामयाची दासी' आहोत हे त्या नुसतेच सांगत नाहीत तर अखंडपणे आपल्या अभंगातून त्या नामदेवांची मुद्रा धारण करतात. नामदेवांचे आणि जनाबाईचे ऐक्य विलक्षण आहे. कित्येक ठिकाणी त्यांचे अभंग नामदेवांच्या वळणाचे इतके आहेत की अभंगाच्या शेवटी 'दासी जनी' ही नाममुद्रा नसती तर नामदेवांचेच तर ते नाहीत ना अशी शंका उत्पन्न झाली असती.

## जनाबाई दासी ? नव्हे

नामदेवांचा पुत्र गोंदा याच्या अभंगात नागी आणि जनी अशा दोघींचा उल्लेख 'नामयाच्या दासी' असा येतो. यापैकी नागी किंवा नागरी ही नामदेवांची पुतणी असल्याचे उल्लेख तिच्या आत्मकथेतून स्पष्ट होतात. या ठिकाणी 'दासी' ही संज्ञा 'सेविका' या अर्थाची नसून 'शिष्या' या अर्थाची ठरते. ज्या अर्थाने ज्ञानदेव स्वतःला निवृत्तिदास म्हणजे निवृत्तिनाथांचे शिष्य म्हणवितात अगदी त्याच अर्थाने नागरी आणि जनाबाई 'नामयाची दासी' आहेत.

जनाबाई नामदेवांच्या घरात दळण-कांडणादी सर्व कामे करीत असल्याचा उल्लेख त्या स्वतःच करतात. याचा अर्थ त्या गुरुगृहीच नित्य राहून गुरुसेवा करीत; आणि त्यामुळेच निरनिराळ्या बऱ्यावाईट प्रसंगांतून जाणाऱ्या नामदेवांच्या वेगवेगळ्या भावछटा त्यांना निरखता आल्या. 'चौ युगांचा भक्त नामा उभा कीर्तनी ।

पाठीमागे डोळे झांकुनी उभी ती जनी ।'

ज्ञानदीप जगी लावण्यासाठी कीर्तनरंगी नाचणाऱ्या नामदेवांचा आनंदकल्लोळ त्या पाहतात तेव्हाच त्यांना असेही जाणवते की -

'माशांची घोंगाणी जनांची निंदणी । सोशी अंतःकरणी नामदेव।।'

अशी नामदेवांच्या जीवनाची 'साक्षी' जनी, केवळ दासी वा मोलकरीण नव्हे. 'नामदेव कीर्तन करी । कीर्तनी नाचे पांडुरंग' असा उत्कट अनुभव घेताना 'मागे किती संत झाले । नाम्या ऐसे कोण आहे?' म्हणत नामदेवांची महती सांगणारी ती नामदेव-शिष्या आहे.

## नामदेव आणि चोखोबा

ज्ञानदेव-नामदेवांपूर्वी अध्यात्मसिद्धांतांचे विवरण ही संस्कृत भाषा पंडितांची मिराशी होती. नामदेवांनी या परंपरागत रूढीला धक्का दिला. 'सुंभाचा करदोटा । रकट्याची लंगोटी आणि वाळवंटी कीर्तन' हे दृश्य शूद्र म्हणविल्या जाणाऱ्या भगवद्भक्तांना प्रेरक ठरले; आपल्यापैकीच एकजण अध्यात्मविद्या समजावून सांगतो, या भावनेने तत्कालीन बहुजन सामान्यांचा आत्मविश्वास जागविला गेला. नामदेवांनी हे कार्य केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर उत्तर भारतातही केले हे त्यांचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य आहे.

ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरी, अमृतानुभव ह्या ग्रंथांचे पाथेय परमार्थ मार्गावरील प्रवाशांसाठी ठेवले आणि इ. स. १२९६ मध्ये संजीवन-समाधी घेतली. भक्तियोगाचे भाष्यकार ज्ञानदेव; पण भक्तियोग

आचरणात आणून जनसामान्यांपर्यंत पोहोचविण्याचे कार्य मात्र नामदेवांनी केले ते आजीवनपर्यंत ! ज्ञानदेवांना ग्रामण्याच्या यातना ज्या भोगाव्या लागल्या त्यापासून नामदेव बरेच सुरक्षित होते. ज्ञानदेवांचा अध्यात्म आणि भक्तियोग यांचा अपूर्व आविष्कार ! संत नामदेवांच्या कीर्तनांद्वारे होणाऱ्या प्रचार-प्रसारातून हा भक्तियोग बहुजनांपर्यंत पोहोचत होता; लोकजागृती होत होती.

नामदेव गाणे गाय । जशी दुधावरली साय ।। असा परिसा भागवतांचा लक्षणीय अभिप्राय बरेच काही सांगून जातो.

'खांदिये भोपळा गळां तुळशीमाळा' असा वेष, गोड गळ्याची देणगी, नाचून गाऊन कीर्तनात रंग भरण्याची तयारी आणि लोकमानसाच्या गाभ्याशी भिडेल अशी निरुपण प्रवचनांची शैली; यामुळे नामदेवराय समाजाच्या अगदी तळागाळातील लोकांपर्यंत सहजपणे पोहोचत. त्यांच्या गौळणी, भारुडे इत्यादी वैशिष्ट्यांमुळे कीर्तन-प्रवचनांतील प्रभावी, प्रासादिक वाणी भक्तभाविकांच्या कानामनात दुमदुमत आपला खोल ठसा उमटवीत जाई आणि त्यांची मने शुद्ध, पवित्र करी. अशांपैकीच एक आर्त भक्त चोखोबा; ज्यांच्याविषयी -

'चोखा माझा जीव चोखा माझा भाव । कुलधर्म देव चोखा माझा।।'

असे उद्‌गार संत नामदेवांच्या मुखातून निघाले ते संत चोखामेळा!

महार जातीत वावर असूनसुद्धा चोखोबांची कवने अत्यंत शुद्ध, सरळ व तालबद्ध आहेत, असे सहजपणे जाणवते; गूढ, सखोल अध्यात्माच्या खुणा निरक्षर चोखोबांच्या काव्यात आढळाव्या; इतकेच नव्हे तर नवलाईची गोष्ट म्हणजे चोखोबांच्या साऱ्याच कुटुंबियांचे अभंगही अत्यंत शुद्ध आहेत. अपभ्रष्ट भाषेचा मागमूसही त्यात नाही. यावरून ज्ञानदेव-नामदेवांच्या ठायींचा भक्तिभाव आणि अंतःकरणात खोलवर रुजून ह्या सर्व कुटुंबियांच्या पचनी पडलेला ह्या संतद्वयाचा उपदेश याची प्रखर प्रचीती येते. चोखोबांच्या जीवन-प्रेरणा संतसमागमाने कशा फुलत-विकसित याचा हा स्पष्ट आलेख म्हणावा लागतो.

**जीवनालेख**

चोखोबांचा जन्मशक ज्ञात नाही. मृत्यु शके १२६० सांगितला जातो. चोखोबांचे सारे कुटुंब विठ्ठलभक्तीत रंगून गेलेले; पंढरपुरातील मेहुणपुरीस राहणारी त्यांची बहीण निर्मळा, मेहुणे बंकाजी, पत्नी सोयराबाई, पुत्र कर्ममेळा ही सर्व मंडळी विठ्ठलाची उपासक होती. 'या महाराने देव बाटविला' असा आरोप बडवे आणि ब्राह्मण करीत. पण संत नामदेवांनी चोखोबांना जवळ करून त्यांची अस्मिता जागृत केली. चोखोबांनी नामदेवांचे शिष्यत्व स्वीकारून आपला नि आपल्या कुटुंबाचा जो उद्धार घडविला; त्याला महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासात तोड नाही. तुलना नाही.

वर्णाश्रमधर्म आणि जातिभेद यांच्या कल्पनांनी ग्रासलेल्या समाजात खुलेपणाने वागता येत नाही; पोटाची खळगी भरण्यासाठी उष्ट्यावळीचा आधार घ्यावा लागतो, आपला साधा स्पर्शही इतरांना अपवित्र वाटतो आणि ज्या भगवद् स्वरूपाच्या दर्शनासाठी जीव व्याकुळ झाला आहे, त्याच्या तर मंदिराची पायरीसुद्धा चढणे शक्य नाही; अशा दारुण अवस्थेत केवळ भावभक्तीच्या बळावर आत्मसुखाचा मार्ग शोधणाऱ्या चोखोबांची आर्तता शोधक नामदेवांनी अनुभवली.

'नेत्री अश्रुधारा उभा भीमातीरी । लक्ष चरणांवरी ठेवूनिया ।।' अशा अगतिक, असहाय्य अवस्थेतील चोखोबांना नामदेवांनी आश्वस्त केले; 'विठ्ठल' या त्रिअक्षरी सोप्या मंत्राचा उपदेश आणि त्याच्या भवतापाचे निवारण नामदेवांनीच केले. त्यामुळे ते माझे गुरु; अशी स्पष्ट नोंद चोखोबा करतात.

धन्य धन्य नामदेव । माझा निरसला भेव ।। १ ।।
विठ्ठल मंत्र त्रिअक्षरी । खूण सांगितली निर्धारी ।। २ ।।
ठेवोनि माथां हात । दिले माझे हित ।। ३ ।।
दावियले तारुं । चोखा म्हणे माझा गुरु ।। ४ ।।

नामदेवांनी चोखोबांच्या मस्तकावर प्रीतीने हात ठेवून त्यांना विठ्ठल मंत्राचा उपदेश तर केलाच पण त्याहीपेक्षा - त्यांच्यावर मंगळवेढ्याच्या गावचे कुंसू घालताना तेथे जे कोसळले आणि चिरडले गेले; तेव्हा त्यांच्या 'अस्थी' आणायला नामदेव स्वतः गेले ही गोष्ट विलक्षण आहे. आपण हे काम केले, असे नामदेव नम्रपणे सांगतात. पण पुढे

'चोखा माझा जीव । चोखा माझा भाव ।।
कुळधर्म देव चोखा माझा ।।'

असे सांगून नामदेवांनी त्या अस्थी पंढरपूरच्या महाद्वारापाशी समाधीसाठी ठेविल्या; यांत नामदेवांनी 'चोखोबा' आणि 'महाद्वार' या दोहोंवरची श्रद्धा प्रकट केलीच; पण हे क्रांतिकारक कार्य करून दाखविल्यामुळे त्यांचे त्या वेळी पंढरपूर आणि वारकरी समाजावर असलेले वजनही स्पष्ट झाले. नामदेवांनी अस्पृश्योद्धाराचा केवळ विचार सांगितला नाही; आचार आचरून साऱ्या समाजात तो कसा रुजेल याचा सक्रिय वस्तुपाठच दाखविला आहे.

**स्वप्नोपदिष्ट शिष्य तुकाराम**

'ज्ञानाचा एका आणि नामाचा तुका' अशी वारकरी समाजाची श्रद्धा मोठी अर्थपूर्ण आहे. सतराव्या शतकातील तुकाराम हे तेराव्या शतकातील नामदेवांचे 'अवतार' म्हणणे हे केवळ श्रद्धेचे नव्हे, तर दोघांमधील मूळ अनुबंध सांगणारे आहे. दोघेही समाजाच्या तळागाळातून केवळ उत्कट भक्तिभाव आणि ज्ञानाविषयीची अपरंपार निष्ठा यातून उच्च आध्यात्मिक आनंदापर्यंत पोहोचले. आपल्या लौकिक प्रपंचाकडे दोघांनीही विरक्त वृत्तीने पाहून संतांच्या विभूती जनहितासाठी आपले देह कसे कष्टवितात हे सोदाहरण दाखवून दिले. पंढरपूरच्या विठ्ठलाचे समचरण हेच दोहोंच्या परमनिष्ठेचा विषय ठरले. दोहोंचे भावजीवन विलक्षण सारखे आहे. 'बुडती हे जन न देखवे डोळां' अशा अखंड जाणीवेतून या उभयतांनी सारा अभंगांचा प्रपंच केला आहे.

तुकारामांच्या अभंगगाथेवर नामदेवांचे संस्कार आहेत. ते नामदेवांचे स्वप्नोपदिष्ट शिष्य होते असे त्यांनी स्वतःच सांगून ठेवले आहे.
'नामदेवे केले स्वप्नामाजी जागे । सवे पांडुरंगे येऊनिया ।। १ ।।
सांगितले काम करावे कवित्व । वाउगे निमित्त बोलों नको ।। २ ।।

माप टाकी सळ धरिली विठ्ठले । थापटोनि केले सावधान ॥ ३ ॥
प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी । उरले शेवटी तुका लावी ॥ ४ ॥'

पांडुरंगासह येऊन स्वप्नोपदेश देऊन, वात्सल्याने सावध करून नामदेव आपली शतकोटी अभंगांची आकांक्षा तुकारामांवर सोपवितात. शतकोटी अर्थात विपुल प्रमाणात अभंगरचना कर अशी तर नामदेवांची आज्ञा होतीच. पण 'कोटी' म्हणजे खुबीदार उत्तरे देत देत प्रतिपक्षाला निरुत्तर कर असाही नामदेवांचा आदेश होता. तुकाराम आपल्या रचनेला 'उत्तरे'च म्हणतात. 'विश्वास आणि आदरपूर्वक' काही पाठ केली 'संतांची उत्तरे' असे सांगून तुकाराम 'मानियेला स्वप्नी गुरुंचा उपदेश।' अशीही स्वीकृती देतात.

पारमार्थिक, प्रापंचिक आणि साहित्य प्रेरणात्मक अशा तीनही प्रकारे नामदेवांनी तुकारामांना संस्कारित केले आहे. तुकारामांना जरी 'चैतन्य संप्रदायी' म्हटले गेले तरी, ज्या भागवतधर्माचे विस्तारक नामदेव होते, त्याचाच खोलवर ठसा तुकारामांवर उमटलेला आहे.

नामदेव-तुकारामांचे आराध्यदैवत विठ्ठल, तीर्थ पंढरी, ईश्वरप्राप्तीचे साधन भक्ती, नामस्मरण, कीर्तन आणि सत्संग या सर्व बाबतीत दोहोंच्या वाणीत कमालीचे साम्य आढळून येते. तुकाराम आणि नामदेव यांच्या अभंगसाहित्याचा या दृष्टीने अभ्यास श्री. व. वा. पटवर्धन [४] यांनी मांडला आहे.

## पंजाबची पंढरी : घुमान

आज वायव्य भारतात विद्यमान असणारे सर्वांत मोठे नामदेव स्मृतिमंदिर घुमानचे म्हणावे लागते. आपल्या परिभ्रमणानंतर नामदेव येथे स्थिरावले. (त्यांनी घूमना थांबविला) म्हणून घोमान. हे गुरुदासपूर व अमृतसर ह्या दोहोंपासून सारख्याच अंतरावर येते. दोन्ही गावात शिंपी समाजाची वस्ती मोठी आहे. हे लोक आपल्याला बाबा किंवा साधू म्हणवितात. घुमान गाव गुरुदासपूर जिल्ह्यातील थोड्या उंचवट्याच्या भागात वसले आहे. इथला परिसर निसर्गरमणीय, साधनेला अनुकूल असाच आहे.

## तापीयाना

घुमानचा मठ स्थापन करण्यापूर्वी नामदेव ज्या जंगल भागात राहिले त्याला तपोभूमीचे स्वरूप प्राप्त झालेले आहे. या जागेला 'तपियाना साहिब' म्हणतात. तिथे रम्य उद्यान तयार केलेले आहे. हा परिसर आज अमृतसर सुवर्णमंदिराशी संबंधित असून 'गुरुद्वारा शिरोमणि प्रबंधक कमिटी' या शिखांच्या मध्यवर्ती धार्मिक संस्थेच्या वतीने या ठिकाणी अनेक मजल्यांचे नामदेव मंदिर उभारण्याचा त्यांचा संकल्प आहे.

अटलजी गुरुद्वार हा सुवर्णमंदिरापेक्षा पुरातन असून मनोऱ्याच्याच आकाराचा आहे. त्यात शीख गुरुंची स्मृती म्हणून तसबिरी दिसतात. त्यात नामदेवांच्या काव्यांतले प्रसंग सुवर्णांकित पत्र्यावर खोदून ठेवलेलेही दिसतात. तपियानात एक सहा फूट उंचीचा अष्टकोनी स्तूप आहे. त्या ठिकाणी नामदेव तपाला बसल्याच्या कथा सांगितल्या जातात. आज त्या ठिकाणी ग्रंथ-साहिबाचे पठण-पारायण अखंड सुरू असते.

नामदेव स्मृतिस्थानासमोर उजव्या अंगाला आजचे 'राधाकिसनजी मंदिर पण पुरातन विठ्ठल रुक्मिणी मंदिर' आहे. या मंदिराचे प्राधान्याने वर्णन दिलेले आहे.

## बहोरदास

बहोर किंवा बोहोर म्हणजे देवकृपेने परत आलेला. नामदेवांच्या नंतर पंजाब-राजस्थानातील मठमंदिरांचे नेतृत्व बहोरदासांकडे आले असे पारंपरिक माहितीवरून समजते. हे बहोरदास भूतभिंड गावातील अलोडी नामक विधवा कष्टकरी स्त्रीचा आजारी मुलगा. अडोळीचा हा एकुलता, एका असाध्य रोगाने व्यापला. बरे होण्याची चिन्हे दिसेनात. औषधोपचाराला पैसे नाहीत त्यातच हा मुलगा ह्या दुखण्यातून बरा होणार नाही असे वैद्याने सांगितले. त्याची निराश आई त्याला घेऊन नामदेवांकडे आली. नामदेव हे केवळ संन्याशी वा साधू नव्हते. ते लोकसेवक होते. त्यांनी अलोडीच्या मुलाची काळजीपूर्वक सुश्रुषा केली आणि असाध्य रोगापासून वाचविले. नामदेवांच्या कृपेने बहोरदास धडधाकट झाला आणि देवकृपेने परत आला. आजही घुमान मंदिराची पूजाअर्चा बहोरदास वंशीयांकडेच आहे. भूतबिंड येथे असलेला नामदेवांचा मठ मोठा आहे. भूतबिंड आजकाल खूप वाढले आहे. त्याचे नवे नाव रामपुरा असून नामदेव मठाजवळ एक प्राचीन विहीर 'बावाका कुआँ' या नावाने प्रसिद्ध आहे.

## सखोवालचा लद्धा

सखोवाल हे गाव घुमानपासून जवळच आहे. नामदेवांचे एकनिष्ठ शिष्य खत्री समाजाचे लद्धा हे या गावाचे एक व्यापारी होते. हा लद्धा नामदेवांचा शिष्य कसा झाला याची हकीकत विलक्षण आहे. नामदेवांच्या कार्यपद्धतीची उत्तम ओळख करून देणारी आहे.

लद्धा हा तेलाचा व्यापारी. अत्यंत व्यवहारी वृत्तीचा आणि काटेकोर वागणारा होता. ताजे तेल गाळायचे, गावोगाव विक्रीसाठी नेऊन पूर्ण विकायचे; संध्याकाळी घुमानच्या नामदेवमठाच्या बाजूने परतताना उरलेले तेलाचे थेंब तिथल्या दिवटीत टाकून पुढे जायचे. मठात न जाता बाहेरूनच नामदेवांची चौकशी करायची असा त्याचा क्रम असे. जेव्हा नामदेव त्याला आत बोलावीत; तेव्हा तो म्हणे, मला वेळ नाही, आज धंदा लवकर संपला म्हणून थांबून चौकशी केली. आता मला उद्याच्या कामाची गर्दी आहे; गेले पाहिजे. इतर शिष्यांना त्याचे हे तुटक वागणे खटकत असे. नामदेव हसून गप्प राहात. एकदा तो असाच धंदा करून तडक घरी गेला, नामदेवांना टाळले. हे त्यांच्या लक्षात आले तेव्हा नामदेव त्यांच्या घरी गेले व म्हणाले, 'अरे, तू रोज बाहेरून माझी चौकशी करतोस; दिवटीत तेल टाकतोस; आज तसाच का गेलास ? तुझी प्रकृती बरी आहे ना ?' 'मला काय झालंय ? साधी गोष्ट आहे. काम भरपूर आणि तेल सगळंच संपलंय् ! म्हणून न थांबता गेलो.' लद्धा म्हणाला. यावर नामदेव उत्तरले, 'अरे भाऊ, तेल केव्हातरी सारेच संपणार आहे. दिवा केवळ तुझ्या तेलावर थोडाच तेवणार आहे ? आपली भेट त्यापेक्षा महत्वाची. तू मला टाकलंस तरी मी तुला टाकणार नाही. तुझ्या या कामधंद्याबरोबर तू जर थोडा देवाघरचा विचार करशील तर तुझा हा कामाचा आनंद अधिक वाढेल. लोकही तुझ्या आनंदात

सहभागी होतील. कुठलाही व्यवसाय सारखाच काही काळ करावा. पण अनंत हा काळाच्याही पलीकडे, पुढे-मागे व्यापून राहिला आहे; त्याचे भान ठेवून कुणालाही मुद्दाम टाळू नये. टाळणे सोपे असते. भेटणे फार अवघड असते. ते जर साधले तर सगळेच साधले.'

हे सारे ऐकून व्यवहारात बुडालेल्या लद्धाला उपरती झाली. तो आपला फावला वेळ नामदेवांच्या लोकोद्धारकार्याला देऊ लागला.

तिरखाण किंवा सुतार जमातीचा जाल्लो ऊर्फ जाल्हण आणि तेली-लद्धा हे दोन शिष्य नामदेवांना याच गावात मिळाले. यापैकी जाल्हण हा नामदेवांबरोबर महाराष्ट्रात आला असावा. नामदेव गाथ्यातील तीर्थावळीच्या अभंगात याचा उल्लेख मिळतो.

## नामदेव आणि त्रिलोचन

नामदेवांशी संबद्ध असल्यामुळे त्रिलोचन हा महाराष्ट्रीय कवी आहे असे पंजाबी इतिहासकार मानतात. मराठी वाङ्मयेइतिहासात याची यत्किंचितही दखल घेतली गेलेली नाही. हिंदी इतिहासकार त्रिलोचनाविषयी माहिती अशी देतात, 'एक वैष्णव आचार्य, जो ज्ञानदेव और नामदेव के गुरु थे। कहा जाता है कि स्वयं भगवानने इनके यहाँ भृत्य बनकर सेवाकार्य किया था। किंवदन्ति है कि ये रुद्र संप्रदायके संस्थापक विष्णुस्वामीकी परंपरामें हुए थे, जिसमे आगे चलकर वल्लभाचार्यने पुष्टिमार्ग की स्थापना की।' [५] डॉ. अवस्थी यांनी आपल्या म्हणण्याला कोणताही आधार दिलेला नाही. ज्ञानेश्वर-नामदेवांविषयी किती प्रगाढ अज्ञान हिंदीच्या कोश-ग्रंथातूनही दिसते त्याचा प्रत्यय वरील विधानांतून येतो.

खऱ्या अर्थाने त्रिलोचन हा नामदेवांचा एक निकट शिष्य आहे. त्याचे जीवनचरित्र फारसे ज्ञात नाही. पण तो पंजाबात त्यांच्या संगत-सोबतीत होता असे पंजाबी परंपरेवरून स्पष्ट होते. नामदेवांच्या हिंदी काव्यात त्याचे उल्लेख आहेत. त्याच्याही उपलब्ध हिंदी पदांतून गुरु म्हणून नामदेवांचा उल्लेख येतो.

'गुरुग्रंथसाहिबांत त्रिलोचनाची चार पदे संकलित असून त्यात त्याचे विठ्ठलाविषयीचे उल्लेख येतात. 'विसर गया' ताजियले संसार, 'काय मिलो यह प्राणी' अशा प्रयोगातून कवीची भाषा मराठी असावी हे स्पष्ट जाणवते.

त्रिलोचनाची पदे पूर्वी 'इंद्रायणी'तून प्रकाशित झाली आहेत. नामदेवांच्या काही हिंदी पदांची रचना त्रिलोचनास उद्देशून झालेली आढळते. नानकदेवांच्या एका पदात नामदेव-कबीराबरोबर त्रिलोचन याचाही गौरवपूर्ण शब्दात निर्देश केलेला आहे.

आजही हरिद्वार, गंगोत्री भागात त्रिलोचनदासांचे भक्तगण आढळतात. ते गुरुग्रंथसाहिबातील त्रिलोचनाची चार पदे गातात. ही पदे संत नामदेवांच्या पदांचा प्रभाव असणारी आणि मराठी वळणाची आहेत.

त्रिलोचनदास हा राजस्थानमध्ये नामदेवांना भेटलेला शिष्य असावा व पुढे तो त्यांच्याबरोबर पुढचेही प्रवास करीत राहिला.

## केसो कलंधरी : मावलपूर

केसो कलंधरी ह्या नामदेव-शिष्याचा मठ मावलपूर येथे आहे. आज हे गाव पाकिस्तानात गेले आहे. तरीही मावलपूरची 'धलाधारी की गद्दी' म्हणजेच मठ अद्यापही सुस्थितीत आहे. केसो कलंधरीची कथा पंजाबात अतिशय लोकप्रिय आहे. आजही प्रवचनकार आध्यात्मिक विवरणासाठी नामदेव-केसो संवादाचे आख्यान घेतात. केसो नामदेव-शिष्य कसा झाला याची कथा हृदयस्पर्शी आहे.

केसो हा तारा गावचा खत्री. त्याला महारोगाची बाधा झाली. घरची मंडळी त्याला सोडून अन्यत्र निघून गेली. गावकरी चर्चा करीत; पण मदत करायला कोणी पुढे येईनात. अखेर त्याने आत्महत्त्या करण्याचे ठरविले. नामदेवांना कळले. ते त्याच्या भेटीला आले. त्यांनी प्रथम त्याची सेवाशुश्रुषा केली. त्याला घुमानला आणले. तिथे उष्णपाण्याचे कुंड शोधून त्याला रोज स्नान घालू लागले. केसोचा महारोग पूर्ण बरा झाला. नामदेवांसारखा संत केसोची सेवा करतो हे पाहून इतर लोकही केसोला मानू लागले. संतसहवासामुळे केसो उत्तम प्रवचने करू लागला. त्याचा आवाज चांगला होता. त्याच्या भजनांचे श्रवण करताना लोक तल्लीन होत.

केसो कलाधारीच्या जीवनकथेचे तात्पर्य सांगून संत नामदेव हे अशा प्रकारचे ईश्वराचे प्रेषित होते असे सांगण्यात येते.

साऱ्या उत्तर भारतात याच एका मठाचे कार्य अत्यंत व्यवस्थितपणे चालले आहे. जातीय दंगलींच्या वेळी या मठाला बरीच झळ पोहोचली होती. तथापी दंगे संपल्यानंतर मठ पुन्हा नीट बांधून लोकांनी उभा केला व दर वर्षी नानक जन्मोत्सवाचे वेळी सरहद्दीवरील बंधने शिथिल असतात; अशा वेळी भक्तगण व शीख यात्रेकरू दर्शनार्थ जातात व मठ संरक्षण करीत असतात.

अशा प्रकारे संत नामदेवांचा शिष्य व भक्त परिवार महाराष्ट्रात व इतरत्र विपुल प्रमाणात विधमान आहे. परंतु काही ठळक शिष्यांचाच परिचय करून देणे शक्य झाले आहे.

टीप : (ह्या लेखातील महत्त्वाच्या माहितीसाठी मा. डॉ. अशोक प्रभाकर कामत ह्यांचा अप्रकाशित प्रबंध' संत नामदेव यांचे जीवन : काव्य यांचा पुनर्विचार' यातील संदर्भ महत्त्वाचे घेतलेले आहेत.)

(१) जोशी डॉ. प्र. न. : 'नामदेवांचा संतपरिवार' : 'श्रीनामदेवदर्शन' पृ. ६४९ ते ६६५.

(२) : महिपती, 'भक्त-विजय', निर्णयसागर, मुंबई १९५०.

(३) : देशमुख शारदा मो. : 'दासीजनीचे एक दर्शन' : युगवाणी ऑक्टो. १९६८.

(४) पटवर्धन व. वा. 'नामदेव आणि तुकाराम' श्रीनामदेवदर्शन, पृष्ठे ७७३ ते ७७८

(५) : अवस्थी मोहन : त्रिलोचन हिंदी साहित्यकोश, खंड १ : पृ. १२४

कै. डॉ. सौ. पद्मावती श्रीपाद श्रोत्रिय
संत नामदेव अध्यासन : संत अध्ययन संशोधन केंद्र, पुणे.
-पुणे विद्यापीठ

# नामदेवकृत कृष्णाच्या बालक्रीडा

**डॉ. प्र. न. जोशी**

एम. ए. पी.एचडी.

प्रबंध विषय मधुरा भक्ती

नू. म. वि. मुख्याध्यापक. १७५ लहान-मोठे ग्रंथ प्रसिद्ध. शिवाय शालेय क्रमिक पुस्तके लेखन विषयांत विविधता. शिक्षण शास्त्रज्ञ, संत साहित्य अभ्यासक व विचारवन्त. शैक्षणिक व सामाजिक परिस्थितीच्या अभ्यासासाठी अमेरिका भेट. चित्रकार व चित्रकला संबंधित ग्रंथ प्रसिद्ध. संत विषयक वाङ्मयाचे १४ ग्रंथ प्रसिद्ध.

पंढरपुरचा विठ्ठल म्हणजे श्रीकृष्ण होय. मराठी संतांचे हे अत्यंत आवडते दैवत आहे. सर्व संतांनी श्रीकृष्णाच्या बाललीला मोठ्या आवडीने वर्णन केल्या आहेत. भागवतामधील श्रीकृष्णचरित्र संतांनी अभंगवृत्तातून गायिले आहे. आद्य कीर्तनकार आणि सगुण प्रेमाचे मूर्तिमंत प्रतीक नामदेव यांनी या श्रीकृष्णाच्या बालक्रीडा विविध प्रकारांनी वर्णन केल्या आहेत. श्रीकृष्णाचे संक्षिप्त चरित्र, बालपणचे त्याचे पराक्रम, त्याच्या नाना प्रकारच्या खोड्या, गोपींची गाऱ्हाणी, यशोदेने त्यांची काढलेली समजूत, श्रीकृष्णाने बालपणी यमुनेच्या वाळवंटावर आपल्या मित्रांसह केलेल्या क्रीडा, आलेल्या संकटांचा श्रीकृष्णाने केलेला परिहार; इत्यादी बाबी नामदेवांनी आपल्या रसाळ व गोड वाणीने वर्णन केल्या आहेत.

गोकुळात श्रीकृष्णाचा जन्म झाला. वसुदेव व देवकी यांचा छळ कंसाने चालूच ठेविला होता. देवकीचे तेज जसे वाढत होते तसे कंसाचे हृदय जळत होते. परंतु श्रीकृष्ण कंसाच्या तावडीतून सुटला आणि गोकुळात नंद पाटलाच्या वाड्यात राहू लागला. त्याच्या जन्माच्या वेळी नामदेव सांगतात की, मयूरादी पक्षी नृत्य करीत होते. नद्या खळाळून वाहात होत्या. भूमीवर केशराचे आणि कस्तुरीचे सडे पडले होते. विमानातून सुरवर दाटी करून आनंदाने पाहात होते. गंधर्व गात होते. मंद मंद मेघगर्जना होत होती. नाना प्रकारची वाद्ये मंजूळ स्वर करीत होती. अशा वेळी रोहिणी नक्षत्रावर श्रीकृष्णाचा जन्म झाला. आणि दाही दिशा उजळून निघाल्या.

बालकृष्णाच्या रूपाचे वर्णन नामदेव मोठ्या गोड भाषेत करतात. कृष्णाच्या मुकुटावर रत्नरूपी नक्षत्रांचा मेळा होता. त्याच्या कपाळावर केशराचा टिळा होता. कानात विजेप्रमाणे चमकणारी कुंडले होती. श्रीकृष्णाचे अधर अतिशय कोवळे होते. शामवर्णाच्या या बालकाने गळ्यात वैजयंतीमाला धारण केली होती. त्याच्या पायातील वाळे रुणुझुणू करून वाजत होते. त्याच्या आरक्त वर्णाची नखांची शोभा वाढत होती. श्रीकृष्णाच्या दर्शनाने नामदेवांचे डोळे दिपून गेले.

नंदाने स्नान करून नवी वस्त्रे परिधान केली. ब्राह्मणांना बोलावून नव्या बालकाचे सर्व संस्कार केले. गायी, तीळ, तांदूळ, द्रव्य यांचे दान केले. ब्राह्मणांनी आशीर्वाद दिला. गोपींनी औक्षण केले. या बालकास कोणाची दृष्ट लागू नये म्हणून यशोदा त्याला अतिशय जपत होती. सर्व गोपी या बालकृष्णाचे मोठे कौतुक करीत होत्या. गोकुळातील लोक त्याच्याबरोबर वनभोजन करून नाना प्रकारचे खेळ खेळत होते. अशा वेळी एका गाडीखाली बालकृष्ण झोपला होता. श्रीकृष्णांनी हा गाडा अंगावर येताच त्याला नष्ट केले. या बालकावर यशोदेचे फारच प्रेम होते. मांडीवर घेऊन ती त्याला खेळवीत असे आणि म्हणत राही की, "तूचि माझा प्राण तू माझी माऊली । तूं माझी बहिणुली कान्हाबाई ॥" यशोदेला हा बालकृष्ण म्हणजे गणगोतच वाटत होता. मांडीवर घेऊन ती त्याचे वारंवार चुंबन घेत असे.

या बालकृष्णाने गोकुळात अनेक चमत्कार केले. कंसाने पाठविलेल्या तृणावर्त नावाच्या राक्षसाचा नाश केला. पूतनाचा श्रीकृष्णाने उद्धार केला. महाबळ नावाच्या ज्योतिषाचा नाश बालकृष्णाने केला. त्याने श्रीकृष्णाचे भलतेच भविष्य वर्तविले होते. हा बालकृष्ण नंदाच्या अंगणात दुडू दुडू धावत असे. एखाद्या वेळी तो तोंडात माती घालत असे. त्याच्या कपाळावर पिंपळपान शोभून दिसत असे. हा बालकृष्ण नाना प्रकारच्या खोड्या करीत असे. तो वासरांच्या शेपट्या ओढत असे. भुंगे, मांजरे यांना तो त्रास देत असे. नामदेवांनी म्हटले आहे की, 'मुतुनिया हातें भूमी सारविती । पोटासी पुसती दोघेजण ॥' दोघे म्हणजे श्रीकृष्ण आणि बलराम. भोजन करताना मध्येच उठून बाहेर पळत आणि कुत्र्याला भो-भो करून बोलावीत असत. त्याच्यापुढे वाटी ठेऊन ते त्याला कौतुकाने गोंजारीत असत.

नंद पाटलाच्या घरातही श्रीकृष्ण व बलराम नाना प्रकारच्या खोड्या करीत असत. त्यांचे लक्ष दह्या-दुधांच्या माठांवर असे. यशोदा ताक घुसळू लागली की श्रीकृष्ण तिच्या पाठीवर रेलून लोण्याची मागणी करीत असे आणि ते मिळाले नाही तर श्रीकृष्ण व बलराम दूध, दही, लोणी चोरून खात असत. प्रसंगी दह्या-दुधाचे माठही ते लवंडून देत असत. यासंबंधी यशोदामातेने नंदजींकडे तक्रार केली. तेव्हा यशोदेला नंदांनी मोठे मार्मिक व समर्पक उत्तर दिले. ते म्हणाले की, 'नासूं दे गे दह्या दुधासी । विश्रांतीसी घर आहे एवढेंचि ॥'

कधी सवंगड्यांस घेऊन तो गौळणींच्या घरी जात असे. त्यांच्या शिंक्यादरील दह्या-दुधाची मडकी फोडीत असे. कोणी दूध पिऊन टाके. कोणी दही खात असे. कृष्णाने केलेल्या या खोड्यांबद्दल गवळणी यशोदेकडे येऊन गाऱ्हाणी सांगत असत. यशोदा कशीतरी त्यांची समजूत काढीत असे. एकदा कृष्णाने माती भक्षण केली. तेव्हा यशोदेने हातात काठी घेऊन त्याला दटाविले. आणि तोंड उघडण्यास सांगितले. कृष्णाने

तोंड उघडे केल्याबरोबर यशोदा चमकली. तिला त्याच्या मुखात अनंत ब्रह्मांडे दिसली.

यशोदा व कृष्ण यांच्यातील वात्सल्याची मनोहर चित्रे नामदेवांनी शब्दबद्ध केली आहेत. नामदेवांची भाषा सरळ व गोड आहे. एका अभंगात ते म्हणतात की,

यशोदा घुसळीत । स्तन मागे भगवंत ।।
धालोनी पदर । पाजीतसे जगदीश्वर ।।
दूध जातसे ऊतोन । उठे कृष्णासी टाकून ।।
मंथनपात्रानें फोडीत । पळे तेथोनि त्वरित ।।
मागें धावली यशोदा । धरावया त्या गोविंदा ।।
हातीं न लगे जगजेठी । नामा म्हणे होय कष्टी ।।

अशा खोड्या श्रीकृष्ण करीत असे. कधी यशोदा खोट्या रागाने त्याला बोलत असे. एकदा तिने दाव्याने श्रीकृष्णास उखळीस बांधले. तेव्हा श्रीकृष्ण उखळीसह पळत गेला आणि विमलार्जुन नावाच्या वृक्षरूपी कुबेरांचा त्याने उद्धार केला.

सर्व गोकुळातील गोपी कृष्णाच्या खोड्यांना कंटाळून गेल्या. आणि याच गोपी आज कृष्ण घरी कसा आला नाही ? म्हणून कष्टी होत होत्या. गोपींच्या घरचे दही-दूध व लोणी श्रीकृष्ण आपल्या मित्रांसह खाऊन संपवत असे. कधी त्यांचे कुंभ फोडीत असे. नाना प्रकारची गाऱ्हाणी गोपी यशोदेला सांगत. एकदा नंदाच्या घरी चंपाषष्टीचा कुळधर्म होता. नाना प्रकारची पक्वान्ने केली होती. वाघ्या व मुरळ्या जमल्या होत्या. याच वेळी श्रीकृष्णास भूक लागली आणि त्याने देवापुढे ठेवलेला नैवेद्य खाऊन टाकला. असेच एकदा संकष्टी चतुर्थीस झाले. गणपतीस केलेला मोदकांचा नैवेद्य कृष्णाने खाऊन टाकला. यशोदा त्याच्यावर रागावली. पण कृष्णाचे माहात्म्य तिला पटून ती आनंदीत झाली.

एकदा तर श्रीकृष्ण नंदाच्या अंगणात रांगत होता. तेथील गुळगुळीत फरशीवर त्याने आपले प्रतिबिंब पाहिले आणि तो यशोदेला म्हणाला, 'हे प्रतिबिंब माझ्या हाती दे.' ते देता येणार नाही असे मातेने सांगितले. श्रीकृष्ण रडू लागला. मातेने त्याच्यापुढे अनेक खेळणी ठेविली. पण श्रीकृष्ण रडताना थांबला नाही. यशोदेने कसेतरी त्याला झोपविले आणि राधेला त्याला घरी घेऊन जाण्यास सांगितले. राधा व श्रीकृष्ण यांच्या संबंधीच्या अनेक कल्पना नामदेवांनी घडविल्या आहेत. श्रीकृष्ण राधेच्या घरी मंत्राच्या सामर्थ्याने मोठा होतो आणि याच वेळी तिचा नवरा अनय घरी येऊन दारावर थाप मारतो. राधा कृष्णास लहान होण्यासाठी विनंती करते. आपण लहान होण्याचा मंत्र विसरलो असे कृष्ण सांगतो. पण श्रीकृष्ण बालरूप धारण करतो. अनयाने घरात येऊन पाहले, तर बालकृष्ण आनंदाने जेवत होता. अनय राधेला म्हणाला, तू एकटी घरी असतेस. तुला करमले नाही तर कृष्णास घरी घेऊन येत जा.

अशा प्रकारे अनेक शब्दचित्रे राधा व कृष्ण यांची नामदेवांनी काढली आहेत. यानंतर यमुनेच्या काठावर श्रीकृष्णाने ज्या क्रीडा केल्या त्यांचेही मोठे सुरेख व मनोरंजक वर्णन नामदेवांनी केले आहे. यशोदेच्या सांगण्यावरून श्रीकृष्ण आपल्या सवंगड्यासह गायी चारण्यासाठी यमुनेच्या वाळवंटात जातो. त्याआधी यशोदा व गोपाळ श्रीकृष्णाला प्रेमाने उठवितात आणि त्याच्याबरोबर खेळण्यासाठी यमुनेच्या तीरावर जातात. यशोदामाता त्या मुलांना म्हणते की, 'सांभाळा भगवंत वनामध्ये । जवळीच खेळा जाऊ नका दुरी । सांभाळा मुरारी प्राण माझा ।।' माझ्या कृष्णाच्या पायात काटे मोडतील अशा वाटेने तुम्ही जाऊ नका. त्याची सर्व प्रकारे काळजी घ्या.

या प्रकारे भगवंत गोपाळांसह यमुनेच्या तीरावर गायी चारण्यासाठी व नाना प्रकारचे खेळ खेळण्यासाठी जातो. नाना प्रकारचे खेळ मोठ्या आनंदाने ते खेळतात. एकदा वच्छासुर नावाचा राक्षस वेष धारण करून त्या वनात आला. त्याचा नाश श्रीकृष्णाने केला. नंतर मुलांना भूक लागली. या प्रसंगाचे वर्णन करताना नामदेव म्हणतात की,

चला आता जेवूं बसूं एके ठायीं । काढा रे लवलाही शिदोरिया ।।
गोपाळ मिळोनी आनंदें जेविले । ब्रह्मरसें धाले कृष्णासंगें ।।

प्रत्यक्ष परब्रह्म आपल्याबरोबर खेळत आहे, भोजन करीत आहे. याचा आनंद सर्व मुलांच्या चेहऱ्यावर उमटलेला दिसतो. जेवणानंतर मुले पाणी पिण्यासाठी नदीजवळ आले. तेथे त्यांना बकरूपी एक दैत्य दिसला. कृष्णाने त्याचाही शेवट केला. श्रीकृष्ण व गोपाळ वनात निघाले तेव्हा सर्व गौळणींनी त्याला डोळे भरून पाहिले. त्याचे कुरळे केस, सुहास्य वदन, आकर्ण नयन त्यांना शोभिवंत वाटले. त्याचे दात हिऱ्यांप्रमाणे चमकत होते. कपाळावर कस्तुरीचा टिळा शोभत होता.

श्रीकृष्णाने मुरली वाजविली की सर्व गोकुळ सावध होत होते. सर्व मुले शिदोऱ्या बांधून तयार होत असत. मुलांच्या गळ्यांत पुष्पांच्या माळा असत. श्रीकृष्णाने पीतांबर धारण केलेला असे. त्याच्या अंगास चंदनाची उटी लावलेली असे. मोरपिसांचा मुकुट त्याला मोठा शोभून दिसे. खेळावयास जाताना मुले नाना प्रकारची वाद्ये वाजवीत असत.

या कृष्णाचे माहात्म्य केवढे सांगावे ? ब्रह्मादिक देव ज्याच्या पायांचे तीर्थ घेतात त्या कृष्णाला पायावर घेऊन यशोदा स्नान घालते. नंदाचे पुण्य केवढे म्हणून सांगावे ? सनकादिक ज्याचे ध्यान करतात तो श्रीकृष्ण गोकुळात गायी चारत असतो आणि गवळ्यांच्या मुलांबरोबर भोजन करीत बसतो. कधी कधी अनेक संकटे येतात. कंसाने धाडलेल्या अघासुराचा नाश श्रीकृष्णाने केला. मित्र आणि श्रीकृष्ण यांच्या भोजनाचा थाट काय वर्णन करावा ? नामदेवांनी म्हटले आहे की,

कोणी मांडिताती पानें । वरी ठेविताती अन्नें ।।
कोणी ठेवी मांडीवरी । कोणी जेवी भूमीवरी ।।
कोणी पसरिती चवाळे । कोणी अंथरती जाळें ।।
गोळे घेऊनिया हातीं । येरयेरातें हाणिती ।।

हे सर्व कौतुक स्वर्गातील देव मोठ्या आनंदाने पाहतात. या मुलांच्या अन्नातील प्रसाद आपणास मिळावा या इच्छेने देव व्याकूळ होतात. पण त्यांना गोपाळ वाकुल्या दाखवितात. हे पाहून देवांनी मुलांना शासन करण्याचे ठरविले. पण त्याचा उपयोग काही झाला नाही. प्रत्यक्ष ब्रह्मदेव कासावीस झाला. तो थरथरा कापू लागला. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहत होत्या. त्याने आपल्या बापास म्हणजे

कृष्णास ओळखले आणि हात जोडून ब्रह्मदेवाने त्याला नमस्कार केला.

असा हा श्रीकृष्ण वर्णाने श्यामल होता. त्याच्या गळ्यात गुंजांच्या माळा होत्या. वनपुष्पांच्या माळा त्याच्या गळ्यात शोभत होत्या. गायी चारत असताना तो मुरली वाजवीत असे. त्या स्वराने पशु-पक्षी स्तब्ध होत असत. यमुनेचे पाणी वाहण्याचे थांबत असे. असे हे गोकुळ धन्य आहे. यमुनेचा तीर धन्य आहे. या श्रीकृष्णाच्या क्रीडेचे वर्णन करताना नामदेव म्हणतात की,

आनंदे खेळत । रामगडी कृष्ण नाथ ।।
गडी म्हणती रामा । ताडफळें देई आम्हां ।।
सकल मिळोनी । आले धेनुकांचे वनीं ।।
वृक्ष हालवोनी । फळें पाडिती मेदिनीं ।।
येत धावोनी असुर । करी तयाचा संहार ।।
भक्तांचा अंकित । नामा म्हणे कृष्णनाथ ।।

यमुनेच्या तीरावर क्रीडा करीत असताना एक मोठे संकट उभे राहिले. यमुनेच्या डोहात कालिया नावाचा विषारी सर्प राहात असे. त्याच्या भीतीमुळे पक्षांनी व श्वापदांनी यमुनेचा डोह सोडून दिला होता. पाण्यामधून विषारी ज्वाळा निघत असत. त्यामुळे काठावरची झाडे जळून जात होती. अशा प्रसंगी वैकुंठनायकासह गोपाळांचा मेळा त्या वनात आला आणि हुतूतू, हमामा, लपंडाव वगैरे खेळ खेळू लागला. तहानेने व्याकुळ झालेले गोपाळ यमुनेचे पाणी पिऊ लागले, तेव्हा त्यांच्या मुखांची आग-आग झाली. हे सर्व कालिया सर्पामुळे घडले याची जाणीव श्रीकृष्णाला झाली आणि क्षणात तो कदंब वृक्षावर चढला आणि त्याने पाण्यात उडी घेतली. सर्व मुले भीतीने रडू लागली. कृष्णा आता आम्हास तुजवीण कोण आहे ? आम्ही तुझ्याशिवाय घरी तरी कसे जावे ? असे म्हणून मुले शोक करू लागली.

ही घटना यशोदा मातेस समजली. तिचा जीव तळमळून गेला. माझ्या लेकराला हा कालिया त्रास देणार नाही ना ? अशी शंका मातेस आली. सर्व गोकुळ चिंतित झाले होते. यशोदेचा जीव तळमळत होता. कालिंदीच्या तीरावर एकच हलकल्लोळ माजला होता. यशोदा व रोहिणी कपाळ पिटीत होत्या. 'धांव धांव कृष्णा दावी रे वदना । पाजूं आतां पान्हा कोणा लागीं ।।' असा शोक यशोदा माता करीत होती. नंदाने तर आपले जहाज बुडाले, आपण अभागी झालो म्हणून शोक करण्यास प्रारंभ केला. आता रोज सकाळी कोणाचे मुख मी पाहू ? गोकुळातील लोक आता प्राण कसा घालवीत असतील असे नंदाला वाटले.

सर्वांनी श्रीकृष्ण सुखरूप असावा, म्हणून प्रार्थना केल्या. श्रीकृष्णाने कालियाच्या मस्तकावर पाय ठेवून त्याला हैराण केले आणि श्रीकृष्ण पाण्याबाहेर आला. त्याला पाहून सर्वांना आनंदाचे भरते आले. अशी अनेक संकटे गोकुळात श्रीकृष्णावर आली आणि तो त्यातून सुखरूपपणे बाहेर पडला. वृंदावनात श्रीकृष्ण गोपाळांसह भोजन करी. तेव्हा आकाशातील देव मत्स्यरूप धारण करून यमुनेच्या पाण्यात लपून बसत. गोपाळ हात धुतील तेव्हा त्यांच्या हाताची शिते जरी मिळाली तरी देव संतुष्ट होत. श्रीकृष्ण, गोकुळ, वृंदावन, यमुना यांचे माहात्म्य देवांनाही पटत होते. आजही याची साक्ष वारकरी पंथात आहे. काल्याचा प्रसाद खाऊन झाल्यावर वारकरी नदीमध्ये हात धुवत नाहीत. त्यांना वाटते की न जाणो, आपल्या हाताची शिते स्वर्गातील देवांना प्राप्त होतील !

श्रीकृष्णाचे गायींच्यावर अत्यंत प्रेम होते. चंद्रभागा, गंगा, भागिरथी, यमुना, ताम्रपर्णी अशा नावांनी तो गाईना हाक मारी आणि त्या त्याच्याकडे धावत असत. सरस्वती, प्रवरा, कालिंदी, नर्मदा, तुंगभद्रा अशीही नावे गायींची होती. श्रीकृष्णानी मुरली वाजविली की, सर्व वृंदावन एकरूप होऊन ऐकत होते. नामदेवांनी म्हटले आहे की, वाघांच्या खांद्यांवर माना टाकून गायी स्तब्ध असत. लहान मुले मातेचे स्तनपान करण्याचे विसरून जात. सर्प आणि मुंगूस, हत्ती आणि सिंह एके ठिकाणी बसून असत. गोकुळच्या गोपी मुरलीच्या नादाने वेडावून जात. वेणीफणी सोडून त्या तशाच वृंदावनाकडे धाव घेत असत. भोजन करीत असताना मुखातील घास सोडून गोपाळ कृष्णाच्या मुरलीच्या वेधाने धावत असत. उदकांचे कुंभ घेऊन गोपी वाटेतच तटस्थ होऊन थांबत असत.

असेच एकदा श्रीकृष्ण आपल्या सवंगड्यांसह यमुनेच्या तीरावर खेळत होते. या वेळी मुलांच्या जवळ शिदोऱ्या नव्हत्या आणि त्यांना तर भूक लागली होती. आपली ही नड मुलांनी श्रीकृष्णास सांगितली. त्या वेळी यमुनेच्या तीरावर थोड्या दूर अंतरावर ऋषींचा यज्ञ चालला होता. पक्वान्ने तयार झाली होती. त्यांना भोजनाचे पदार्थ गोपाळांनी मागावेत, असे श्रीकृष्णांनी सांगितले. त्याप्रमाणे गोपाळ यज्ञकर्त्या दीक्षितांकडे गेले. आणि त्यांनी खाद्यपदार्थांची मागणी केली. पण ऋषींना ती मान्य झाली नाही. यज्ञभोक्ता कोण ? हे त्यांना समजले नाही. तेव्हा श्रीकृष्णाने ऋषींच्या पत्नींकडे गोपाळांना पाठविले. त्यांनी त्या स्त्रियांना सर्व सांगितले. 'राजकुमार सांवळा राजीवलोचन । पाहताती कृष्णमुख तेव्हा । आनन्दाचे नेत्रीं वाहतें जीवन ।।' अशी ऋषींच्या पत्नींची अवस्था झाली. खरा देव कोण आहे ? हे त्यांनी ओळखिले होते. ऋषींच्या पत्नींनी यज्ञभोक्त्या श्रीकृष्णास अन्नपदार्थ आनंदाने देऊन तृप्त केले.

असे अनेक प्रसंग नामदेवांनी श्रीकृष्णांच्या बालक्रीडेत वर्णन केले आहेत. इंद्राने आणलेले विघ्न, गोवर्धन पर्वताचा आश्रय, वृंदावनातील रासक्रीडा, श्रीकृष्ण आपणाला वश झाला आहे म्हणून गोपींना झालेला गर्व, श्रीकृष्णाचे अदृश्य होणे, त्यावर गोपींची तळमळ, पुन्हा श्रीकृष्णाशी मीलन, इत्यादी प्रकार नामदेवांनी मोठ्या रसाळ वाणीने व आर्त भावनेने वर्णन केले आहेत. वृंदावनात गोपी कृष्णासाठी मध्यरात्रीही येत असत. कृष्ण त्यांना घरी जाण्यासाठी उपदेश करी. कधी कधी गोपी वृंदावनात असत आणि त्याच वेळी आपल्या पतीच्या शेजेवर पहुडलेल्या असत. असे मोठे लाघव नामदेवांनी भागवतपुराणाच्या आधारे वर्णन केले आहे.

श्रीकृष्णांनी यमुनेच्या तीरावर ज्या क्रीडा केल्या त्यांचे मोठे प्रत्ययकारी वर्णन नामदेवांनी केले आहे. एकदा श्रीकृष्ण, बलराम व इतर सवंगडी यांना घेऊन गायींच्या बरोबर यमुनेच्या तीरावर गेला. नाना प्रकारचे खेळ खेळून गोपाळ दमले. त्यांना भूक लागली. सर्व मुले वर्तुळाकार बसून आपापल्या शिदोऱ्या सोडू लागले. मध्ये नंदपाटलाची दोन मुले मोठ्या ऐश्वर्याने बसली होती. त्या मुलांची शिदोरी गोड गोड

पक्वान्नांची होती आणि इतर गोपाळांच्या शिदोऱ्या अगदी साध्या होत्या. मळक्या फडक्यात कोणी भाकरी आणली होती. कोणी नुसतेच पोहे आणले होते. परंतु श्रीकृष्णाने या मुलांच्या सर्व शिदोऱ्या आपल्या शिदोरीत मिसळून त्यांचा एक काला तयार केला आणि तो सर्वांनी भक्षण करण्यास सुरुवात केली. एवढ्यात रवंथ करीत असलेली एक गाय एका शेतकऱ्याच्या शेतात शिरून पिकांचा नाश करू लागली. आता त्या गाईस आणण्यासाठी श्रीकृष्ण आपणासच सांगणार हे ओळखून बोबडा, लंगडा पेंद्या रागावून श्रीकृष्णास म्हणाला,

कान्हु थंबाल थंबाल आपुल्या गायीं ।
आम्ही आपुल्या घरासी जातो भाई ।।
काली गीलीले गीली गाय व्याली ।
तीचा खलूसले गोड झाला लइ ।
तुम्ही समद्यांनी लइ लइ घेतला ।
मी एक गलीब ले म्हणून थोडका दिला ।
तुम्ही थोलल्या पाटलाचे लेक ।
तुम्हा मंधी गलीब मी आहे एक ।
तू म्हणशील ले याला कळत काहीं नाहीं ।।

नामदेवांचे हे पद मोठे रसाळ व तत्त्वस्पर्शी आहे. देव व भक्त यांचे प्रेमाचे भांडण यात नामदेवांनी वर्णन केले आहे. यमुनेच्या तीरावर या क्रीडा श्रीकृष्णांनी गोपाळांसह केल्या. त्यांना सामाजिक दृष्टीने मोठा अर्थ आहे. एकदा हा खेळ सुरू झाला की हा मोठा, हा लहान, हा श्रीमंत, हा गरीब असा भेद उरत नाही. सर्वांचे भोजन एका पंक्तीतच होते. सर्वांना काला म्हणून गोड लागतो. ही प्रथा अद्यापही वारकरी पंथाच्या काल्याच्या कीर्तनात जिवंत राहिलेली दिसते. जात, धर्म, स्त्री, पुरुष न पाहता सर्वजण काल्याचा प्रसाद मोठ्या आवडीने भक्षण करतात आणि आपले हात आपल्या धोतरास पुसतात. असा एकत्त्वाचा संदेश कृष्णाच्या या बालक्रीडा देताना दिसतात. भक्ताला देवाचे दर्शन हवे असते आणि त्याची संगत व जमेल तर पंगत मिळाली तर त्याला मनस्वी आनंद होतो.

श्रीकृष्णाच्या क्रीडा जशा यमुनेच्या तीरावर होत्या. तशाच त्या नंदपाटलाच्या अंगणांतही होत्या. बालकृष्ण यशोदेच्या पुढे कसा हट्ट करीत असे याचे मोठे हृद्य वर्णन नामदेवांनी केले आहे. हा बालकृष्ण नंदाच्या अंगणात रांगताना गोपींनी कसा पाहिला ? तर नामदेव सांगतात की,

तळवे तळहात टेकीत । डाव्या गुडघ्याने रांगत ।।
रंगणीं रंगनाथ । तो म्यां देखिला गे सये ।।
एक्या हातीं लोण्याचा कवळु । मुख माखिलें अळुमाळु ।।
चुंबन देता येतो परिमळु । नवनीताचा गे सये ।।
येणें माझे कवाड उघडिलें । येणें शिंकें वो तोडिलें ।।

अशा तक्रारी गोपी घेऊन येत असत आणि यशोदा माता कधी बालकृष्णाची समजूत काढे तर कधी गोपींनाच दोष देई. यासंबंधी एक प्रसिद्ध गौळण नामदेवांनी लिहिली आहे. तीमधील काही ओळी अशा आहेत,

*बाळ सगुण गुणाचे गे तान्हे । बाळ दिसतें गोजिरवाणें गे ।।*
*काय सांगता गाऱ्हाणें गे । गोकुळच्या नारी ।।*
*सावळां गे चिमणा माझा । खेळे राजा ।।*
*तुम्ही मोठ्या ढालगजा गे । गोकुळच्या नारी ।।*
*तुम्ही लपवूनि याची गोटी गे । लागता याचे पाठीं गे ।*
*ही एवढीच रीत खोटी गे । गोकुळच्या नारी ।।*

बालकृष्णाच्या अशा क्रीडा नामदेवांनी मनापासून गायिल्या आहेत. जगाचा सूत्रधार परमात्मा श्रीकृष्ण बालरूपाने नंदाच्या घरी वावरतो, याचे नामदेवांना मोठे कौतुक आहे. हा बालकृष्ण नंदाच्या देव्हाऱ्यातील देव दूर फेकून आपण स्वतः त्यांच्या सिंहासनावर बसतो. यासंबंधी एक गौळण मास्तर कृष्णराव यांनी महाराष्ट्रात अत्यंत लोकप्रिय केली आहे. ती अशी, 'परब्रह्म निष्काम तो हा । गवळिया घरी ।। वाक्या वाळे अंदु कृष्ण नवनीत चोरी ।।'


डॉ. प्र. न. जोशी
समदा, डॉ. केतकर मार्ग
एरंडवणा, पुणे - ४११ ००४.


## माय-माऊली

रूपाचा ठेवा
वाणीत गोडवा
सुगरणीचा हात
पाठी मायेची थाप
साधा सरळ स्वभाव
नाही आपपर भाव
हृदयाची माया
धरी वात्सल्याची छाया
तृप्त अन् शांत
जशी समईची वात
नित उत्साह अमाप
प्रकटला आपोआप
राहो समाधान उदंड
हीच प्रार्थना अखंड


सौ. मंजिरी मोहन रानडे
५९० शनिवार पेठ, वैद्य वाडा,
पुणे ४११ ०३०.

# ।। नाम-चिंतामणी - संत नामदेव महाराज ।।

डॉ. प्रा. सौ. नीला जोशीराव

विवाहोत्तर १४ वर्षांनी महाविद्यालयीन शिक्षणाला सुरुवात १९६९ साली एम.ए. मेरीटमध्ये. २२ वर्षे प्राध्यापक - मराठी विभाग प्रमुख म्हणून १९९२ मध्ये निवृत्त. जीवन विकास, ज्ञानराज, पुरुषार्थ, सज्जनगड इ. मासिकांतून लेखन. 'दासबोधातील भक्तीमार्ग' प्रबंधाला प्रा. जिन्सिवाले पुरस्कार. गीता, ज्ञानेश्वरी, गंगालहरी, दासबोध विविध विषयांवर महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर शेकडो प्रवचने.

'ज्ञानदेव ज्ञानदेव ।
म्हणतां 'ज्ञान' देव देतो ।।''

ही संतवाणी, तशीच 'नामदेव नामदेव ।
म्हणतां 'नाम' देव देतो।।'

असाच 'नामचिंतामणी' नामदेव महाराजांना पारमार्थिक अधिकार प्राप्त झाला तो त्यांच्या 'प्रेम भक्तीमुळेच'

नामदेवांचा नामचिंतामणी पावला अन् त्यांचे अवघे कुटुंबच विठ्ठल भक्तीत दंग झाले. नामदेव कुटुंबियांचे अभंग हा एक स्वतंत्र अभ्यास विषय आहे, त्यातही 'म्हणे नामयाची जनी ।' या जनाबाईचे कौतुक तर अपरंपार आहे. 'स्त्री जन्म म्हणऊनी न व्हावे उदास' हे तिच्याच पासून शिकावे. आई मेली बाप मेला । आता सांभाळी विठ्ठला म्हणून ती स्वतःला विठ्ठलाच्या 'सांभाळी' घालते. संशोधकांच्या संशोधन पदव्या अपूर्ण ठरविणारे 'संत जनाबाई' हे ७०० वर्षांपूर्वीचे एक 'चालते बोलते' आश्चर्य आहे. विठ्ठलाशी, त्यांच्या पुंडलिकाशी ती भांडते देखिल -

*'का रे पुंड्या मातलासी । उभे केले विठ्ठलासी ।*
*युगे झाली अठ्ठाविस । तरी न म्हणसी खाली बैस ।।'*

असा चतुर्युग संकल्पनेचा निर्वाळा देते. तर कधी कधी - देवाला

'विठ्या ! विठ्या ! मूळ मायेच्या कारट्या ।
उभी राहून अंगणी शिव्या देते दासी जनीं ।।'

असा प्रेमाचा रागावण्याचा हक्कही ती बजावते. जनाबाईचं कोडकौतुक करावे तितके थोडेच, तसेच तिच्या नाम-प्रेमभक्तीचे देखिल; तिच्या गुरुपेक्षा ती काकणभर सरसच आहे.

तिचे 'जाते' तिच्या ओव्यांइतकेच गोड आहे. क्षणाक्षणाला जे 'जाते' तेच जग आणि जगाचा जगन्नाथ जनाबाईला तिच्या दळण कांडणात बरोबरीने अन् परोपरीने मदत करतो. ती म्हणते,

'सुंदर माझे जाते गं । बहु फिरत गं ।
ओव्या गाऊ कौतुके । तू ये रे बा विठ्ठला ।।
सत्त्वाचे आधण ठेविले । पुण्य वैरिले ।
पाप ते उतूं गेले । तू ये रे बा विठ्ठला ।।'

हा विठ्ठलच तिचे एकमेव 'शरण्य' आहे; म्हणूनच ती त्याला विचारते -

''गंगा गेली सिंधुपाशी । तेणे अव्हेरिले तिशी ।
तरी ते सांगावे कवणाला । ऐसे बोले बा विठ्ठला ।।''
सहकुटुंब सहपरिवार । दास आम्ही हे घरदार ।।

अशा प्रकारे नामदेवासह सर्व घरदार विठ्ठलाशी रात्रंदिवस सुसंवाद साधते.

या नामदेव आणि परिवाराचा जीव की प्राण 'महाविष्णूचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ।' ज्ञानेश्वरी जो वाचतो त्याला हे अवघे कुटुंब 'पायीं डोई ठेवून' नमस्कार करते.

'ज्ञानदेव म्हणे सुखी केले देवा ।
पादपद्मी ठेवा निरंतर ।।'

अशी विनवणी करून माऊली 'दृश्याची ताटी' लावून अदृश्य झाली मात्र अन् हे संतमंडळ माऊलीच्या शोधासाठी रानभरी झाले. हे रानोमाळ झालेले सारे भाव वेचणारे नामदेव काकुळतीला आले. व्याकुळ झाले. कळवळून गेले पण -

माऊलीला असे रडत बसलेले आवडणार नाही म्हणून देवाला जे आवडते तेच आपल्याला आवडावे. 'देवास जयाची अत्यंत प्रीती आपण वर्तावे तेणे रीती ।।' ही संत आज्ञा प्रमाण मानल्याप्रमाणे श्रीनामदेव पुढे ५० वर्षे धर्मध्वजा खांद्यावर घेऊन नाम-प्रसार-प्रचारार्थ अखंड परिभ्रमण करीत राहिले. नामभक्तीवर नामदेवाइतके विलक्षण प्रेम कोणी केले नाही. नाम-प्रेमाच्या प्रसार-प्रचारार्थ इतके अतोनात कष्टही कोणी उपसले नाहीत. 'नामदेवाची भजने' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत पू. विनोबाजी भावे म्हणतात -

'मी घुमान ला नामदेवाची समाधी आहे तिथे गेलो होतो. सिकंदर बादशहा जिंकून परतला तिथे मी बोललो की 'सिकंदर पंजाबाला जिंकू शकला नाही. पण नामदेव जिंकू शकला प्रेमाने - प्रेमाने जग जिंकणारा नामदेवच.''

पंजाबातून आलेले शीख बांधव पवनार आश्रमात भजन सेवा करून 'नामदेवांचे जन्मस्थान महाराष्ट्रात आहे तिथे जाणार' असे आजही आदराने सांगतात. नामदेवाच्या जन्मस्थानी तीर्थक्षेत्र म्हणून दर्शन घेतात. सातशे वर्षांपूर्वीचे राजे-महाराजे आज इतिहासजमा झाले; परंतु सातशे वर्षांनंतरही संतश्रेष्ठ नामदेवमहाराजांचे पारमार्थिक अधिराज्य 'नित्य नवा दिस जागृतीचा ' असे नित्य नवीन आनंदाने गाजते आहे.

आज प्रवासाची सुख-सोयीची साधने आहेत. नामदेवांनी त्या काळात हा प्रवास केला; नुसता प्रवास केला नव्हे नामप्रेमाने पंजाब जिंकला. ज्ञानदेव-नामदेव दोघेही त्या काळात बाराशे मैलाची नामप्रचार यात्रा पायी-पायी करत गेले. तियेच पुढे संत नामदेवांनी संतत्त्वाचा प्रचार केला.

नामदेवांनी सतत वीस वर्षे पंजाबातच वास्तव्य केले. त्यांचीच

भाषा आत्मसात केली. 'सिख्ख संगत'चा श्रीगणेशा केला. इस्लामची लाट त्यांनी थोपविली. त्यामुळेच पुढे 'नानकां'नी तेच काम केले. कबिरांनी तेच ऐक्याचे कार्य पुढे नेले आणि महत्त्वाचे काम संत तुलसीदासांनी केले व या चार संत शक्तींनी इस्लामी आक्रमण परतविले, छत्रपतींच्या 'जय भवानी'ला विजयी केले.

### 'ज्ञानदीप लावू जगीं'

''बोलू ऐसे बोला । जेणे बोले विठ्ठल डोले ।
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ।
नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगीं ।
परेहून परतें घर । तेथे राहू निरंतर ।
सर्व सत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ।।''

श्रीविठ्ठलाला ती डोलायला लावते. तीच ही कीर्तन भक्ति. नवविधा भक्तिमार्गातील दुसरी भक्ती. या कीर्तनभक्तीने गेली हजारो वर्षे समाजप्रबोधन केले आहे. आख्यानक काव्ये ही कीर्तनकारांची कामधेनू ठरली.

'कीर्तनाचे नि नटनाचे' म्हणून श्रीमाऊली कीर्तनाचे कौतुक करते तर समर्थ 'सकळ तीर्थे आणि जगदात्मा कीर्तनी वसे' म्हणून या कीर्तनाचे गुणसंकीर्तन करतात. नामदेव महाराज तर या संकीर्तनाचे धर्मसंकीर्तन गाता-गाता नाचू लागतात. नाचत-नाचत गाऊ लागतात अन् हे सारे कशासाठी तर -

'ज्ञानदीप लावू जगीं' हे उभे विश्व ज्यांचे घर त्या संतांच्या विश्वविजयी नामभक्तीनेच हे ज्ञानदीप उजळले. जेणे करून मनातील अन् जगातील अंधार दूर होईल. हा ज्ञानदीप, म्हणजेच 'अंतरीचा आत्मज्ञानदीप' ही अंतरीची आत्मानात्म-विवेक ज्योती उजळली की माऊली म्हणते, 'दीपकलिका धाकुटी म्हणों नये' इवलीशी ज्ञानज्योत, ती जन्मजन्मांतरीचा जन्म-मरण चक्राचा अंधार उजळून टाकते. ज्ञानदीपाने विश्व उज्ज्वल धवल करणारे नामदेव हाती 'नाम-प्रेम दीपिका' घेऊन निघाले. 'विठोबाचे राज्य । आम्हा नित्य दिपवाळी' अशी नामदेवाची दिवाळी 'नित्य नवा दिवस आनंदाचा' घेऊन साजरी होत असे. त्यांचा विठ्ठल म्हणजे -

'ज्ञानदेव म्हणे हे । ज्योतीची निजज्योती ।
ते हे मूर्ती उभी विटेवरी ।।'

ती अखंड २८ युगे विटेवरी उभी असणारी भक्तिज्योत, तोच संतांचा 'सर्व सुखाचे आगरु ।' असलेला विठ्ठल. देव न मानणारे अनेक जीव त्यांना नामदेवाचा प्रश्न आहे; तुम्ही देव मानत नाही पण 'सुखासाठी' रात्रंदिवस तळमळता ना ? तुम्ही ज्याला 'सुख' मानता त्याला आम्ही 'विठ्ठल' म्हणतो नव्हे ती आमची अनुभूती आहे. माऊली श्रोत्यांना एकच विनंती करते 'एकले अवधान देईजे । मग सर्व सुखासी प्राप्त होईजे ।' तुम्ही एकाग्रचित्ताने 'अवधान' द्या, त्याचेच अनुसंधान ठेवा तो 'सर्व सुखाचे सुख' तुम्हाला प्राप्त होईल.

नामदेव सुखासाठी तडफडणाऱ्या जीवाला रामबाण उपाय सांगतो-

''सुखासाठी करिसी तळमळ ।
तरी तू पंढरीसी जाय एक वेळ ।
मग तू अवघाचि सुखरूप होसी ।
जन्मोजन्मींचे दुःख विसरसी ।।''

जन्मजन्मांतरीचे दुःख, शोक, संताप हरण करणारी अमृत संजीवनी म्हणजे विठ्ठल-मंत्राची ठसठशीत नाममुद्रा.

या नामाच्या मागे उभे असते नामदेवाचे अनुसंधान. श्रीआचार्य सांगतात - 'मोक्ष' साधन सामग्र्या । भक्ति रेव गरीमसी ' मुक्तीच्या साधनात भक्तीच सर्वश्रेष्ठ आहे. पण भक्ति म्हणजे -

''स्व-स्वरूपानुसंधानं । भक्तिः इति अभिधीयते ।'' स्व-स्वरूपानुसंधान म्हणजेच भक्ति. संत नामदेव महाराज हे अनुसंधान सांगताना दैनंदिन जीवनातील व्यावहारिक दृष्टांत देऊन हा विषय अधिक स्पष्ट करतात.

'प्रभाती चारियासी जाये पक्षिनी ।' तिच्या मनात तिचे ते उपाशी पिलूच पिंगा घालत असते. इतकेच नव्हे तर 'दुंडीवरी दुडी चाले मोकळी गुजरी ।' ती गुर्जर स्त्री पाण्याच्या दुष्काळी प्रांतात राहते; पाण्याला दूरवर जाते. सखी शेजारणी मैत्रिणींबरोबर गुजगोष्टी करीत, दोन्ही हात मोकळे ठेवून चालते खरी; पण तिचे चित्त मात्र त्या दुडीकडेच असते. तसे नामदेवाचे मन नामातच गुंतून पडते. ते 'मन' आपला मनपणा सोडत नाही. नामदेव तक्रार करतात ती थेट विठ्ठलाकडे -

### अमृताहुनी गोड नाम...

देवा, अमृताहून गोड तुझे नाम पण माझे मन ते का बरे घेत नाही ? तूच या मनाला काहीतरी उपायाने नाम मार्गाला लाव. एरवी हे मन -

'कीर्तनी बैसता । निद्रे जागविले ।
मन माझे गुंतले । विषयसुखा ।।'

अज्ञानाच्या झोपेत मला हे विश्व स्वप्न पडते. त्यातील पंचविषय माझी सर्व बाजूंनी ससेहोलपट करतात. तरी मला ते संसार-सुखच हवेहवेसे वाटते अन् तुझे गोड नाम घ्यायला मन कंटाळते. या संसाराची अग्निबाधा एका 'नाम' स्मरणाने नाहीशी होते. ती कशी ? -

नामदेव महाराज सांगतात -

'अग्नी जाळी तरी न जळती पांडव ।
हृदयी माधव म्हणोनिया ।।'

हृदयी 'सीताकांत' म्हणून हनुमंत जळत नाही. अग्नी जाळी तरी प्रल्हाद जळत नाही. कारण गोविंद हृदयात आहे. अंतरंग नामभक्ति रंगात रंगून गेले की भवभयाची बाधा संपलीच म्हणून समजा. या विठ्ठलाचे सर्वच बरवे आहे.

### कानडा राजा पंढरीचा

खरोखर 'वेदांनाही कळला नाही । अंतपार याचा । असा हा 'कानडा' विठ्ठल पंढरपूरला मात्र अगदी सहज सुलभ आहे. त्याचे प्रेम-नाम-सारेच बरवे आहे. तोच भक्तदर्शनाला आतुर असतो कारण -

'नामा म्हणे तया संतांची आवडी ।
भेटावया कडाडी उभाचि असे ।।'

नुसता उभा नसतो तर आपल्या प्राणप्रिय भक्तासाठी तो दोन्ही बाहू पसरून कडकडून भेटी देतो.

त्याला भेटी देऊन, त्याचा निरोप 'नाम-चिंतामणी' होऊन स्वतः नामदेव महाराज विश्वात्मक देवापर्यंत पोचवितात. विश्वाचा कानाकोपरा नामभक्तीने उजळून देतात.

### येसी आपोआप गिवसीत

असा त्यांचा दृढ विश्वास आहे. म्हणूनच ते आपला वेगळेपणा नोंदवितात -

'न लगे तुझी मुक्ति । न लगे तुझी भक्ति ।
मज आहे विश्रांती । वेगळी चि ॥
न करी तुझे ध्यान । न लगे ब्रह्मज्ञान ।
माझी आहे खूण । वेगळी चि ॥
न करी काया - क्लेश इंद्रियां निरोध -
माझा आहे बोध । वेगळाचि ॥
नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प ।
येसी गिवसीत । आपोआप ॥'

देवा ! तुझी मुक्ति, भक्ति, ध्यान, ज्ञान, काया-क्लेश, इंद्रिय विरोध इ. शेकडो साधने ज्यावरून ओवाळून टाकले असे तत्त्व म्हणजे तुझे 'नाम'. हे तत्त्वदर्शी कोण तर -

*'नामा म्हणे नाम केशव केवळ ।*
*जाणती प्रेमळ भक्त भले ॥'*

याच प्रेमळ भक्ताने देवाला सांगितले, देवा ! तुझी नामस्मरण भक्तीच माझे सर्वस्व होय. कारण

'मन मेरी गज जिभ्या मेरी काती ।
रामरमे काटी जम की फासी ॥
अनंत नाम का सीऊ बागा ।
जा सीजत जम का डर भागा ।'

मनाचा गज जिभेची कात्री, आम्ही शिंपी रामनामात रमून जन्म-मरण चक्र थांबवू. रामाच्या अनंत नामांचा अंगरखा शिवू. तो शिवता शिवता -

'राती माजी शिवी । दिसामाजी शिवी ।
वृत्ती सदाशिवीं असो द्यावी ॥'

अशा जगावेगळ्या रात्रंदिवसाच्या शिवल्याने जन्म-मरण-भय केव्हाच पळून जाते.

### धावत दुडदुडा येई आता

विठ्ठल भेटीसाठी नामदेव इतके अधिर होऊन जायचे की ते देवाला घाईघाईने हाका मारीत सुटावयाचे -

'जयवंत असो लक्ष्मीचा चुडा ।
धावत दुडदुडा येई आता ॥'

देवा ! बैसावयालागी घोडा घेऊ नकोस, अडखळून पडशील म्हणून पायात जोडा घालू नकोस, भोजन झाल्याबरोबर इथे विडा घ्यावयास ये कारण,

'तुला बाहतसे । नामदेव वेडा ।
धावत दुडदुडा । येई आता ॥'

नामदेवापेक्षाही देवाला त्याला भेटण्याची उत्कटता जास्त; त्यामुळेच तो दुडदुडा धावत येणार, वेड्या नामदेवाला कडकडून भेटणार.

### अल्याड पल्याड पताकांचे भार ।

मधून वाहणारी मनोहर इंद्रायणी, त्यात; 'आदि - समाधि - तीर्थावळी' चे अभंग श्रीमाऊलीचे चरित्र लिहून मनामनातली आळंदी हेलावून सोडणारे संत नामदेवांचे अंतरंग साक्षात प्रतिबिंबित होते. त्यातही निवृत्तीनाथांचे दर्शन म्हणजे -

'नामा म्हणे देवा पेटला हुताशन ।
करा समाधान निवृत्तीचे ॥'

मायबापांनी बाळपणीच या मुलांचा त्याग केला पण त्या वेळी असे संकट झाले नाही इतकी ही भावंडे 'माऊली' विना पोरकी झाली.

त्या संजीवन-समाधी सोहळ्याच्या साक्षीने नामदेव देवाला म्हणाले-

'देह जावो अथवा राहो ।
पांडुरंगी दृढ भावो ॥
चरण न सोडी सर्वथा ।
तुझी आण पंढरीनाथा ॥
नामा म्हणे केशवराजा ।
केला पण चालवी माझा ॥'

हा नामदेवाचा पण देवाने चालविला म्हणूनच नामदेव अखंड नामस्मरण - भक्तीचा प्रसार-प्रचार करीत उभ्या देशभर फिरले. नामदेवाचे प्रेमसूत्र इतके गोड होते की 'संत नामदेवजी की मुखबानी' गुरुबानी झाली.

'प्रेम प्रेम बळावे । द्वेषाने अधिक वाढतो द्वेष ।
प्रेमें उदया येती । द्वेषाने ओस पाडिले देश ।'

देश उजाड, ओसाड करणारा द्वेष नामदेवाच्या स्वप्नातही नव्हता. ते तर 'खंडोबा ! कोरड्या पोळ्या खाऊ नकोस रे ! पोट दुखेल.' असे खंडोबाला म्हणत त्याच्या मागे मागे गेले. संतांचे 'आत्मौपम्य' ते हेच. इतके शुद्ध चित्त असेल तरच तुकोबांची अनुभूती सांगते -

''चित्त शुद्ध तरी । शत्रु मित्र होती ।
व्याघ्रही न खाती । सर्प तया ॥''

याच प्रेमभक्तीने, ज्ञानयोगी ज्ञानेश्वराने भिंतीला विनंती केली, 'बाई ! चांगदेवाला सामोरे जाऊ या, चला !' अणु-रेणूतही चैतन्य-स्पंदने एकाच वैष्णवी सत्तेत स्पंदित झाली. तो माऊलीचा 'प्रेमा' नामदेवाने बाळघुटीसारखा पिऊन घेतला अन् त्याचाच अमृत वर्षाव करीत जगभर ब्रह्मभाव जागृत केला.

सत्वगुणांचे; संतांचे कौतुक माऊलीप्रमाणे नामदेवालाही फार आहे. श्रीज्ञानदेवांनी वाग्यज्ञानंतर पसायदान मागितले. नामदेवानेही असेच एक 'पसायदान' श्रीचरणी निवेदित केले.

'आकल्प आयुष्य व्हावे तयां कुळां ।
माझिया सकळां हरीच्या दासां ।
कल्पनेची बाधा न हो कदाकाळी ।
हे संत मंडळी सुखी असो ॥

अहंकाराचा वारा न लागो राजसा ।
माझ्या विष्णुदासा भाविकांसी ।
'नामा' म्हणे तया असावे कल्याण ।
ज्या मुखी निधान पांडुरंग ॥ "

ज्यांच्या मुखी-मानसी 'पांडुरंग' आहे ते संत नामदेव महाराज हेच 'चालते-बोलते' पसायदान आहेत.

"चला कल्पतरुंचे आरव ।
चेतना चिंतामणींचे गाव ।"

चंद्र-सूर्य पृथ्वीचे जीवन खरेच; पण ते पृथ्वीपासून फार दूर आहेत. श्रीमाऊलीचे संत-सज्जन घरोघरी गावोगावी नाम-सूर्य होऊन जातात. नाम-चिंतामणीच्या प्रकाशात न्हाऊन निघालेल्या जीवाचे 'शिव भाव' जागृत होऊन जीवनाचे सोने होते. उभ्या जगाला नाम-ब्रह्माकार देणाऱ्या नाद-ब्रह्मात तल्लीन असलेल्या नाम-चिंतामणीला देवाने - खरे पाहता 'तयाते मी माथा मुकुट करी । '

म्हणून मस्तकी धारण करावे पण नाही; 'नामदेव' देवाचिये द्वारीच पायरीवर विसावला. हा चिंतामणी नामाने सर्व जीवांच्या आधी व्याधी उपाधींचा निरास करून जीवनाचे जीवाचे जन्मजन्मांतरीचे कल्याण करतो. त्या 'कल्याणी'स दंडवत असो.

प्रा. डॉ. सौ. नीला जोशीराव
२९० प्रसाद, रामनगर, नागपूर, १०.

# ।। नामदेवांचा विठ्ठल ।।

**सौ. सुनीता तांबे**

एम फिल (मराठी)

'रत्नाकर मतकरींच्या एकांकिका' हा विषय. एस.एन.डी.टी. मुंबईमधून मराठी पत्रकारिता हा लघुकोर्स पूर्ण. एस.एन.डी.टी. मुंबई येथे १९८७ मध्ये ३ महिने अभ्यागत व्याख्याता. सध्या कला व वाणिज्य महाविद्यालय दापोडी व केसरी संघवी कॉलेज पिंपरी येथे अभ्यागत व्याख्याता. २०/२२ लेख व लघुकथा प्रकाशित. काही कथा बक्षीसपात्र. एकनाथ पंचक या विषयावर पी.एचडीसाठी संशोधन सुरू.

'तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल । देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल ।। १ ।।
माता विठ्ठल पिता विठ्ठल । बंधू विठ्ठल गोत्र विठ्ठल ।। २ ।।
गुरु विठ्ठल गुरुदेवता विठ्ठल । निधान विठ्ठल निरंतर विठ्ठल ।। ३ ।।
नामा म्हणे मज विठ्ठल सापडला । म्हणोनि कळिकाळा पाड नाही ।। ४ ।।' (६३३)

पंडित भीमसेन जोशी यांनी गायिलेला नामदेवांचा हा अभंग गेली कित्येक वर्षे मनात घर करून आहे. 'नामदेवाचा विठ्ठल' या विषयी लिहायला बसताच संत नामदेव, त्यांना आकर्षून घेणारे पंढरपूर क्षेत्र, तेथील चंद्रभागा, तिच्या तीरावरील पुंडलिकाचे देऊळ आणि विठ्ठल मंदिरातील गाभाऱ्यात आपल्या भक्तांची वाट पाहात युगानुयुगे उभा असलेला त्यांचा निळा-सावळा-विश्वात्मक विठ्ठल. सारे कसे लख्खकन् नजरेसमोर आले.

**।। पंढरपूर क्षेत्र ।।**

सर्व संतांना प्रिय असणारे 'पंढरपूर' हे क्षेत्र भीवरा नदीतीरावर वसले असून त्या ठिकाणी ही नदी अर्धवर्तुळाकार वाहते म्हणून तिला चंद्रभागा असेही म्हणतात. पंढरपूर क्षेत्राचे माहात्म्य सांगणारा 'पंढरीमाहात्म्य' हा संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध आहे. शंकराचार्यांच्या 'पांडुरंगाष्टकात' या क्षेत्रास 'महायोगपीठ' म्हणून संबोधले आहे. हेमाद्रिपंताच्या 'चतुर्वर्गचिंतामणी' मधील तीर्थखंडात पंढरपूरचा उल्लेख असून त्यात पंढरपुरास 'पौंडरिक' आणि विठ्ठलास 'पांडुरंग' असेच म्हटले आहे. पांडुरंग हे शुभ्रवर्णीय रूद्र शिवाचे नाव आहे. याचेच कानडीत पंडरगे असे रूप होते. त्यावरून पंडरंग, पंडरी किंवा पंढरी, व त्यास 'पूर' हा नगरवाचक प्रत्यय लागून पंढरपूर शब्द बनला. प्राचीन काळी हे शैव क्षेत्र होते. हे नाथपंथाचेही पीठ आहे. ज्ञानदेव म्हणतात-

'हे नव्हे आजिकालीचे । युगा अठ्ठाविसाचे ।।
बाप तीर्थ पंढरी । भूवैकुंठ महीवरी ।।
भक्त पुंडलिकाचे द्वारी । कर कटावरी राहिला ।।
आड वाहे भीमा । तारावया देहआत्मा ।।
पैलथडिये परमात्मा । मध्य राहिला पुंडलिकु ।।' (२०२१)

**।। भक्त पुंडलिक ।।**

पंढरपूर क्षेत्र व भक्त पुंडलिक यांतील अद्वैताची संतांना जाणीव होती. पुंडलिकाच्या मातृपितृभक्तिने प्रसन्न होऊन विठ्ठल / श्रीविष्णू येथे आलेला आहे; आणि त्याने फेकलेल्या विटेवर युगानुयुगे उभा आहे. भक्तराज पुंडलिक हाच नामदेवांचाही आदर्श आहे. ते म्हणतात-

'पुंडलिके बरवे केले । कैसे भक्तिने गोविले ।।
नामा म्हणे नीट पायी । जडलीसे वीट ।।' (२०२४)

पुंडलिक हा खरे पाहता शैव योगी होता. परंतु तो शैव आणि वैष्णवात भेद करीत नसे. शंकराइतकाच तो विष्णूचाही भक्त होता. भेदाभेदातीत असणाऱ्या एका परमतत्त्वाचे त्याला ज्ञान होते. त्यामुळेच श्रीविष्णू त्याची परीक्षा पाहावयास आले, त्या वेळी मातापिता रूपातील परमेश्वराचीच सेवा करण्यात तो मग्न होता. त्याच्या या कृतीने-कर्तव्यकर्मरत असणाऱ्या भक्तीने पुंडलिकावर देव प्रसन्न झाले आणि त्याला वर माग म्हणाले. भक्त पुंडलीक म्हणाला -

'क्षण एक मौन धरूनिया राहा । शरणागत पाहा कृपादृष्टी ।।१।।
करोनि निर्धार आलेती जेणे भावे । जतन करावे वचन देवा ।। २ ।।
नच जावे देवा माझ्या गावाहून । मागतो प्रार्थुनी हेचि तुम्हा ।। ३।।' (तुका. गाथा. ३८९/१५२)

सर्व जीवांचा उद्धार करण्यासाठी देवाने अनंतकाल चंद्रभागेतीरी उभे राहावे अशी पुंडलिकाने विठ्ठलास आण घातली आणि विठ्ठलानेही त्यास तसे वचन दिले. निवृत्तीनाथ म्हणतात -

'पुंडलिकाचे भाग्य वर्णावया अमरी । नाही चराचरी ऐसा कोणी ।। १ ।।
विष्णुसहित शिव आणिला पंढरी । केले भीमातीरी पेरवणे जेणे ।। २ ।।
ब्रह्मादिका अंत न कळे ज्या रूपाचा । एवढी कीर्ती वाचा बोलो काय ।।३।।
निवृत्ती सांगे मातु विठ्ठल उच्चार । वैकुंठे उतरे एक्या नामे ।। ४ ।।' (२०२५)

**।। विठ्ठलाचे स्वरूप ।।**

विठ्ठल / विठोबा या शब्दाची व्युत्पत्ती वि म्हणजे विद् अर्थात जाणणे - ज्ञान होणे आणि ठोबा म्हणजे मूर्ती ! त्याचप्रमाणे 'विठ्ठल' हा शब्द विष्णू शब्दाच्या विठ्ठी किंवा विट्ट या अपभ्रंशावरून साधणारी व्युत्पत्ती आहे. योगी तसेच भगवद्‌भक्त या दोघांच्याही दृष्टीने विठ्ठल अथवा पांडुरंग ही हरिहरैक्याच्या एकतेची मूर्ती आहे. नामदेवांच्याही दृष्टीने -

'द्वादशलिंगाचे जे का आत्मलिंग । ते हे पांडुरंग विटेवरी ।।
अनंत सूर्याची ज्योतिची निजज्योती । तीही उभी मूर्ती विटेवरी ।।' (७९०)

ज्योतिर्मय-ज्योतिर्लिंग विश्वनाथ आणि विठ्ठल हे दोघेही नामदेवांच्या दृष्टीने एकच होते. भागवतधर्म हा तेजाचा, प्रकाशाचा उपासक आहे. भगवान् सविता सूर्यनारायणाचे विश्वव्यापक विष्णूच्या रूपाने प्रकटलेले जे तेज त्याची भक्ती करणारा आहे. 'तमसो मा ज्योतिर्गमय' ही प्रार्थना त्याचीच द्योतक आहे. नामदेवांना विठ्ठल हा, ज्या 'ज्योतीची निजज्योति' होती त्या, स्थिर चराला व्यापून असणाऱ्या परमात्म ज्योतीचा विष्णुस्वरूपात साक्षात्कार झालेला होता. त्यांच्या पारमार्थी जीवनाचा तो परमोत्कर्ष होता.

## ॥ निर्गुण निराकार विठ्ठल ॥

नामदेवांचा विठ्ठल निर्गुण-निराकार असा आहे. ते म्हणतात -

'निर्गुणीचे वैभव आले भक्तिमिषे । ते हे विठ्ठलवेषे ठसाविले ।। १ ।।
बरविया बरवे पाहता नित्य नवे । हृदयी ध्याता निवे त्रिविधताप ।। २ ।।
चोविसावेगळे सहस्त्रा आगळे । निर्गुणा निराळे शुद्धबुद्ध ।। ३ ।।
वेदा मौन पडे श्रुतिसी कानडे । वर्णिता कुवाडे पुराणासी ।। ४ ।।
भावाचे आळुके भुलले भक्तिसुखे । दिधले पुंडलिके साधुनिया ।। ५ ।।
नामा म्हणे आम्हा अनाथा लागुनी । निडारले नयनी वाट पाहे ।। ६ ।।'
(१८६६)

आपल्या भक्तांच्या अनन्य भावाने संतोषून तो निर्गुण-निराकार परमात्मा विठ्ठलाच्या वेषात येथे येऊन उभा राहिलेला आहे. वेदांनाही ज्याचे वर्णन करता येत नाही, श्रुतीही ज्याच्याविषयी मौन बाळगून आहेत, असे ते 'परब्रह्म' आपल्या भक्तांच्या वाटेकडे डोळे लावून आहे. साहजिकच हा विठ्ठल सर्वच भक्तांना अतिशय प्रिय आहे. नामदेवांचे तर तो सर्वस्व आहे. नामदेवांचे गुरु विसोबा खेचर यांनी नामदेवांना निर्गुणानुभूती देऊन निर्गुण परब्रह्म हेच विश्वरूपाने सगुण साकार झाले आहे असे 'अन्वयात्मक' ज्ञान दिले होते. जिथे कुठे देव नसेल तिथे माझे पाय ठेव असे सद्गुरुंनी त्यांना सांगितले, तेव्हा 'नामा पाहे अवघा जिकडे तिकडे देव । कोठे रिता ठाव न दिसेचि ।।' एकच एक ईश्वराच्या सगुण स्वरूपाचा हा अन्वयात्मक विचार नामदेवांनीही एका अभंगात सांगितला आहे.

'निर्गुण सगुण नाही ज्या आकार । होऊनि साकार तोचि ठेला ।।
सुवर्णी की धन, धन ते सुवर्ण । निर्गुण सगुण ययापरी ।।
पांडुरंगी अंगे सर्व झाले जग । निववी सर्वांग नामा म्हणे ।।' (३३०)

नामदेवांनी सांगितले जो परमात्मा निर्गुण-सगुण या सापेक्ष द्वंद्वापलीकडे असून ज्याला आकार नाही तोच जगद्रूपाने सगुण-साकार झाला आहे. सोने व त्याचे नाणे ही जशी अभिन्न असतात त्याचप्रमाणे निर्गुण व सगुण हे अभिन्नच आहेत. विश्व म्हणजेच विठ्ठल-पांडुरंग आणि पांडुरंग म्हणजेच विश्व !

विसोबा खेचर हे शैवयोगी-नाथपंथी होते. त्यांनी नामदेवांना अनुग्रहित केले होते. देवावाचून रिते असे एकही स्थान नाही. तोच विश्वव्यापक ईश्वर तुझ्या हृदयात आहे अशी त्या विश्वात्मक देवाची त्यांनी नामदेवांना प्रचीती आणून दिली होती. विश्वी विश्वंभर कोंदला असल्याचे ज्ञान त्यांना दिले होते.

## ॥ निळा-सावळा विठ्ठल ॥

योगी तसेच भक्तिमार्गी संतांना परब्रह्माची प्रचीती काळ्या वर्णात होते. व्योमाकार असा तो शून्य अवकाश; वस्तुतः; त्याला वर्ण नाही. तरीही तो काळा भासतो. त्यात सूर्याचा स्वच्छ प्रकाश पडताच तो काळा वर्ण निळसर दिसतो. ध्यानावस्थेत योगीजनांना व भक्तांनाही प्रतीत होणारे परब्रह्माचे कृष्णनील बिंदुरूप तोच बाळकृष्ण ! त्यालाच योगी व भक्तही सावळे परब्रह्म म्हणतात आणि कोणत्याही काळ्या पाषाणाची मूर्ती-विष्णूमूर्ती ही त्या नीलकृष्णवर्णाने प्रतीत होणाऱ्या परब्रह्माचे प्रतीक मानतात. नामदेवांचा हा विठ्ठलही परब्रह्म प्रतीक आहे. ध्यानावस्थेत मस्तकातील सहस्त्रदल कमलात आकाशाच्या नील वर्णाप्रमाणे असणाऱ्या रूपात ते परब्रह्म आपली अनुपम शोभा दर्शविते. नामदेवांच्या मते तेच कमरेवर हात ठेवून विटेवर उभे आहे. या निळ्या विष्णूच्या नाभिस्थानी जन्मलेल्या ब्रह्मदेवापासूनच या सृष्टीची निर्मिती झालेली असल्याने तो हा 'विश्वी विश्वंभर' असणारा असा विठ्ठलच विटेवर उभा आहे. ज्ञानदेव आणि नामदेव या दोघांनाही झालेला सगुण साक्षात्कार हा प्रकाशाचा होता. ज्ञानदेवांनी 'कोटिचंद्र प्रकाशाचा' व नामदेवांनी 'कोटिसूर्यप्रभेचा' उल्लेख केलेला आहे. ऋग्वेदातील 'स भूमि विश्वतोवृत्वा अत्यतिष्ठत् दशांगुलम्' ही ऋचा मराठीत आणून नामदेवांनी त्या निळ्या-सावळ्या विठ्ठलाचे रहस्य उलगडून दाखविले. वैदिक भागवतधर्म तळागाळापर्यंत पोहोचविला. निवृत्ती-ज्ञानदेवादी भावंडे, विसोबा, चांगा आणि नामदेव या सर्वांनाच परब्रह्मरूपाची ध्यानावस्थेत वर्णरूपाने जी अनुभूती आलेली होती तिचेच श्रीकृष्ण वा विठ्ठल हे बाह्याविष्करण होते. विठ्ठलाच्या या निळ्या-सावळ्या रूपाने नामदेवही वेडावून गेले होते. त्या रूपाचे त्यांनी वर्णन केले आहे -

'काळा गे दादुला पाहता आकळु । तो झाला गोवळु नंदाचा ।। १ ।।
काळा गे दादुला काळा गे दादुला । पंढरी पहा चला विठ्ठलु गे ।। २ ।।
काळा म्हणुनी पाहो गेलो जवळा । सुनीळु सावळा दिसतसे ।। ३ ।।
नामा म्हणे सर्व भक्षितो तो काळु । भक्तांचा कृपाळु श्रीविठ्ठलु ।। ४ ।।' (३४८)

नामदेवांचा विठ्ठल हा काळ्या पाषाणाची केवळ एक मूर्ती नाही. गुरुकृपेने त्याच्या मूळ निर्गुण स्वरूपाची अनुभूती त्यांनी घेतली आहे. 'सहस्त्रदळी आकाशाच्या परी । राहोनी शरीरी शोभा दावी ।' असे ते सांगून जातात. त्यांचा विठ्ठल सगुण-निर्गुण, स्थुल-सूक्ष्म, साकार-निराकार, दृश्य-अदृश्य या साऱ्या द्वंद्वाच्या पलीकडला असा आहे.' 'येकला येकटाच' असा पांडुरंग आहे. त्याच्या ठायी नामदेवांनी दया, क्षमा, शांती व प्रेमही अनुभविले. त्या सावळ्या परब्रह्मरूपात्मक, निराकाराचे प्रतिक असलेल्या विठ्ठलाचे स्मरण ते सर्वांना पुनः पुन्हा करून देतात. विठ्ठलाच्या व्यापक स्वरूपाची नामदेवांना असलेली जाण भव्य-दिव्य आहे. एका अभंगात त्यांनी त्या जाणिवेचा प्रत्यय आणून दिलेला आहे.

'कोटि कोटि ब्रह्माण्डे एक एक रोमी । व्यापुनिया व्योमी वर्ततसे ।।
तो हा माझा विठोबा सर्वांघटी सम । न सोडावे वर्म नामा म्हणे ।।' (३७५)

भूतमात्रांच्या एकेका रोमातून असलेली कोटी कोटी ब्रह्मांडे व्यापूनही जो दशांगुळे उरलेला आहे तोच हा विठ्ठल सर्वांघटी सामावलेला आहे.

सर्वत्रात अशी समदृष्टी नामदेवांचा विठ्ठल दर्शवितो. त्यादृष्टीने पाहता नामदेव हे विश्वबंधुत्वाचे प्रणेते ठरतात. विठ्ठलाच्या स्वरूपाद्वारे ते विश्वैक्याचा संदेश देतात. 'एकं सत्' या वैदिक एकत्वाच्या परंपरेची जाण ते सर्वसामान्यांपर्यंत नेऊन पोहोचवितात.

## ॥ अनाथांचा नाथ ॥

सद्‌गुरुंनी नामदेवांना 'ज्ञानीभक्ताच्या' पायरीवर आणून सोडले. परंतु येथवरची प्रगती साधण्यासाठी त्यांना अत्यंत कठोर परिश्रम, अनंत यातना, घरादाराचा विरोध सहन करावा लागलेला आहे. तरीही ते आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी अशा भक्तांच्या चारही पायऱ्या अतिशय निष्ठेने, श्रद्धेने आणि भक्तिभावपूर्वक पार करून आलेले आहेत. ज्ञानी भक्तांच्या अवस्थेत आत्मकृपा होऊन ते ज्ञानसंपन्न झालेले आहेत. वारकरी संप्रदायी असले तरी नाथपंथाचाही वारसा त्यांनी जपला आहे. संत एकनाथांनी एका अभंगात त्यांच्या जीवनचरित्र संदर्भात सांगितले आहे -

'द्वारकेहुनि विठु पंढरीये आला । नामयाचा पूर्वज दामाशेटी वहिला ॥ १ ॥
दामा आणि गोणाई नवसी विठूसी । पुत्र देई आम्हा देवा भक्तराशी ॥२ ॥
तोचि नामदेव जन्मे शिंपियाचे कुळी । भक्ताते पाहुनी वेधला वनमाळी॥३॥
एका जनार्दनी परंपरा कथियेली । धन्य धन्य विठू अनाथांची माऊली॥४॥'
(३५४४)

नामदेवांचा जन्म विठ्ठलाला केलेल्या नवससायासाने झालेला आहे. साहजिकच बालपणापासून नामदेवांची विठ्ठलावर नितांत श्रद्धा-भक्ती आहे. विठ्ठल हा नामदेवांचा बालमित्र आहे. सखा-सोबती आहे. कुल-गोत्र आहे. माता, पिता, बंधू एवढेच नव्हे तर गुरुही आहे. कार्तिकी यात्रेला प्रथमच पंढरपुरास आले असता गरुड पारावरूनच त्यांनी समोरच असलेली सगुणसाकार अशी विठ्ठलाची मूर्ती पाहिली आणि ते तटस्थ होऊन गेले. बाह्य जगाचे त्यांना भान उरले नाही. त्या स्थितीचे त्यांनी वर्णन केले आहे -

'मन पांगुळले स्वरूपी गुंतले । बोलणे खुंटले प्रीतीमौन्ये ॥
सबाह्य अंतरी स्वरूप कोंदले । द्वैत निरसले दृश्याकारे ॥'

त्यानंतरच्या दिवसात विठ्ठलप्राप्तीसाठी त्यांची तळमळ वाढली. साधकावस्थेतील त्यांनी रचलेले अभंग त्यांच्या विठ्ठलविषयक उत्कट प्रेमाची प्रचीती आणून देतात. 'पाहू द्या रे मज विठोबाचे मुख । लागलीसे भूक डोळा माझ्या ॥' असे आर्त त्यांच्या मनात उत्पन्न झाले. निराशेच्या अंधारात अगतिकतेने ठेचकाळणाऱ्या साधकाच्या आत्म्याची ती काळोखी रात्र नामदेवांच्या आयुष्यातही येऊन गेली. त्यांचे मन दारूण विफलतेने ग्रासले. नैराश्याने त्यांचे सर्व जीवन व्यापून टाकले. ते म्हणतात -

'अनाथांचा नाथ भक्तांचा कैवारी । पुराणी ही थोरी आयिकिली ॥ १ ॥
ऐकोनिया कीर्ती आलो तुजपाशी । निवारी दुःखासी केशिराजा ॥ २ ॥
त्रितापे तापलो दुःखे आहाळलो । कासाविस झालो दयासिंधू ॥ ३ ॥
तुजविण आता कोणाते मी सांगू । तोडी हा उद्वेगु नारायणु ॥ ४ ॥
नामा म्हणे आता नको पाहू अंत । उद्धरी त्वरित पांडुरंगा ॥ ५ ॥'
(७६०)

अनाथांचा नाथ, भक्तकैवारी अशी पुराणांमधून मी तुझी कीर्ती ऐकली म्हणून तुझ्याकडे आलो. तू माझे दुःख दूर करशील, माझ्यावर दया करशील असे वाटल्यानेच मी येथवर आलो. तुझ्याखेरीज मी दुसऱ्या कोणाला बरे माझे दुःख सांगणार ? तूच माझा त्राता-ध्याता असल्याने आता अंत न पाहता माझा उद्धार कर. हे पांडुरंगा त्याशिवाय माझी ही उद्वेगजन्य अवस्था कशी संपणार ? या प्रकारे विठ्ठलाला परोपरी नामदेव विनवीत असत. भक्तिभावाच्या उत्कटतेमुळे ते बऱ्याचदा उन्मनी अवस्थेत जात. त्या अवस्थेत त्यांना सर्वत्र विठ्ठलच दिसे. तो आपल्याला बोलावतो आहे, पोटाशी धरतो आहे, कुरवाळतो आहे, प्रेमाने बोलतो आहे आणि मस्तकी हात ठेवून अभय देतो आहे असा अनुभव ते घेत. ईश्वरभक्तीत तल्लीन झाल्याने त्यांचे अष्टसात्त्विक भाव जागृत होत. त्यांनी आपल्या या अनुभवांचे उत्कटतेने वर्णन केले आहे-

'स्फुंद स्फुंदत नामा उभा महाद्वारी । दृष्टी पायावरी विठोबाच्या ॥ १ ॥
देखोनि केशवे उभारिल्या बाहे । पालवितु आहे पितांबरे ॥ २ ॥
येई नाम्या तुज धरीन पोटाशी । कोणे गांजिलासे दुराचारे ॥' (१३५३)

अर्थातच नामदेवांच्या या अनन्या भक्तीने अखेर विठ्ठल द्रवला. त्याने नामदेवांना प्रेमाने उचलून घेतले. नामदेव पाहतात तर चर्तुभुज मूर्ती त्यांच्या अंतर्यामी तसेच दशदिशांतूनही प्रकटली आहे. सर्वत्र तोच विठ्ठलरूपात भरून राहिला आहे. या प्रकारचे अनेक अभंग, नामदेवांची साक्षात्कार पूर्वीची तयारी भक्तीद्वारे कसकशी होत गेली हे सांगून जातात. देव भावाचा भुकेला असल्याने त्याने नामदेवांच्या भक्तीने प्रसन्न होऊन त्याला स्वस्वरूपाचा साक्षात्कार घडविला. नामदेवांनी परतत्त्वस्पर्शाचा तो साक्षात्कारी अनुभवही मोठ्या हृद्यतेने वर्णिला आहे. 'कोटिसूर्य प्रभादीप्ती । गगनी झळकिली अवचिती ॥ संत नामया सांगाती । पैल आला कमलापती । वत्सालागी जैसी धेनु । तैसा धावे जगजीवनु ॥' (१८२३) विठ्ठलाने धावत येऊन नामदेवांना हृदयाशी धरले. या हृदयीचे त्या हृदयी घातले. नामदेवांना झालेला त्या क्षणाचा आनंद शब्दातीत आहे. त्यांचे संपूर्ण जीवन त्यानंतर विठ्ठलमय बनून गेले. जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणीच नव्हे तर अणुरेणुतही तोच भरून राहिला आहे. त्याच्याशिवाय विश्वातील कोणतीही गोष्ट नाही. त्यांचा विठ्ठल असा चराचरात भरूनही पंढरीतील विठ्ठल मंदिरात कटेवरी कर ठेवून उभा असलेला त्यांनी पाहिला आणि त्यानंतर नामदेवांनी मागे वळून पाहिलेच नाही. 'नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी ॥' अशा भावनेने प्रकाशाचा मार्ग त्यांनी सर्वसामान्यांनाही दर्शविला.

आपले सर्वस्व असलेल्या विठ्ठलात त्यांनी विश्व पाहिले. त्यामुळे त्यांची दृष्टीही विश्वात्मक बनली. सामाजिक एकतेचे व परस्पर प्रेमाचे असे समन्वयी तत्त्वज्ञान भक्तिमार्गाद्वारेच त्यांना गवसल्याने गीतेची साक्ष देत त्यांनी सांगितले आहे. 'उपदेश अर्जुना जनी जनार्दना । अखंड भावना भूतदया ॥ नामा म्हणे सर्व आहे हाचि देव । उदार माधव सर्वांभूती ॥' (६८८) नामदेवांची भक्ती अशी समाजसन्मुख आहे. समाजात वावरताना ती सर्वांभूती समभाव, भूतमात्रांवर प्रेम, दया, क्षमा, शांतीचा सतत उपदेश

करते. या दृष्टीने पाहता नामदेवांचा अध्यात्मवाद पुरोगामी होता आणि त्यांची शिकवण व्यावहारिक कर्तव्यनिष्ठेला आणि सामाजिक नीतीमत्तेला पोषकच होती असे म्हणता येते.

**॥ विठाई माऊली ॥**

नामदेवांनी जीवनभर विठ्ठलाला 'माऊली' च्या रूपात पाहिले. तिच्या संगतीत त्यांनी आपले जीवन वेचले. विठ्ठलावर असलेले त्यांचे प्रेम उत्कट, निर्मळ तसेच निरपेक्ष असे होते. माता-पुत्र प्रेमासारखे पवित्र होते. त्यांच्या अभंगातून विठ्ठलाविषयीची ही मातृभावना अनेकदा व्यक्त झालेली आहे. विठाई माऊलीविषयीची त्यांची आर्तता, प्रेम, जिव्हाळा-लळा त्यातून वारंवार प्रत्ययास येतो. तिच्या केवळ स्मरणानेही ती नामदेवांना प्रेमपान्हा घालते. तिची ते आतुरतेने वाट पाहतात -

'डोळुले शिणले पाहता वाटुली । अवस्था दाटली हृदयामाजी ॥ १ ॥
तू माझी जननी सखिये सांगातिणी । विठ्ठले धावोनि देई क्षेम ॥ २ ॥
तू माझी पक्षिणी मी तुझे अंडज । क्षुधे पीडिलो मज विसरलीसी ॥३ ॥
तू माझी कुरंगी मी तुझे पाडस । गुंता भवपाश तोडी माझा ॥ ४ ॥
तू माझी माऊली मी तुझी साऊली । वोरसे वो घाली प्रेमपान्हा ॥ ५ ॥'
(११७१)

नामदेवांनी जीवनभर आपल्या विठाई माऊलीचे प्रेम, माया, ममता अनुभविली. हे वत्सल नाते त्यांनी सर्वत्र पाहिले. विठ्ठल भावाचा भुकेला आहे आणि नामदेव विठू माऊलीचे भुकेले आहेत. ते सांगतात-

'सुखाचे हे सुख श्रीहरी मुख । पाहता ही भूक तहान गेली ॥ १ ॥
भेटली भेटली विठाई माऊली । वासना निमाली जीवातील ॥ २ ॥
चंद्रासी चकोर मेघासी मयूर । वाटे तैसा भर आनंदाचा ॥ ३ ॥
नामा म्हणे पाप ताप आणि दुःख । गेले माझे सुख बोलवेना ॥'
(१९९३)

भक्त नामदेवांची विठ्ठलविषयक मातृभावना अखेर विश्वात्मकतेत परिणत झालेली आहे. विश्वात्मक परमेश्वराच्या भक्तीतूनच नीतीचा उगम होत असल्याने नामदेवांनी नामभक्तीच्या अनुषंगानेच सर्वांना उपदेश केलेला आहे. कारण ईश्वराचे नाम हे विश्वात्मक ईश्वराचे नाम आहे आणि 'जनी जनार्दन' आहे; म्हणूनच विश्वात्मक ईश्वराची भक्ती म्हणजे भूतमात्राविषयीची भक्ती असे नामदेवांनी सांगितले आहे. ते म्हणतात -

'तू माझे जीवन नाम नारायण । नित्य अनुष्ठान तुझ्या नामे ।
बाह्य अभ्यंतरी तूंचि सर्वां ठायी । तुजविण सृष्टी शून्य दिसे ॥' (६२०)

संदर्भ ग्रंथ :
महाराष्ट्राचा भागवत धर्म : ज्ञानदेव आणि नामदेव : डॉ. शं. दा. पेंडसे
ओळीचे अभंगाची श्रीसकल संतगाथा : (संपा.) वै. ह. भ. प. राहिरकर
महाराष्ट्र सारस्वत : कै. वि. ल. भावे, डॉ. शं. गो. तुळपुळे
संत नामदेव : डॉ. हे. वि. इनामदार : प्रस्तावना : डॉ. अशोक कामत
संत नामदेवांचे जीवन आणि हिंदी-मराठी काव्य यांचा पुनर्विचार : डॉ. अशोक कामत यांचा प्रबंध

सौ. सुनिता तांबे
२, आसावरी, गणेशखिंड रोड, औंध, पुणे ४११ ००७.

## खरा भाव

व्यर्थ रोज देवपूजा
जाई दूर तीर्थयात्रा
मिथ्या सारे जपजाप - ढोंगीपण ॥ १ ॥
नेमे करी उपवास
खरे जिव्हेचेच सोस
मांडीयले अवडंबर - लौकीकासाठी ॥ २ ॥
देव शोधी दगडात
धुंडीतसे राऊळात
ओवाळूनी पंचारती - भावाविना ॥ ३ ॥
टाळ - वीणा गजरात
देव परी हरवला
उरे मोठेपण प्रसादाला - आरतीपुढे ॥ ४ ॥
दूर मात्र कोणी एक
शांत करी नित्यकर्म
कर्म तो चि धर्म - जाणूनीया ॥ ५ ॥
पाहे चराचरी हरी
तुझ्या माझ्या हृदयांतरी
व्यापुनिया जो राही - पंचभूत ॥ ६ ॥
अंतरात सतत...
चाले सोऽहम् ध्यान
हरीपायी मन... लीन झाले. ॥ ७ ॥
मानूनीया प्रमाण
एक संतवचन
कर्मयोगी अंगी - बाणितसे ॥ ८ ॥
देहाचे चंदन
भक्तीरुप उटी
भावपुष्प मन - वाहीतसे ॥ ९ ॥
उभा जन्म असा
प्रेममय होता
ये भक्ताघरी हरी... चाकरीला ॥ १० ॥

सौ. माधुरी पेंडसे करंदीकर
२७४, ब पर्वती, विश्वनाथ कृपा, पुणे ९.

# "संत श्रीनामदेवांची सगुण भक्ती"


**सौ. प्रभा टेंभेकर**

एम.ए. अर्थशास्त्र

निवृत्त प्राध्यापिका धरमपेठ महाविद्यालय, नागपूर. काव्य रचण्याचा छंद. आध्यात्मिकतेकडे जास्त ओढा. यज्ञशिखा, वंदनीय मावशी केळकर यांच्या जीवनचरित्रावर आधारित काव्य कुसुमांजली. समर्थदर्शन, दिव्यत्वाची जेथे प्रचिती, स्वामी विवेकानंद यांच्या जीवन गाथेवर आधारित व तेजोमय तव जीवनदर्शन रा. स्वं. संघ आद्यसंस्थापक डॉ. हेडगेवार यांच्या जन्मशताब्दीप्रित्यर्थ वाहिलेली गीत सुमनांजली हे काव्यसंग्रह प्रकाशित. वरील गीतांचे संगीत कार्यक्रम सादर.


आपली भारतीय संस्कृती अतिशय पुरातन असून नित्यनूतन आहे. तिने आपल्या समाजाचा आदर्श पुरुष म्हणून संतांच्या जीवनाला फार महत्त्व दिले आहे. ज्याला सत्याचे ज्ञान होते तो सर्वज्ञच बनतो. वस्तू आहे तशी दिसणे हे खरे ज्ञानाचे लक्षण. ह्या व्यतिरिक्त होणारे ज्ञान हे खरे ज्ञान नसून ते अज्ञान असते किंवा विपरीत ज्ञान तरी असते. समर्थ रामदास स्वामी सांगतात, "ज्ञान म्हणजे आत्मज्ञान । पहावे आपणासी आपण ॥" खरा मी कोण हे जाणणारे संत आत्मज्ञानी असतात. त्यामुळे ते आत्मसुखात मग्न असतात. 'सदा स्वरूपानुसंधान हेचि साधूचे लक्षण ॥' हे त्यांना पूर्णपणे लागू पडते. म्हणूनच लौकिक विद्येचा स्पर्श नसतानासुद्धा ते खरे ज्ञानी पुरुष ठरतात. संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, संत तुकाराम, संत रामदास यांच्यापासून तर अलिकडच्या काळातील श्रीरामकृष्ण परमहंस, श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज, शेगांवचे गजानन महाराज, पावसचे स्वामी स्वरूपानंद आदि अनेक संत हे या कोटीत मोडतात. परातत्त्वाच्या परीस स्पर्शाने त्यांचे अवघे जीवन उजळून गेलेले असते. खऱ्या 'मी' चा बोध झाल्याने जीवनातील परमअर्थ-परमार्थ त्यांनी आत्मसात केला असतो. विशेष असे की अनित्य म्हणजेच नाशिवंत अशा मानवी देहात राहूनच नित्य व अविनाशी स्वरूपाचा अनुभव ते घेतात. देहात राहून देहातीत होण्याची कला त्यांना साधली असते. त्यातूनच अखंड आनंद-समाधान हे मिळवितात. हा शाश्वत आनंद म्हणजेच आत्मसुख हेच खरे सुख आहे. हा आनंद प्राप्त करून घेण्यासाठीच "देहबुद्धी ते आत्मबुद्धी करावी । सदा संगती सज्जनाची करावी ॥" असा उपाय श्रीसमर्थ सुचवितात. हा आनंद इतर जीवांना मिळावा म्हणून संत प्रयत्नशील असतात. भगवंताच्या दिव्य नामाने त्यांचे अंतःकरण अतिशय पवित्र व सूक्ष्म बनलेले असते. ते सदैव भगवंताच्या अनुसंधानातच असतात. "जैसी गंगा वाहे तैसे ज्याचे मन । भगवंत जाणा तयाजवळी ॥ तयाजवळी देव भक्तीभावे उभा । स्वानंदाचा गाभा तया दिसे ॥" असे संत तुकारामांनी केलेले त्यांचे वर्णन यथार्थ आहे. अशा संतांच्या कृपेचा स्पर्श जीवाला झाला तर त्याच्या जीवनाचे सोने होते. 'आपणासारिखे करिती तात्काळ ॥' अशी त्यांची किमया असते. "देव सारावे परते । संत पुजावे आरते॥" इतके संतांच्या जीवनाला महत्त्व आहे. ज्या ईश चैतन्याचे आपण अंश आहोत त्याची भेट संत आपणाला करून देतात. संतांनीच आपल्या उत्कट भावनेने परमात्म्याला सगुणात आणले.

अशा सगुणाच्या प्रेमाने ओथंबलेले जीवन जगणारे संत नामदेव म्हणूनच सर्वांच्या हृदयाचा ठाव घेतात. संत ज्ञानेश्वरांच्या समकालीन संतांत सगुण भक्तीचा परमोत्कर्ष श्रीनामदेवांच्या चरित्रात बघावयास मिळतो. त्यांचे संपूर्ण जीवन पंढरीच्या विठोबाच्या प्रेमाने भारले आहे. भगवंत हा सगुण आहे व निर्गुणही आहे. म्हणूनच ज्ञानेश्वरमाऊली म्हणते, "तुज सगुण म्हणू की निर्गुण रे । सगुण निर्गुण एकु गोविंदु रे॥" परमात्मा हा निर्गुण निराकार असून तो सर्वव्यापी, सर्वसाक्षी व सर्वशक्तिमान आहे. "न संदृशे तिष्ठति रूपमस्य । न चक्षुषा पश्यति कश्चिदेनम् ॥" असा निर्गुण परमात्मा मन, बुद्धी वा देह यांना आकलन होणारा नाही. "इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः । मनसस्तु परा बुद्धे र्यो बुद्धेः परतस्तुसः ।" असे भगवद् गीतेत श्रीकृष्णाने त्याचे वर्णन केले आहे. अशा या निर्गुण परब्रह्माची पहिली खूण म्हणजे ॐकार. त्यालाच शब्दब्रह्म म्हणतात. संत त्यालाच नाम म्हणतात. श्रीसमर्थांनी मनाच्या श्लोकांची सुरुवात करताना 'मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा' असे सांगून 'गमू पंथ आनंत या राघवाचा' असे सांगताना अनंत, अपार, अतर्क्य असे जे परमात्म्याचे स्वरूप त्याच्या उपासनेचा पंथ सांगून त्यासाठी 'भक्तिपंथेची जावे' असा उपाय पण सुचविला आहे व त्यायोगे सगुण उपासनेचे महत्व विशद केले आहे. निर्गुणात ज्ञान आहे तर सगुणात प्रेमभाव आहे. प्रेम करणे हा मनुष्याचा उपजत गुण आहे. म्हणून दृश्यावरील प्रेम भगवंताकडे वळविले की ती भक्ती होते. प्रेमाला काहीतरी आलंबन हवे. ते साकार हवे. साकारावर प्रेम करणे सहज सुलभ असते. 'मुळात निर्गुणाशिवाय सगुण खरे नाही ही गोष्ट सत्य असली तरी सगुण खरे धरून चालल्याशिवाय निर्गुणापर्यंत जाता येणार नाही. सगुणोपासनेत स्वतःचा विसर पडला की एकीकडे 'मी' नाहीसा होतो व दुसरीकडे देव नाहीसा होतो आणि शेवटी परमात्मा शिल्लक उरतो. म्हणून आपण निर्गुणाची ओळख करून घेऊन सगुणात राहावे' असे श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज आपल्या प्रवचनात सांगतात. 'सगुणाचेनि आधारे । निर्गुण पाविजे सत्वरे ॥' असे श्रीसमर्थ सांगतात ते याच अर्थाने. आपण ज्या शक्तीद्वारे डोळ्यांनी बघतो ती शक्ती बाह्य डोळ्यांशिवाय प्रकट होऊ शकत नाही. म्हणून निर्गुण निराकार परमात्मा सगुणाच्या आधाराशिवाय आपल्याला कळणार नाही. नामदेवांनी तर बालपणापासूनच या सगुणाला घट्ट पकडले होते. ते

उपजतःच भक्त होते. तर श्रीज्ञानेश्वर 'बालपणी सर्वज्ञता' या न्यायाने निर्गुणोपासक म्हणजे ज्ञानी भक्त होते. श्रीमद्‌भगवद्‌गीतेचा बारावा अध्याय भक्तीरसाचा परिपोष करणारा असा पावन अध्याय आहे. श्रीकृष्णाने त्याला 'येतुधर्म्यामृतमिद' यथोक्त पर्युपासते ॥ म्हटले. त्यात सगुण भक्त व निर्गुण भक्त यात तुला अधिक कोण प्रिय आहे असा प्रश्न अर्जुनाने केला असता दोघेही भक्त मला सारखेच प्रिय आहेत कारण ते बाहेरून वेगळे भासत असले तरी आतून भगवंतांशी एकरूपच आहेत, असे सांगून भक्ताची लक्षणे सांगितली. सगुण भक्तीयोगात प्रत्यक्ष इंद्रियांना राबविता येते. डोळ्यांनी भगवंताची मूर्ती बघणे, हातांनी त्याची पूजा करणे, मुखाने त्याचे नाम घेणे, कानांनी त्याचे गुणवर्णन ऐकणे व पायांनी तीर्थयात्रा करणे अशा रीतीने 'विषय तो त्यांचा झाला नारायण' यानुसार सर्व इंद्रिये भगवंताच्या सेवेतच गुंतविणे हे इंद्रिय दमनापेक्षा सोपे. म्हणूनच श्रीकृष्ण अर्जुनाला उपदेश करतात 'मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धीं निवेशय । निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥' जो स्वतःचे कर्तृत्व शून्य आहे हे ओळखून भगवंताला शरण जातो तो खरा भक्त. देहाच्या किंवा बाह्य परिस्थितीच्या प्रतिकूल किंवा अनुकूल अशा कोणत्याही अवस्थेत समाधान टिकणे व सर्व काही भगवंताच्या इच्छेने किंवा सत्तेने चालले आहे ही जाणीव अखंड राहणे याचेच नाव शरणागती. ही अवस्था नामदेवांच्या चरित्रात प्रकर्षाने दिसून येते. 'नामा म्हणे आता सकळ सांडोन । आलोसे शरण विठोबासी॥'

भगवंत हा आनंदस्वरूप आहे. तो सर्वत्र भरला आहे. तो आनंदाचा ठेवा प्राप्त करून घेण्यासाठी भगवंताच्या नामात तो आहे अशी अढळ श्रद्धा ठेवून सर्वच संतांनी त्याच्या नामाचा अखंड सहवास केला व त्यातूनच त्यांना भगवंताच्या सगुणरूपाची गोडी लागली. 'नाम आठविता रूपी प्रकट पै झाला' असा निर्वाळा श्रीज्ञानेश्वर देतात. 'नित्य नवा आनंद ओवाळिता श्रीमुख' असा संत एकनाथांचा स्वानुभव आहे. तसेच विठ्ठलाला पाहून देहभान हरपणारे संत नामदेव सांगतात, 'पहा विठ्ठल हा विटे चरण तयाचे गोमटे । अमृतदृष्टी अवलोका ॥' संत जनाबाई, कबीर, मीराबाई, तुलसीदास, चोखोबा, गोरा कुंभार आदी सर्वच संतांची अनुभूती एकच. सगुणाची पूजा-अर्चा करता-करता त्यात विलीन होणे हाच भक्तीचा खरा गाभा. परंतु याचा अर्थ केवळ कर्मकांड किंवा बाह्योपचार म्हणजे भक्ती नव्हे. ते फक्त बाह्यांग आहे. त्यापेक्षा अंतरंगातील भाव महत्वाचा आहे. 'भाव ज्याचा शुद्ध झाला । दुरी नाही देव त्याला ॥' अंतःकरण जेवढे पवित्र व सात्त्विक बनेल तितका भाव शुद्ध होत जाईल. नामस्मरण हे चित्तशुद्धीचे साधन आहे. अशा श्रद्धेने केलेल्या नामस्मरणाने भगवंत वश होतो. म्हणूनच नामदेव म्हणतात, 'नामा म्हणे नाम अखंडीत स्मरा । पांडुरंग धरा भजा वेगी' किंवा 'नाम संजीवनी अमृत सरिता । परिपूर्ण भरिता सिंधू ऐसा ॥' दासबोधात नामस्मरणाचे महत्त्व विशद करीत असताना 'काहीच न करोनि प्राणी । रामनाम जपे वाणी । तेणे संतुष्ट चक्रपाणी । भक्तालागी सांभाळी ॥' असा विश्वास श्रीसमर्थ देतात. म्हणून भगवंताच्या दिव्य नामाने संपूर्ण शरीर व्यापले गेले तर शरीरांतर्गत सर्व पेशी नाममय होतात. संपूर्ण चराचरात भगवंत व्यापून आहे. याचा अनुभव येतो व **'जे जे भेटे भूत । ते ते जाणिजे भगवंत'** अशी विशाल दृष्टी प्राप्त होते. 'सर्वत्र घनदाट भरला हरी' अशी अनुभूती संतांनाच येऊ शकते म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात, 'तुका म्हणे देह भरला विठ्ठले । काम क्रोधे केले रिते घर ॥' किंवा संत जनाबाई 'हृदयि बंदिवान केला । आत विठ्ठल कोंडला' असे अधिकारवाणीने सांगू शकते. तसेच 'अंतर राम बाहिर राम । जहा देखो तहा रामहि राम ॥' अशी विलक्षण अवस्था संत कबिरांना प्राप्त होते. देवाच्या वेडाने सर्व संत असे झपाटले जातात.

पंढरपूरची विठु माऊली म्हणजे संतांचा विशेषतः वारकऱ्यांचा खरा विसावा. त्यांच्या जीवीचा तो खरा जिवलग. विठ्ठलाच्या नामघोषात ही नगरी आजही दुमदुमून जाते. 'तुका म्हणे आम्हा अनाथाकारणे पंढरी निर्माण केली देवे ॥' अशा या पंढरपुरातच संतश्रेष्ठ नामदेव लहानाचे मोठे झाले. भागवत संप्रदायाच्या इतिहासात नामदेवांचे स्थान अनन्यसाधारण आहे. भागवत धर्माची पताका त्यांनी अटकेपार नेऊन फडकविली. त्यांच्या घराण्यातच विठ्ठलभक्ती आणि पंढरपुरची वारी पूर्वीपासून चालत आली होती. मूळ पुरुष यदुशेट रेळेकर तर नामदेवांचे जन्मदाते दामाजी शेट यांनी मनापासून हा वारसा जपला व नामदेवांच्या काळात तो अधिक समृद्ध झाला. पंढरीच्या विठोबाचे निरंतर सुख लाभावे म्हणून दामाजी शेटने पंढरीतच मंदिराजवळ झोपडी बांधून आपले वास्तव्य केले. विठ्ठलाच्याच अपूर्व कृपेने त्यांची भक्ती संत नामदेवांच्या रूपाने फळाला आली. अशा या विठ्ठल भक्तीचे बाळलेणे घेऊनच नामदेव जन्मास आले व विठ्ठलप्रेमाच्या रसायनाने त्यांचे जीवन घडले आणि त्याचा दृढ संस्कार त्यांच्या कोवळ्या वयातच त्यांच्या मनावर खोल उमटविला गेला. वयाबरोबर विठ्ठल भक्तीचे बीज अंकुरीत होऊ लागले. हळूहळू नामदेव विठ्ठल नामात दंग होऊ लागले. विठ्ठलाच्या पायाशी त्यांच्या निरागस भाबड्या मनाला आगळेच सौख्य मिळू लागले. त्यांच्या रोमारोमात विठ्ठलभक्ती भिनली. ते कीर्तनात इतके तल्लीन होत की, 'नामदेव कीर्तन करी । पुढे नाचे पांडुरंग ॥' असे वर्णन संत जनाबाईने केले आहे. स्वतः पांडुरंगानेही त्यांचे कोडकौतुक केले आहे. संत नामदेव आपल्या अभंगात सांगतात -

विठोबाच्या गावा जाईन धावोनी । घालीन लोळणी चरणावरी ॥
शिणभाग दवडिला म्हणेल । जीविचे पुसेल जडभारी ॥
हरूषे लोळत जाईन महाद्वारा । भेटाया सामोरा येईल मज ।
उचलोनी वोसंगे घेईल आदरे । मुख पितांबरे पुशिल माझे ॥
धरोनी बाहुटी उठविल हस्तकी । ठेवील मस्तकी अभयकर ॥
राही रखुमाई माता सत्यभामा । कडे घेऊनी नामा बुझाविला ॥

दुसऱ्या एका अभंगात शेवटी ते म्हणतात -

नामा म्हणे विठोबा कृपेची माऊली । तळहाते साऊली करील मज ॥

अशा रीतीने नामदेवांचे अवघे जीवन पांडुरंगाभोवती गुंफले आहे. त्यांचे खेळणे, बोलणे, रुसवे, फुगवे सारे काही पांडुरंगाशीच असे. त्यांच्या बालहट्टाला भुलून पांडुरंगाने नैवेद्य खाल्ला ही गोष्ट प्रसिद्ध आहे. वास्तविक हा चमत्कार नव्हे तर सगुणभक्तीचा तो उत्कट बिंदू आहे.

सर्व विश्व भगवंताने निर्माण केले तेव्हा चेतनाबरोबर अचेतनातसुद्धा त्याचे अस्तित्व आहेच. त्या अचेतनालासुद्धा आपल्या भावोत्कट भक्तीने संत चैतन्य स्वरूपात आणतात. संत चमत्कार करीत नसतात. त्यांच्या अतींद्रिय शक्तीमुळे ते अतिसूक्ष्म अशा वायुमय देहाने विश्वात वावरतात. हा देह विश्वातल्या शक्तीशी तादात्म्य पावून त्यातून इच्छित शक्ती खेचून घेऊ शकतात. या योगशक्तीच्या बळावरच श्रीसंत ज्ञानेश्वरांच्या जीवनात अनेक चमत्कार सदृश घटना घडून आल्याचे दिसते. उदा. पाठीवर मांडे भाजणे, जड भिंत चालविणे किंवा रेड्यामुखी वेद वदविणे इत्यादी. अर्थात् या जगाचे मूळ कारण चैतन्य. त्या खऱ्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान झाल्यामुळे सृष्टीतील दृश्य व अदृश्य वस्तूंवर ताबा मिळविण्याचे सामर्थ्य फक्त योग्यालाच प्राप्त होते असे नाही तर भगवंतावर मनापासून प्रेम करणाऱ्या भक्ताला केवळ त्याच्या नामस्मरणाने अशी अतर्क्य शक्ती प्राप्त होते आणि तो विश्वमनाशी एकरूप होऊन जातो. अशा रीतीने मूर्तीपूजा म्हणजेच सगुणोपासना ही निर्गुण निराकार अशा परमात्म्याचा साक्षात्कार घडवून आणणारी एक फार महत्त्वाची पायरी आहे. भक्तराज नामदेवांनी विठ्ठलाच्या मूर्तीला सर्वस्व मानले. त्या पाषाणाच्या मूर्तीत त्यांच्या भावबळामुळे त्यांना सर्वव्यापी चैतन्याचे दर्शन घडले. त्यामुळे त्या मूर्तीतून चैतन्य प्रकट झाले. त्यांचा एकही क्षण पांडुरंगाला विसंबून गेला नाही. त्यामुळे पांडुरंगालाही त्याच्या रक्षणाची हमी घ्यावी लागली. याचे अनेक दाखले त्यांच्या जीवनात आढळतात. देवभक्ताचे हे अलौकिक प्रेम सामान्य व्यवहाराच्या पातळीवर अजमावणे कठीण आहे. ती प्रेमाची एक उच्च अवस्था आहे व हेच भक्तीचे वर्म आहे. अशा प्रेमापोटीच संत मीराबाईसाठी श्रीकृष्णाच्या जड मूर्तीने विष प्राशन केले किंवा हरिनामाच्या नादात गोरा कुंभाराने चिखलात नकळत तुडविलेले त्याचे मूल त्याला जिवंत होऊन मिळाले. अलीकडच्या काळात श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांच्या जीवनातील एक प्रसंग पण पुरेसा बोलका आहे. एकदा ते नेमिषारण्यात जाण्यास निघाले असता त्यांनी ज्या श्रीरामाच्या मूर्तीवर नितांत प्रेम केले त्या रामरायाच्या मूर्तीच्या डोळ्यांत भक्ताच्या वियोगामुळे खरोखर अश्रू उभे राहिलेत. अशा प्रकारे भगवंताची उपासना करून त्याची प्राप्ती करून घेणे हे खरे मनुष्य जन्माचे ध्येय आहे व त्यासाठी सगुणोपासना, नामस्मरण व सत्संग हे उपाय आहेत म्हणूनच संत श्रीएकनाथ आपल्या हरिपाठात म्हणतात, 'भक्तिवीण पशू कशासी वाढला । सटवीने नेला कैसा नाही ॥ काय माय गेली होती भूतापाशी । हरि नये मुखासी अरे मूढा ॥'

अशा नामस्मरणाद्वारे भक्तीरसात चिंब भिजलेले नामदेव म्हणजे उत्कट भक्तीचा एक आदर्श होता. त्यांच्या पित्याने त्यांना पाचव्या वर्षी जेव्हा शाळेत टाकले तेव्हा तिथे गुरुच्या शिकवण्याकडे त्यांचे लक्षच नसे. ते विठ्ठलाचे नामस्मरण करीत व आपल्या सवंगड्यांनाही तसे करायला सांगत. त्यावेळच्या पद्धतीनुसार त्यांचा वयाच्या आठव्या वर्षी विवाह करून देण्यात आला. हळूहळू पुढे त्यांचा कौटुंबिक पसारा वाढू लागला. पण नामदेव मात्र मनाने या लौकीक संसारात रमलेच नाहीत. त्यांचा संसार व्यवहाराच्या पातळीवर फाटकाच राहिला. नाही म्हणायला कुटुंबात जनाबाई धरून पंधरा माणसांचा राबता होता. त्यामुळे आर्थिकदृष्ट्या फार ओढाताण व्हायची. परंतु नामदेवांच्या दृष्टीसमोर संसार हा शून्यच होता. विठ्ठलप्रेमापुढे संसाराची उपाधी गळून पडली. सावळ्या अशा विठाईने त्यांचा देहभाव हरपून टाकला व आत्मसुखातच ते रममाण झाले. साहजिकच 'इष्ट मित्र बंधू सज्जन सोयरा । माझिया संसारा हाचि एक' त्यांनी संसार जरी टाकला नाही तरी तो आसक्त होऊन केला नाही. विठाई माऊलीच्या भावभक्तीच्या अलौकीक संसारात रमलेले नामदेव दृश्य संसाराविषयी उदासच होते. त्यामुळे त्या संसारात निर्माण होणाऱ्या सुख-दुःखाची झळ त्यांच्यापर्यंत पोहोचलीच नाही. 'या देवासी भेटी जन्ममरण तुटी । मावळली गोष्टी संसाराची ॥' ही त्यांची दृढ भावना होती. परंतु त्यांच्या विठ्ठलाच्या वेडामुळे संसाराची जी परवड झाली ती पाहून त्यांना लागलेले विठ्ठलाचे भूत काढण्यासाठी त्यांच्या आई-वडिलांपासून तो आप्तेष्टांपर्यंत साऱ्यांनी त्यांना हटकून पाहिले. नामदेवांच्या मनी मात्र या सर्वांचे स्थान विठोबाच्या पायाशीच आहे. तिथेच त्यांना त्रिभुवनाचे वैभव आढळते. त्यांचे कुटुंबीय मात्र व्यवहाराच्या पातळीवरून त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करतात. विठोबाचा हा प्रेमा संसाराच्या आड येत आहे असे वाटल्यामुळे त्यांची आई - गोणाई हिने तर प्रत्यक्ष विठोबाला जाब विचारायला कमी केले नाही. 'गोणाई म्हणे देवा त्वा केली निरास । चालविले उदास बाळ माझे' 'तुझ्या सहित पंढरी मी गिळीन' अशी एक प्रकारे धमकीसुद्धा दिली. राजाई त्यांची पत्नीसुद्धा त्यांची संसारविन्मुखता पाहून 'सर्वस्व सांडूनी धरिला तुम्ही देव ॥' अशी नाराजी दाखवते व 'लावोनी लंगोटी झालेती गोसावी । आमची ठेवाठेवी कोण करी ॥' अशी व्यथा व्यक्त करते. नामदेवाने विठ्ठलाची भक्ती करू नये असे या जिवलगांना चुकूनही वाटत नाही. कारण तेही सारे विठोबाचे भक्तच आहेत. पण विठ्ठलाच्या नादी लागून संसाराकडे पूर्ण दुर्लक्ष व्हावे, खाण्या-पिण्याची आबाळ व्हावी याची त्यांना खंत आहे. आपल्या शिवण टिपण्याच्या परंपरागत धंद्यात थोडीतरी मदत करून प्रपंचाच्या गाड्याला हातभार लावावा अशी त्यांची रास्त अपेक्षा आहे. पण त्यांच्या तक्रारीमुळे नामदेव आपल्या वृत्तीपासून तसूभर ढळले नाहीत. त्यांच्या पांडुरंगाच्या प्रेमात मुळीच अंतर पडले नाही. नित्य अशा चिरंतन सुखाचा ठेवा प्राप्त झाल्यावर अशाश्वत, अनित्य अशा प्रापंचिक मृगजळरूपी सुखाच्या मागे ते कसे वळणार ? 'मज आदि अंती एकु । जननी आणि जनकु पांडुरंग ॥' अशा दृढ श्रद्धेने त्यांनी पांडुरंगाचे चरण घट्ट पकडले होते. एवढेच नव्हे तर गोणाईच्या धमकीने पांडुरंग पण विरघळला नाही. 'नामा झाला देव देव झाला नामा' अशी एकरूपता पांडुरंग आणि नामदेव यांची होती. नामादेवांनी खरा संसार केला तो आध्यात्मिकच. देहभावापेक्षा त्यांचा देवभाव सदेव जागृत होता. पर्यायाने नामदेव संसारी असूनही 'पद्मपत्रमिवाम्भसा' या न्यायाने अनासक्त योगातच रंगले. 'पंढरी माहेर विठ्ठल माऊली' ही जीवनदृष्टी स्वीकारल्यामुळे संसारसुख म्हणजे विषाचा विस्तार अशी त्यांची पक्की धारणा झाली होती. साऱ्या त्रिभुवनाचे वैभव त्यांना विठ्ठलाच्या गोमट्या चरणापाशीच मिळते. म्हणून संसाराच्या

उपाधीपासून ते मुक्तच राहिले. त्यामुळे प्रारंभीच्या काळात त्यांच्यावर रुष्ट झालेली कुटुंबीय मंडळी पुढे त्यांच्या परमार्थात सामील झालीत. इतकेच नव्हे तर त्यांच्याकडे काम करणारी जनीदासी सुद्धा त्यांच्या परमार्थात पूर्णांशाने सहभागी होऊन संतत्वाला पोहोचली. कुटुंबातील दास्याबरोबर तिने नामदेवांचे पारमार्थिक दास्यत्व पत्करले. 'दळिता कांडिता तुज गाईन अनंता' अशी तिची अवस्था झाली व तिनेही पांडुरंग आपलासा करून घेतला. तिला प्रत्यक्ष पांडुरंग दळण-कांडण करू लागत असे. त्याच्या कृपेनेच तिच्यावर विठ्ठलाचा हार चोरण्याचा आळ आला असता तिला शिक्षा म्हणून सुळावर नेत असता सुळाचे पाणी झाले. 'अनन्यास रक्षीतसे चापपाणी नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी।।' अशी प्रचीती आली. तिचा देह जणू 'कीर्तनी जन्मला । हरिभक्तीने शिंपिला ।।' असा झाला. 'जनी म्हणे जोड झाली विठोबाची । दासी नामयाची म्हणोनिया ।।' असे धन्यतेचे उद्‌गार तिने काढले आहेत. भक्त नामदेवामुळे त्यांच्या सहवासात तिचे जीवन उद्धरून गेले.

नामदेवांची विठ्ठलभक्ती अगदी शिगेला पोहोचली होती यात वाद नाही. भावबळाने त्यांनी विठ्ठलाला आपलासा करून घेतले होते व त्याच्या सान्निध्यातच त्यांना कृतकृत्यता वाटत होती आणि त्याचा त्यांना सात्त्विक अहंकार पण निर्माण झाला होता. त्यांनी सगुणाला कवेत घेतले. पण मर्यादेचे त्यांना भान नव्हते. त्यामुळे आत्मानंदाच्या दिव्य क्षणाला ते वंचितच राहिले. पारमार्थिक जीवनातील ही उणीव श्रीज्ञानेश्वरादि भावंडांच्या आळंदी येथील भेटीमुळे दूर झाली. त्यांच्या भोळ्या भावभक्तीला ज्ञानाचा गंगीघ मिळाला. या पहिल्या भेटीत मुक्ताईने त्यांना पाहून 'अखंड जयाला देवाचा शेजार । कारे अहंकार गेला नाही।।' असे उद्‌गार काढले. सद्‌गुरुकृपेच्या अभावी त्यांची पारमार्थिक वाटचाल अपूर्णच होती. त्यासाठी अहंकाराचा अडसर दूर करण्यासाठी चितूशक्ती मुक्ताईने युक्ती केली. 'निर्गुणाचे भेटी आलो सगुणा संगे' असे अधिकारवाणीने सांगणाऱ्या गोरोबा काकांकडून नामदेवाचे मडके कच्चे आहे असे शिक्कामोर्तब करून घेतले. 'गोरा म्हणे कोरा राहिला गे बाई । शून्यभर नाही भागियेला ।।' व त्यासाठी 'गुरुविण तुज नव्हेचिगा मोक्ष ।।' या घटनेमुळे क्षणभर नामदेवांना राग आला पण खऱ्या ज्ञानाची ओळख करून घेण्याची उत्कंठा त्यांच्या अंतःकरणात निर्माण झाली. त्यांनी लगेच विठ्ठलाच्या चरणाशी जाऊन धरणे धरले. पांडुरंगाने त्यांची व्याकुळता पाहून श्रीविसोबा खेचराकडे जाण्याची अनुज्ञा दिली. त्यानुसार औंढ्या नागनाथाच्या ज्योतिर्लिंगाच्या मंदिरात ते पोहोचले. तिथे शंकराच्या पिंडीवर जोड्यांसहित पाय ठेवून विसोबा निजलेले पाहून त्यांच्या मनात विकल्प आला व त्यांचे मन खट्टू झाले. ते पाहून ज्या ठिकाणी शिवलिंग नाही तिथे माझे पाय उचलून ठेव असे विसोबांनी सांगितले. नामदेवांनी त्यांचे पाय उचलले खरे पण ते जिथे पाय ठेवीत तिथे शिवलिंग उत्पन्न होऊ लागले. नामदेवांच्या भोवती सारे देऊळच गरगर फिरायला लागले. त्यांना साक्षात सद्‌गुरुच्या सामर्थ्याची प्रचीती आली व भगवंताच्या सर्वव्यापकतेचा अनुभव आला. 'अहं ब्रह्मास्मि' या वचनाची ओळख पटली. सगुणभक्त नामदेव, निर्गुण, निराकार, सच्चिदानंदमय, ब्रह्मस्वरूपाशी एकरूप झाला. सद्‌गुरुकृपेमुळे आत्मबोध होऊन त्यांचे पारमार्थिक जीवन उजळून निघाले. अहंकार पूर्ण गळला. सर्वत्र आणि सर्वांभूती भगवंत आहे हे तत्व त्यांच्या अंतःकरणात ठसले. म्हणूनच श्वानाच्या रूपाने विठ्ठलच आला आहे असे समजून कोरडी पोळी नेणाऱ्या त्या श्वानामागे तुपाची वाटी घेऊन नामदेव धावू शकले. तरीपण त्यांच्या हळूवार श्रद्धाळू मनाने सगुणोपासनेचा छंद सोडला नाही. त्यांच्या या आत्यंतिक भक्तीप्रेमाचा ओलावा पाहून ज्ञानेश्वर पण मोहून गेले. सर्वसामान्यांना भावणारी अशी ही नामभक्ती अतिशय सुलभ होती. तेव्हा त्या भक्तीतील रहस्य नामदेवांकडून जाणून घ्यावे या इराद्याने जणू ज्ञानेश्वरांनी सर्व संतमंडळींसमवेत तीर्थयात्रेला जाण्याचा संकल्प केला. पंढरपूरला येऊन त्यांनी आपला मनोदय नामदेवांजवळ व्यक्त केला. 'क्षण एक एकांती बैसोन सहज । अंतरीचे गुज बोलो काही ।।' तीर्थयात्रेच्या निमित्ताने हा एकांत मिळणार होता. पण नामदेव मात्र स्वतःच्या भक्तीप्रेमात संतुष्ट होते. ते पंढरी सोडायला तयार नव्हते. 'सर्व सुख मज आहे पांडुरंगी । जावे कवणालागी कवणा ठाया ।।' ही त्यांची भूमिका होती. शेवटी एकदा पांडुरंगाची अनुज्ञा घेऊन नामदेव तीर्थयात्रेला निघाले. पण चित्त मात्र पांडुरंगाचा वियोग सहन करायला तयार नव्हते. त्यांची ही घालमेल पाहून विठ्ठलाला पण गहिवर आला. हा प्रसंग पाहून 'धन्य तुझा भाव एकविध' असे उद्‌गार ज्ञानेश्वरांच्या तोंडून बाहेर पडतात. या भावविश्वातच नामदेवांनी तीर्थयात्रा केली. म्हणूनच तीर्थयात्रेवरून परत आल्यावर पांडुरंगाच्या चरणांशी त्यांनी धाव घेतली त्या वेळी 'सद्‌गदित कंठ ओसंडला नयनी । घातली लोळणी चरणावरी ।।' शिणलो पंढरीराया पाहे कृपादृष्टी । थोर जालो हिंपुटी तुजवीण ।। अशी त्यांची अवस्था झाली. असे असले तरी तीर्थयात्रेच्या वाटेत ज्ञानेश्वरांबरोबर त्यांचा जो सुखसंवाद झाला तो म्हणजे भक्ती व ज्ञान यांचे जणू हितगुजच होते. ते दोघेही भावनिक दृष्ट्या परस्परांच्या अधिक निकट आलेत. नामदेवांच्या आत्मसंतुष्ट भक्तीला अज्ञानाची झळाळी लाभली. तद्‌वत ज्ञानदेवांच्या ज्ञानयुक्त भक्तीला पंढरीनाथासाठी व्याकूळ होणाऱ्या नामदेवांचे भावदर्शन घडले. यातूनच भागवत धर्माच्या प्रसाराची प्रेरणा ज्ञानदेवांनी नामदेवांना दिली असली पाहिजे. ज्ञानदेवांच्या सहवासात नामदेवांचा काळ मोठा आनंदात गेला.

यानंतर लवकरच आपले अवतारकार्य संपले हे जाणून ज्ञानदेवांनी आपला संजीवन समाधी घेण्याचा मनोदय प्रकट केला. मात्र नामदेवांच्या हळुवार अंतःकरणात ज्ञानदेवांचा चिरवियोग सहन करण्याची कल्पना रुजणे कठीणच होते. परंतु ज्ञानेश्वरांचा निर्णय पक्का होता. सर्व संतमंडळी हा समाधी सोहळा पाहण्याकरता नव्हे ज्ञानीयांच्या राजाला अखेरचा निरोप देण्यासाठी आळंदीला एकत्रित जमली होती. सर्वच संतांना शोक अनावर झाला होता. त्या वेळचे अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन नामदेवांनी आपल्या 'समाधी' या प्रकरणात केले आहे. तो करुण परंतु अलौकीक अशा भावरसाने ओथंबलेला प्रसंग आजही नजरेसमोर तरळतो. नामदेव स्वतः इतके गलबलून गेले की ते म्हणतात, 'कोण

जाणे माझ्या जीवीचा कळवळा । प्रेमाश्रू डोळा दाटताती ।। नामा म्हणे येथ बोलवेना मज । जातसे निजगुज आवडीचे ।।' त्यांच्या डोळ्यांतून आसवांचा अखंड पूर वाहत होता. भावविव्हळ अशा मनःस्थितीतच नामदेवांनी आपल्या मुलांकडून तुळशी, बेल, दर्भ, फुले इत्यादी साहित्य आणविले. साक्षात् पांडुरंगानी व निवृत्तीनाथांनी हात धरून ज्ञानेश्वर माऊलीला समाधीस्थळी नेले. नामदेवांनी त्यांच्या गळ्यात पुष्पमाळा घातल्या. ज्ञानेश्वरांनी आपल्या सद्गुरुंचा - निवृत्तीनाथांचा निरोप घेतला तेव्हा त्यांना आलिंगन देताना योग्यांचा मुकुटमणी असे निवृत्तीनाथसुद्धा वळचणीचे पाणी आढयाला गेलेले पाहून गहिवरून जातात. 'बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ।।' अशी त्यांची करुण अवस्था होते. शेवटी जड अंतःकरणाने विवराचे दार बंद करण्यात येते. 'नामदेव म्हणे लोपला दिनकर । बाप ज्ञानदेव समाधिस्थ ।।' हे भावस्पर्शी वर्णन वाचताना नामदेवांच्या भावुक आणि आर्त अंतःकरणाची साक्ष पटते.

नामदेवांमुळे श्रीज्ञानेश्वरांचे अलौकीक जीवन समाजापुढे आले. ज्ञानदेवांच्या पाठोपाठ त्यांच्या भावंडांचे पण थोड्या फार अंतराने निर्याण होते. त्यामुळे नामदेवांची मनःस्थिती विकल होणे स्वाभाविक होते. परंतु त्यातून सावरल्यानंतर भागवत धर्मरूपी नंदादीपाची प्रभा सर्वदूर पसरविण्याची आकांक्षा त्यांचे मनी स्फुरली असली पाहिजे असे त्यांच्या अभंगांवरून लक्षात येते. ज्ञानदेवांबरोबर त्यांनी उत्तरेकडे जी यात्रा केली त्या वेळी भोवतालच्या सामाजिक परिस्थितीचे प्रतिबिंब त्यांच्या अंतःकरणावर उमटले होते. त्यामुळेच कदाचित् आपल्या आत्मसंतुष्ट कोशातून बाहेर पडून धर्मावरील निष्ठा अढळ राखण्याच्या दृष्टीने जनमानसात भक्तीचे बीज रुजून त्याचा प्रसार व्हावा म्हणून त्यांनी पुन्हा उत्तरेकडे प्रयाण केले व जवळ-जवळ वीस वर्षे तेथे वास्तव्य करून तेथील लोकांची मने आपल्या रसाळ आणि भावयुक्त अभंगवाणीने आकृष्ट करून घेतली. शीखांच्या गुरुग्रंथसाहेब या धर्मग्रंथात नामदेवांची कितीतरी पदे समाविष्ट झाली आहेत. पंजाबात त्यांचे अनेक शिष्य होऊन गेले. त्या काळच्या राजकीय प्रतिकूल परिस्थितीत नामदेवांनी केलेले समाजप्रबोधनाचे कार्य केवळ अलौकीक नव्हे तर आश्चर्यकारक आहे. 'नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी ।।' ही त्यांची भूमिका होती. त्यासाठी त्यांचे अभंग हे महत्त्वाचे साधन बनले. अंतःकरणात आर्तता व पांडुरंगाच्या ठिकाणी असलेली अव्यभिचारी श्रद्धा आणि त्याला आत्मप्रचीतीची जोड असल्याने त्यांच्या अभंगांना आगळेच महत्त्व आले. साध्या शब्दांतूनही त्यांच्या मुखातून भक्तीरसाने भरलेली आशयगर्भ कविता स्त्रवत असे. त्यांच्याबद्दल श्रीज्ञानेश्वर म्हणतात

*'भक्त भागवत बहुसाल ऐकिले । बहु होऊनी गेले होती पुढे ।।*
*परी नामयाचे बोलणे नव्हे कवित्व । हा रस अद्भुत निरूपमु ।।'*

हे अगदी योग्य आहे.

आपल्या अभंगवाणीच्या माध्यमातून उत्तरेत भक्तीप्रसाराचे कार्य करून नामदेव पुन्हा आपल्या मायभूमीला परत आले आणि आता जीवन कृतार्थ झाले या भावनेने त्यांनी आपली इहलोकीची यात्रा संपविण्याचा संकल्प केला. त्यांनी विठ्ठलाजवळ समाधी घेण्यासाठी आज्ञा मागितली. नामदेवासारखा भक्तश्रेष्ठ पुन्हा दिसणार नाही म्हणून पांडुरंगही दुःखाने व्याकूळ झाला. धन्य त्या नामदेवांची सगुणभक्ती की ज्यामुळे देवालाही त्यांच्या वियोगाचे दुःख जाणवले. 'वैष्णवासहित बोळवण करा । तुम्ही हो दातारा मजलागी ।।' अशी देवाला विनवणी करून महाद्वारी समाधी घेण्याचे ठरविले. त्यानुसार ज्या महाद्वारी उभे राहून विटेवरच्या सावळ्याचे 'साजिरे श्रीमुख' न्याहाळण्यात त्यांना परमसुख प्राप्त होत असे त्या महाद्वारी पायरीचे चिरे होऊन ते कायमचे विसावले.

'मरोनी जन्मावे पंढरीचे पारी । व्हावे महाद्वारी कृमिकीटक ।।
संतचरण रज लागे येता जाता । नामा म्हणे आता हेचि व्हावे ।।'

नामदेवांचा हा भाव पाहिला म्हणजे त्यांच्या सगुणप्रेमाचा परमोच्च बिंदू प्रतीत झाल्याखेरीज राहत नाही.

'जय पांडुरंग हरि पांडुरंग'


सौ. प्रभा टेंभेकर
२१६, हनुमान नगर,
नागपूर - ४४०००९.




# ।। नामदेवगुरु खेचर विसा ।

**डॉ. श्यामा घोणसे**

एम.ए. पी.एचडी.

मराठी हिंदी वाङ्मय. गरवारे विद्यालयात मराठी प्राध्यापिका. वीरशैव समाजातील उच्चपदवी मिळविणाऱ्या एक महत्त्वाच्या अभ्यासक. शडुस्छळि या आद्य वीरशैव ग्रंथाचे संपादन मराठीतील संतविषयक कादंबऱ्यांचा अभ्यास. भावंडीबाईची जुनी कविता उजेडात आणली. वक्तृत्व, लेखन, संशोधन व अध्ययन यामुळे विशेष प्रसिद्ध.

**प्रास्ताविक**

यादवकाळ हा महाराष्ट्राच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असणारा कालखंड. परंतु त्यातील अनेक संत-सत्पुरुषांभोवती गूढतेचे वलय निर्माण झालेले दिसते. नामदेवगुरु खेचर विसा किंवा विसोबा खेचर हे असेच गूढ यादवकालीन सत्पुरुष. हरिकीर्तनाद्वारे थेट पंजाबापर्यंत स्वत्व-स्वाभिमानाचा ज्ञानधर्मदीप लावणारे संत नामदेवराय हे विसोबांचे सच्छिष्य. शतकोटी अभंगांची प्रतिज्ञा करणारे, मराठीतील पहिले आत्मचरित्रकार - चरित्रकार म्हणून नामदेव सर्वश्रुत आहेत. परंतु आपल्या सद्गुरुंबद्दल मात्र त्यांनी काही मोजकेच आणि सांकेतिकही अभंग लिहिले. त्यातून गुरुंबद्दलचा श्रद्धाभाव जाणवत असला तरी विसोबांच्या चरित्राबद्दल मात्र काही ठोस माहिती मिळत नाही. विसोबांचे चरित्र, त्यांची गुरुपरंपरा याबद्दल अनेक मतप्रवाह दिसतात. विसोबांच्या योगसामर्थ्याच्या कथा मात्र जनमानसात रूढ आहेत. विसोबांच्या चरित्रावर वेगळ्या अंगाने प्रकाश टाकणारा यादवकालीन ग्रंथ म्हणजे 'शडुस्छळि' होय. खेचर विसांच्या या ग्रंथात वीरशैव तत्त्वज्ञानातील 'षट्स्थल' सिद्धांताचे विवरण केलेले आढळते. परंतु हा ग्रंथ महाराष्ट्रात माहीत झाला तो या ग्रंथातील गुरुपरंपरेच्या आधारे, डॉ. रा. चिं. ढेरे यांनी काढलेल्या प्रमेयामुळे. डॉ. ढेरे यांनी 'हरिनाथ हेच चक्रधर' हे महानुभावसंप्रदायाशी निगडित असलेले प्रमेय मांडल्यामुळे महाराष्ट्रात वैचारिक वावटळ निर्माण झाली. थोडा बहुत ग्रंथप्रपंचही झाला. पण होताना ग्रंथनामापासूनच विशिष्ट तत्त्वज्ञान व्यक्त करणारा आशय आणि त्याचा ग्रंथकार मात्र दुर्लक्षितच राहिले. या तत्त्वज्ञानाचाच प्राधान्याने आधार घेत नामदेवगुरु खेचर विसांवर काही प्रकाश टाकण्याचा प्रयत्न या लेखात करणे उचित ठरेल. अर्थात् त्यापूर्वी 'शडुस्छळि'चा साररूपाने परिचय होणे आवश्यक आहे.

**।। मराठी वीरशैव आद्यग्रंथ : शडुस्छळि ।।**

'शडुस्छळि' हा ज्ञानदेवपूर्वकालीन ग्रंथ. खेचरविसा हेच त्याचे ग्रंथकर्ते. डॉ. रा. चिं. ढेरे यांना सोपानदेव समाधिमंदिरातील कागदपत्रांच्या गळाठ्यात हा ग्रंथ १९६९ साली मिळाला. या ग्रंथावर आधारीत आपला प्रबंध (षट्स्थलः एक अध्ययन, १९७५, पुणे विद्यापीठ) पदवीनंतर 'चक्रपाणी' या नावाने डॉ. ढेरे यांनी प्रकाशित केला. [१] या ग्रंथातील गुरुपरंपरेच्या आधारे महानुभाव पंथप्रवर्तक चक्रधर हेच हरिनाथ असल्याचा अन्वयार्थ डॉ. ढेरे यांनी काढला. त्यावर बरेच वादविवाद झाले. स्वतंत्र ग्रंथप्रपंचही झाले. त्यामुळे उपलब्धीनंतर वीस वर्षांनी (१९८९) हा ग्रंथ 'गुरुमाऊली' च्या दिवाळी अंकात [२] प्रकाशित करण्यात आल्यामुळे इतरांनाही पाहता आला. प्रत्यक्ष ग्रंथ पाहिल्यावर आणि वीरशैव-महानुभाव सांप्रदायिकांच्या आचार्य-महंत, उपासक-अभ्यासक यांच्याशी चर्चा केल्यानंतर केवळ काळाच्या संदर्भातच नव्हे तर अन्यही काही महत्त्वपूर्ण प्रश्नचिन्हे घेऊन आलेल्या या ग्रंथाकडे कोणताही पूर्वाभिनिवेश न बाळगता आणि हा ग्रंथ प्रामाणिक आहे असे मानून विचार करता जाणवते ते असे :

या ग्रंथोपलब्धीमुळे विसोबांच्या गुरुपरंपरेबाबतची धूसरता कमी होते. मोजके अभंग लिहिणाऱ्या विसोबांकडे एका संप्रदायाच्या आद्य ग्रंथलेखनाचे कर्तृत्व जाते. त्यामुळे मराठी वीरशैव वाङ्मयनिर्मितीचा काळ ३००-३५० वर्षे मागे जाऊन एकनाथकालीन शांतलिंग-मन्मथऐवजी खेचर विसांकडे त्याचे कर्तेपण जाते. विसोबांचे आजवर परंपरामान्य नाते आहे ते वारकरी संप्रदायाशी. परंतु या ग्रंथाधारे विसोबांचे आंतरिक नाते वीरशैव संप्रदायाशी होते किंवा ते वीरशैव संप्रदायाचे दीक्षित होते असे सूचित करता येते. हे नाते सूचित करण्यापूर्वी विसोबांबद्दल मिळणारी पारंपरिक माहिती साररूपाने पाहू या.

**।। विसोबांबद्दलची पारंपरिक माहिती ।।**

विसोबांचे ज्ञात जीवनचरित्र अत्यंत अस्पष्ट व काही दंतकथांपुरतेच मर्यादित आहे. विसोबांचा काळ अंदाजे शके ११६२ ते १२३१ असावा असे मानता येते. एक कर्मठ ब्राह्मण ही विसोबांची सर्वमान्य पारंपरिक प्रतिमा. ते पैठणनजिकच्या 'मुंगी'गावचे 'खिस्ती' म्हणजे सावकार होते; ते आळंदीनिवासी कुटिल ब्राह्मण असून ते 'चाटी' म्हणजे कापड-व्यवसाय करणारे होते किंवा औंढ्या नागनाथ क्षेत्रीचे शुक्ल यजुर्वेदी शाखेचे ब्राह्मण सराफ म्हणजे विसोबा होत. (त्यामुळेच त्यांच्या अभंगात सराफी परिभाषा आढळते) अशी विविधा मतमतांतरांची माहिती त्यांच्याबद्दल दिली जाते.

त्यांच्या गुरुंबद्दलही अनेक मते आढळतात. विसोबा हे ज्ञानदेवांचे योगबळ पाहून त्यांना शरण आले ही तर रूढ माहिती. ते सोपाननाथांचे शिष्य होते किंवा मुक्ताईने त्यांना बोध केला अशीही समजूत मांडली जाते. या साऱ्यांचा अर्थ एकच. ह्या एकाहून एक विलक्षण पात्रतेच्या भावंडांविषयी विसोबांना आदरभाव वाटत असावा. या पार्श्वभूमीवर विसोबांवर वेगळा प्रकाश टाकण्याचे कार्य 'शडुस्छळि' हा ग्रंथ करतो.

## ॥ 'शडुस्छळि' आणि विसोबा ॥

शडुस्छळितून आदिनाथ → मीननाथ (मत्स्येंद्रनाथ) → गोरक्षनाथ → योगिनी मुक्ताई (आद्य) → चांगा वटेश्वर → कृष्णनाथ (रामकृष्णनाथ) → खेचर विसा. अशी गुरुपरंपरा (६७१-६७५) आढळते. ही गुरुपरंपरा नाथसंप्रदायाशी निगडित आहे. नाथसंप्रदाय आणि योगसाक्षात्काराचे अतूट नाते ध्यानात घेता विसोबांच्या योगबळाची माहिती पटते. नामदेवांना गुरुपदेश देताना विसोबांनी त्यांना ईश्वराच्या सर्वव्यापक स्वरूपाचा साक्षात्कार प्रत्यक्ष आचरणातून घडविल्याची माहिती सारे संतचरित्रकार एकमुखाने देतात. तर 'माई न होती बापु न होता । करमु न होती काइया ॥' या हिंदी रचनेतून प्रत्यक्ष नामदेवांनी या योगसामर्थ्याची दिलेली साक्षही महत्त्वाची ठरते. विसोबांची ही गुरुपरंपरा नाथपरंपरेशी निगडित असल्याची साक्ष देणारी कथा - ('राजा विक्रमादित्याच्या शिवयोगीनी, पतिव्रताशिरोमणी राणी सत्यवतीचे मुक्ताई योगिनीत रूपांतर करणारी') पाहता विसोबा हे गोरक्षनाथांद्वारे वीरशैव संप्रदायाशी निगडित झाले असावे असे मानता येते. (या अर्थाच्या ओव्या क्र. १८७ ते २२६.) श्रीशैल पर्वतावरील भेटीच्या प्रसंगी वीरशैव धर्मप्रचारक अल्लम प्रभू यांनी गोरक्षनाथांना कायासिद्धीची तुच्छता पटवून दिली. उभयतांमध्ये काही विचारसंवाद होऊन नाथांनी अल्लमांकडून शिवदीक्षा घेतली. हा प्रसंग चामरसाच्या 'प्रभुलिंगलीले' या संस्कृत व कन्नडही ग्रंथात तसेच ब्रह्मदासकृत 'लिलाविश्वंभर' मध्ये येते. या प्रसंगाला प्रस्तुत ग्रंथातील ओळींमुळे बळकटीच मिळते. विशेषतः या ग्रंथातील 'गुरुमुख व मनमुख' या कल्पनांद्वारे विसोबांकडे आलेला वीरशैव वारसा स्पष्ट करता येतो. (विस्तारभयास्तव याची केवळ नोंदच केली आहे.) साहजिकच 'गुरु गोरक्षनाथांचा हा सांगावा विशिष्ट परिभाषेसह विसोबांच्या करवी नामदेवांपर्यंत पोहचला असावा. म्हणूनच नामदेवांच्या हिंदी-मराठी अभंगवाणीत आणि नानकदेवांच्या मुखबानीत वीरशैव परिभाषा आढळते.' [३] विसोबांवरील नाथ व वीरशैवांचा संमिश्र परिणाम सांगणारा लोकमान्य प्रसंग म्हणजे औंढ्या नागनाथक्षेत्री झालेली नामदेव-विसोबा भेट (जिचा पुढे विचार करणार आहोत.) विसोबांचे वीरशैवत्व सूचित करणारे अनेक उल्लेख शडुस्छळित येतात. ते साररूपाने असे :

विसोबांनी षड्लिंगे, षट्चक्रे आणि षट्स्थळे यांची सांगड घालताना वीरशैव तत्त्वकल्पनेचे सूक्ष्मविवेचन केलेले आहे. खेरीज विश्वाचे सर्जन, पालनादी परशिवाची पंचकृत्ये, त्याच्या इच्छेनुरूप पंचमहाभूते, पंचतन्मात्रे आदींनी निर्माण होणारी 'अंगतत्त्वे' इत्यादी वीरशैव तत्त्वकल्पना विसोबा अत्यंत सुबोधपणे, सूत्रात्मकतेने मांडतात. त्यासाठी त्यांनी वीरशैवांच्या प्रमुख धर्मग्रंथाचे 'सिद्धांतशिखामणी'चे चिंतन-मनन सूक्ष्मतेने केले होते हे सांगणारे अनेक दुवे उभय ग्रंथांचा तौलनिक विचार करता जाणवतात. असा स्वतंत्र अभ्यास मी अन्यत्र मांडलेला आहे. [४] या चिंतनामुळेच बाह्यलिंगधारणा, कर्मकांडापेक्षा विसोबा अंतर्लिंग धारणेवरच अधिक भर देतात. त्यामुळेच त्यांना षट्स्थलातील विशिष्ट पारिभाषिक संज्ञा वापरणे विशेष महत्त्वाचे वाटत नाही. तत्कालीन स्थितीचा विचार करता षट्स्थल विचारामुळे

'क्रिया आणि जो धर्मु । आचार ज्ञानाचा तो सर्वोत्तमु ।
जेणे करूनि हरेल श्रमु । अज्ञानपणाचा ॥' (शडु. २५४)

असा ठाम विश्वास ते व्यक्त करतात.

वीरशैवांच्या वीर, नंदी आदी पंचगोत्रांची आणि वीरभद्र, नंदिकेश्वरादी पंचगोत्रपुरुषांचीही सूक्ष्म माहिती असल्याची साक्षही या ग्रंथातून मिळते. खेचर विसांना पंचाचार्य परंपरेप्रमाणेच 'विरक्त परंपरेचीही' सूक्ष्म माहिती आहे. या माहितीला पूरक ठरणाऱ्या भावंडीबाईच्या (मराठीतील पहिली ज्ञात संतकवियित्री) अभंगांचाही स्वतंत्र विचार करता येतोच [५] या ग्रंथाप्रमाणेच विसोबांचा वीरशैव परंपरेशीही साक्षात् संबंध असावा असेही दाखविता येते. ह्यासाठी प्राधान्याने विचार करावा लागतो तो नामदेवगाथेचा आणि गुरुदीक्षाप्रसंगाचा.

## ॥ विसोबा आणि वीरशैवपरंपरा ॥

विसोबा आणि नामदेव यांची पहिली भेट झाली ती 'औंढ्या नागनाथ' या पाशुपतांच्या प्रभावक्षेत्री. शिवपिंडीवर पाय ठेवून झोपलेले विसोबा किंवा त्यांचे पाय ठेवू तेथे शिवपिंडी उत्पन्न होणे या मिथकाच्या आधारे मराठी जनमानसाने हा प्रसंग आजही जपलेला आहे. या मिथकाच्या मुळाशी जाता किंवा विसोबांच्या या लोकविलक्षण आचारकृतीचा मागोवा घेता काय आढळते ? संवेदनाक्षम लोकमनाचा, श्रद्धावंत समाजाचा विचार करता विसोबा या प्राचीन शिवक्षेत्री शिवलिंगावर पाय ठेवून झोपण्याचे धाडस कसे करू शकले असा प्रश्न कोणाही सूज्ञ व्यक्तीस पडावा. त्याचे एक उत्तर त्या काळात हे पाशुपतक्षेत्र वीरशैवांचे प्रभावक्षेत्र आहे. पण त्यापेक्षाही महत्वाचे कारण वीरशैव तत्त्वकल्पनेत दडलेले आहे. वीरशैव तत्त्वकल्पनेनुसार सच्चिदानंद, सर्वशक्तिमान आद्यंतरहित परशिवाचे एक सगुण रूप 'शंकर' आहे. परशिवाच्या सर्वव्यापकतेमुळे आणि त्याला इष्टलिंगातही बद्ध केल्यामुळे वीरशैव संप्रदायात पार्थिव शिवपूजेला विशेष महत्त्व नाही. साहजिकच अशी पार्थिव शिवमंदिरे यांनाही महत्व दिले गेले नाही. (अर्थात् शिवमंदिरे, शिवमूर्ती यांना कोणी उपद्रव देत असल्यास प्रसंगी वीरवृत्तीने त्याचा प्रतिकार करावा. त्यासाठी मृत्यू आला तरी चालेल असेही आवर्जून सांगितलेले आहे.) इष्टलिंगधारणेमुळे मंदिरातील शिवास कंठी धारण करून देव व भक्त यांच्यामधील मध्यस्थच नष्ट करीत वीरशैवांनी धर्मक्षेत्रात अभिनव क्रांती केल्याचे मतही ध्यानात घ्यावे. आपल्या ग्रंथात 'ऐसा पंचमुखी विस्तारु । विस्तारला असे दूरवरू । तोचि तो स्वये संकरु । प्रगटला असे ॥' (शडु. १२४) असे म्हणत या परशिवाचेच वर्णन करतात.

ही तात्त्विक पार्श्वभूमी ध्यानात घेता नामदेव-विसोबा यांच्या अपूर्व भेटीची संगती लावता येते. त्यामागे नाथसंप्रदायाद्वारे मिळणारे योगसामर्थ्य, गुरुपरंपरेचा आधार आणि वीरशैव संप्रदायाचाही अभ्यास आहे, हे जाणवते. अर्थात् हा चमत्कार प्रसिद्धीसाठी, विकृतीतून केलेला स्टंट नाही तर एका संवेदनक्षम, सामर्थ्यसंपन्न परंतु आत्मतत्त्वाचा शोध

घेणाऱ्या सच्छिष्यासाठी आणि व्यापक लोककल्याणासाठी केलेला जालीम, काहीसा लोकनिंदेचाही वाटणारा प्रयोग आहे. सद्गुरुंच्या या आगळ्या-वेगळ्या कृतीमुळेच नामदेवांना सर्वव्यापक परमेशाचे दर्शन घडले असावे. आयुष्याच्या उत्तरकाळात नामदेवांनी मानवताधर्म विसरणाऱ्या आक्रमकांच्या प्रभावक्षेत्री - वायव्य भारतात जाऊन जे धर्मजागरण केले, लोकांमध्ये आत्मविश्वास निर्माण केला, त्या कर्तृत्वामागे विसोबांची प्रेरणा निश्चितच आहे. विठ्ठलाचे मुखदर्शन घेतल्याशिवाय ज्याचा दिवस उजाडत-मावळत नव्हता असा देववेडा भक्त अनेक वर्षे विठ्ठलदर्शनाशिवाय सुदूर पंजाबात राहू शकतो, एवढेच नव्हे तर 'प्रस्तराचा देव बोलला भक्तांते । सांगते ऐकते मूर्ख दोघे ॥' (नाम. १३६९.५) असा स्वतःच्याच पूर्वानुभूतीला छेद देणारा अभंग लिहू धजतो याचे श्रेय विसोबांच्या या लोकविलक्षण उक्तीकृतीला निश्चितच आहे. परंतु परंपरामान्य अशा घटनांकडेच नेमके आपले दुर्लक्ष होते आणि या घटना दंतकथाच उरतात.

आपल्याला 'पदपिंड विवर्जित' करणाऱ्या सद्गुरुंबद्दल नामदेवरायांना विलक्षण आदरभाव आहे. परंतु ते आपल्या गुरुकृपापर अभंगात मात्र जाणिवपूर्वक सांकेतिकता बाळगतात. असे का घडले असावे याचे उत्तर शोधताना वाटते, शिष्य म्हणून नामदेवराय जितके थोर आहेत तितकेच लोकसंघटक म्हणून त्यांचे जनसामान्यांशी असणारे नातेही प्रभावी आहे. साहजिकच एकीकडे व्यक्तिगत श्रद्धाभाव व दुसरीकडे व्यापक जनहित याचा सूक्ष्म संघर्षही त्यांच्या मनात असावा. त्यामुळे गुरुभेटीनंतर 'दैवत बुद्धीचा त्याग' झाला तरी त्यांच्या मनातील 'श्रीरंग' त्यांना काही सूचनाही देतो. हा श्रीरंग म्हणजेच नामदेवांचे दुसरे जागृत मन. या सूचनांमध्येच गुरुकृपापर अभंगातील सांकेतिकता दडलेली आहे. (अ. क्र. १३४५). 'ज्यावरी गुरुची प्रीति । त्याची अनन्यभावे कीजे भक्ती ।

आज्ञेवाचोनि कल्पांती । विरोध कोणासी न करावा ॥' (नाम. १३४५.३६)

श्रीरंगाचे हे म्हणणे मान्य करीत नामदेवांनी आपल्या वीरशैव गुरुंबद्दल सांकेतिकता / मौन धारण करणे स्वीकारले. अर्थात् हे करताना नामदेवांच्या मनात कोठेतरी खंत निश्चितच आहे. नामदेवगाथेतून ती प्रगटतेही. परंतु संयमाने. कारण त्यामागेही एक इतिहास आहे. नामदेवांचे श्रद्धास्थान पंढरी मूळचे शिवपीठ. 'लोहदंड क्षेत्र' हे त्याचे प्राचीन नाव. त्या क्षेत्रीचे शैवत्व अनेक अभ्यासकांनी मान्य केलेले / सिद्धही केलेले. या संदर्भात डॉ. माणिक धनपलवार यांना उपलब्ध झालेल्या कान्हा त्रिमलदासाच्या 'पुंडलिकाख्यान' या काव्याची अभ्यासकांना आठवण व्हावी. मूळच्या या शैवक्षेत्राचे वैष्णव प्रभावक्षेत्रात परिवर्तन झाल्यामुळे महाराष्ट्रात शैव-वैष्णव वाद निर्माण झाला नाही तरी विशिष्ट सांप्रदायिक संतांपलीकडे अन्य सांप्रदायिक सत्पुरुषांच्या वाट्याला उपेक्षा आली. त्यामुळे मराठी सांस्कृतिक / वाङ्मयीन इतिहास एकारला गेला, हे कटू सत्य विसरता येत नाही. या साऱ्याची जाणीव नामदेवांना निश्चितच असल्याची साक्ष त्यांच्या अभंगांद्वारे देता येते. प्रसंगी 'धोंडा घडोनिया देव त्याचा केला ।' किंवा 'धोंडा, पाण्याविण नाही देव कोठे । होता सान मोठे तीर्थक्षेत्र ।' असा भाव ते व्यक्त करतात. या संदर्भात 'मुक्तपण आम्हा नको देवराया ।' हा सर्वज्ञात अभंग उल्लेखनीय ठरावा. परंतु त्यातील 'भावापाशी देव उभा सर्वकाळ । खेचराने बळे दाखविला ॥ नामा म्हणे मज सद्गुरुची सत्ता । आम्हासि मुक्तता नको बापा ॥' (नाम. १५११.४, ५) याकडे मात्र बहुतेकांचे दुर्लक्ष होते.

बदलणारे संदर्भ, मानसिकता यामुळे आज विसोबांचे वीरशैवत्व दुर्लक्षित झाले असले तरी खेचर विसांचे कार्य वीरशैव सांप्रदायिकांना मान्य असावे याचे पुरावे सांप्रदायिक श्रद्धा व ग्रंथ यातून मिळतात. बार्शीचे विश्वनाथ वा विश्वेश्वर जंगम म्हणजेच खेचर विसा असण्याची शक्यता वीरशैवाचार्य प. पू. परंडकर स्वामीजी (रेवणसिद्ध शिवाचार्य) व्यक्त करतात. बार्शी हे आजही वीरशैव संप्रदायाचे नांदते क्षेत्र आहे. किमान पंधरा वीरशैवमठ तेथे आजही सुस्थितीत आहेत. विसोबांनी नामदेवांना विस्ताराने उपदेश करण्यासाठी आणि पुढे समाधीसुखासाठी निवडलेले क्षेत्र बार्शीच आहे. आजही विसोबांची समाधी तेथील उत्तरेश्वर मंदिरात सुस्थित आहे. पंचाचार्य परंपरेतील स्वामी मन्मथ यांच्या जीवनात बार्शीला विशिष्ट स्थान आहे. मन्मथ स्वामींना वीरशैव संप्रदायात 'माऊली' याच नावाने ओळखतात. या परंपरेतील सत्यात्मजाच्या 'वीरशैवधर्मनिर्णय टीका' या ग्रंथाला किंवा पंचाक्षरीस्वामींच्या 'शिवरहस्य' ग्रंथाला शिव-कार्तिकेय संवादाची असणारी बैठक, मन्मथस्वामींच्या आणि पुढे समर्थ रामदासस्वामींच्या ग्रंथामध्ये विशिष्ट वाक्य, शब्द पुनरुक्त करण्याची शैली मुळात येते ती शडुस्थळि ग्रंथात. हे सारे वीरशैव अनुबंध काही केवळ योगायोगाचा भाग असावा काय ?

खेचर विसा आणि विसोबा खेचर यांच्यातील अद्वैताचा महत्त्वाचा पुरावा म्हणजे स्वतः नामदेवरायांचे अभंग. नामदेव स्वतःला 'पोरटा खेचरा'चा म्हणवून घेतात. (१३८३). नामदेव हे आपल्या शब्दांबाबत काटेकोर असणारे. त्यांच्यातील कुशल संघटक गुरुंचाही उल्लेख सांकेतिकतेने जाणिवपूर्वक करतो. परंतु नामदेव आपल्या सद्गुरुंचा उल्लेख सातत्याने (अ. क्र. १३५२, ५३, ५५, ५६, ५७, ५८, ६०, ते ६९ आणि ७२) 'खेचर विसा'च असा करतात. केवळ दोनच ठिकाणी अ. क्र. १३४९ व १३५३ या अभंगांमध्ये 'विसोबा खेचर' असा शब्दप्रयोग येतो. यातून उभय नामातील अद्वैत व्यक्त व्हावे.

उपरोक्त अभ्यासातून मिळणारे निष्कर्ष असे नोंदविता येतील :

- खेचर विसा / विसोबा खेचर हे यादवकाळातील गूढ व्यक्तिमत्त्व असले तरी 'शडुस्थळि' ग्रंथाधारे आणि वीरशैव परंपरेचा विचार करता त्यांच्याबद्दलचे गूढ काही अंशी निश्चितच दूर करता येते.
- या ग्रंथामुळे विसोबांच्या भ्रांतिपूर्ण गुरुपरंपरेवर प्रकाश पडतो. तद्वतच वीरशैवांशी विसोबांचे असणारे आंतरिक नातेही सूचित करता येते. ग्रंथनामापासूनच येणारा षट्स्थल सिद्धांत, अन्य वीरशैव तत्त्वसंकल्पना वीरशैव पंचगोत्रादींची माहिती, सिद्धांतशिखामणीचा सूक्ष्म अभ्यास, वीरशैव प्रभावक्षेत्रांशी त्यांचा असणारा दृढ संबंध आदींचा विचार करता आजवर वारकरी

संप्रदायाशी निगडित असलेले किंवा तसे दाखविले गेलेले विसोबा वीरशैव पंथाचे दीक्षित असल्याची साक्ष पटते.

- अल्लमांनी सूत्ररूपाने सांगितलेले, गोरक्षनाथांनी विस्ताराने विशद केलेले 'गुरुमुख', 'मनमुख' तत्त्व विसोबांनी गुरुपरंपरेद्वारे नामदेवांमार्फत सुबोध भाषेत जनसामान्यांपर्यंत पोहचविले. म्हणूनच नामदेवांच्या हिंदी-मराठी अभंगवाणीत आणि नानकदेवांच्या मुखबानीत वीरशैव परिभाषा आढळते.
- आपल्या संवेदनाक्षम, सामर्थ्यसंपन्न आणि आत्मतत्त्वाचा शोध घेणाऱ्या सच्छिष्यासाठी व व्यापक लोककल्याणासाठी विसोबांनी शिवपिंडीवर पाय ठेवण्याची लोकविलक्षण कृती केली. त्यामागे विशिष्ट वीरशैव तत्त्वज्ञानाचा अभ्यास व प्रभाव आहे. सद्‌गुरुंमुळेच व्यापक ईश्वरीतत्त्वाची जाण झालेले नामदेव उत्तरायुष्यात वायव्य भारतात जाऊन लोकजागृतीचे, समाजसंघटनाचे कार्य करू शकले. हे करताना सांकेतिकतेचा अवलंब करणाऱ्या मोजक्या अभंगांची त्यांनी निर्मिती केली. हे घडले ते विसोबांच्या प्रसिद्धीपराङ्मुख / संयमी स्वभावामुळे आणि नामदेवांच्या सजग लोकशिक्षणामुळेच. गुरुमाहात्म्य गाणाऱ्या साऱ्याच सांप्रदायिकांना गुरुंचा हा संयम आणि शिष्याचे अनोखे धैर्य प्रेरणादायी ठरावे.
- मूळच्या शैवक्षेत्र असणाऱ्या पंढरीचे वैष्णवक्षेत्रात झालेले परिवर्तन मराठी भूमीला शांती-समाधान देऊ शकले असले तरी त्यामुळे विशिष्ट सांप्रदायिक संतांपलीकडे अन्य सत्पुरुषांच्या वाट्याला मात्र उपेक्षाच आली. स्वतःला 'खेचराचा पोरटा' म्हणविणारे उत्कट गुरुभक्त नामदेव आपल्या गुरुंचा सतत 'खेचर विसा' असाच उल्लेख करतात. आपली योगानुभूती 'पदपिंडविवर्जित केला नामा' अशा खास वीरशैव परिभाषेत सांगणारे नामदेवराय गुरुकृपापर मोजके व सांकेतिक अभंग लिहितात किंबहुना त्यांना ते तसे लिहावे लागते. तेव्हा ही घटना नामदेवांच्या संयमी, सहिष्णु वृत्तीचे प्रतिक आहे. महाराष्ट्राची समन्वयशीलता आहे किंवा संबंधित संप्रदायाच्या जेतेपणाचे द्योतक आहे किंवा सांप्रदायिक अवस्थेचे चिन्ह आहे याचे उत्तर मिळणे अवघड आहे. एक निश्चित नामदेवगुरु विसोबांचा दृढ संबंध वीरशैव संप्रदायाशी होता किंवा ते वीरशैव होते असा ठोस निष्कर्ष काढता यावा.

संदर्भ :


१) ढेरे डॉ. रा. चिं., 'चक्रपाणि', विश्वकर्मा साहित्यालय, पुणे १९७७.

२) ढेरे डॉ. रा. चिं., 'गुरुमाऊली', पुणे १९८९.

३) कामत डॉ. अशोक, 'संत नामदेव जीवन आणि हिंदी-मराठी काव्य पुनर्विचार', टंकलिखित प्रबंध, पुणे विद्यापीठ, १९७८, पृ. ७४-७५.

४) प्रस्तुत लेखिकेचा शोधनिबंध, 'सिद्धांतशिखामणि की षट्स्थलसाधना और खेचर विसाकृत शडुस्छळ' जंगमवाडी मठ, वाराणशी येथील सिद्धांतशिखामणी व शैवागमावर आधारीत चर्चासत्र, दि. १५.१०.९७ ते १७.१०.९७.

५) प्रस्तुत लेखिकेची प्रबंधिका, 'मराठी वीरशैव संतकवियित्री भावंडीबाई' संत नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, मार्च १९९६.



प्रा. डॉ. श्यामा घोणसे
आबासाहेब गरवारे महाविद्यालय, कर्वे रोड, पुणे ४.


## देवा सूर्य नारायणा

कळीकळीने फुलावे पाना फांद्यांनी डोलावे
नाना फुलांच्या गंधाने वायुसंगे दर्वळावे ॥
नदी निर्झराने वहावे थंडगार झुळझुळ पाणी
मुखी प्राशन करिता समाधान दाटे वदनी ॥
पाणी जगाचे जीवन लाभलेले वरदान
पाणी मिळेनासे होता कंठी येति पंचप्राण ॥
मातीतुनी अंकुरावी फळे फूले वृक्षराजी
ऊन थंडी सोसूनीया ओतिताती धान्यराशी
चंद्रफूल उमलावे नील आकाश वेलीला
त्याची चंदेरी किरणे प्रकाशती अवनीला ॥
चांदण्यांची ती आरास लक्ष मोगरा फूलला
भूदेवीने माळीयेली त्याची एक शुभ्रशी माला ॥
अवनीवरी चांदण्याचा शुभ्र सदा शिंपीयेला
फुलाफुलांचा गालीच्या मऊ मऊ पसरीला ॥
आहे जगाचा पोशिंदा एक सूर्य नारायण
साऱ्यांचाही जीवन दाता करी तोच हे निर्माण ॥
असा सूर्य निसर्गाचा फुलवीतो नित्य मळा
रात्रंदीन चालू आहे खास असा हा सोहाळा ॥
रोज उठता सकाळी सूर्य मनी आठवावा
आणि त्याचे दर्शन होता कृतज्ञता अर्ध्य द्यावा ॥
देवा सूर्य नारायणा सांभाळीसी प्राणी मात्र
तुझ्या हाती आहे खास सकलांचे जीवनसूत्र ॥


सौ. कमला ना. दातार
१६१३ सदाशिव पेठ, टिळक रोड,
गोपाळ गायन समाज रस्ता, पुणे ३०

# नामदेवांच्या गौळणी

ॐ गो. श्रीदत्तोपासक

एम फिल (संस्कृत)

गेली १० वर्षे नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ येथे संशोधन सहाय्यक. बारा विषयांत १५ शोध प्रबंधिका पूर्ण. निरनिराळ्या मासिकांत १७ लेख प्रसिद्ध. पुणे आकाशवाणी केंद्रावर ७ लेखन संभाषण कार्यक्रम. शंकराचार्यकृत विवेकचूडामणि आणि यादवकालीन मराठी संत या विषयावर पी.एच.डी. प्रबंध सुरू. (संशोधन सहाय्यक, संत नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ.)

हिंदु धर्मात आबालवृद्धांच्या मनावर विलक्षण मोहिनी घालणारे दैवत म्हणजे श्रीकृष्ण ! त्याचे चरित्र म्हणजे त्याच्या जन्मापासूनच अनेक वेधक घटनांची मालिका होय. शैशवातील खट्याळ क्रीडा करणारी त्याची लोभस मूर्ती बालकांची मने वेधून घेते. गोपींसमवेत शृंगारचेष्टा करणारी त्याची यौवनमूर्ती तरुण हृदयाला वेड लावते. कंसवधापासून कुरुक्षेत्रावर पांडवांना युद्धाचे कुशल मार्गदर्शन करणारी त्याची पराक्रमी मूर्ती वीरांच्या मनाचा ठाव घेते. युद्धभूमीवर किंकर्तव्यमूढ अवस्थेत निष्क्रिय झालेल्या अर्जुनाला कर्तव्याभिमुख करण्यासाठी गीतेचा उपदेश करणारे त्याचे आगळे व्यक्तिमत्त्व तुम्हा-आम्हा सांसारिकांच्या आयुष्याचा आधार ठरते.

श्रीकृष्ण हा अन्य दैवतांप्रमाणे ईश्वराचा अंशावतार नसून त्याचा पूर्णावतार आहे. तो साक्षात् परब्रह्म आहे. श्रीविष्णूच्या प्रसिद्ध दशावतारांपैकी हा आठवा अवतार. भारतात सर्वत्र त्याच्या वेधक चरित्राचे गायन अनेक प्रतिभासंपन्न कवींनी मुक्तकंठाने केले आहे. प्राचीन ग्रंथांपैकी व्यासांच्या भागवत आणि हरिवंश या दोन ग्रंथात श्रीकृष्णाचे चरित्र प्रथम पाहावयास मिळते.

नामदेवांच्या श्रीकृष्ण चरित्रावर भागवत पुराणाची बरीच छाया दिसते. त्यांच्या कृष्णकथेचा थाट आख्यानाचा असल्याने प्रारंभ गणपती, सरस्वती इत्यादींना वंदन करून नंतर त्यांनी श्रीकृष्णाची प्रार्थना केली आहे. त्यानंतर वसुदेव-देवकी यांच्या विवाहापासून प्रत्यक्ष कथेचा आरंभ होतो. वेणुवादन, बालक्रीडा इत्यादी प्रसंगांच्या वर्णनात नामदेवांच्या कवित्वाचा स्वतंत्र आविष्कार दिसून येतो. कात्यायनी व्रतासारखा प्रसंग तर नामदेवांनी भागवतापेक्षाही संक्षेपाने वर्णिलेला दिसतो. वृंदावनातून श्रीकृष्णाच्या मुरलीचा मंजुळ ध्वनी कानी पडताच तिथे जाण्यासाठी गोपींची जी धांदल उडते ती भागवतातील वर्णनाशी अगदी जुळणारी आहे. तसेच श्रीकृष्ण गुप्त होऊन एका विशिष्ट गोपीबरोबर निघून जातो, ही नामदेवांनी वर्णिलेली रासक्रीडेच्या प्रसंगातील घटनाही भागवताच्या दहाव्या स्कंधातील तिसाव्या अध्यायात असलेली दिसते. श्रीकृष्ण निघून गेल्यामुळे विरहाकुळ झालेल्या गोपींचा विलाप नामदेवांनी आर्त भावनेने वर्णिला आहे. श्रीकृष्णाच्या मथुराप्रयाणाच्या वेळचा गोपींचा शोकही त्यांनी सहृदयतेने व्यक्त केला आहे. श्रीकृष्ण मथुरेला गेल्यामुळे दुःखी झालेल्या गोकुळाच्या सांत्वनासाठी उद्धव जेव्हा येतो तेव्हा सर्व गोपी कृष्णाचे कुशल विचारून त्याला आपली विरहगाथा सांगतात. अक्रूराने असेच येऊन श्रीकृष्णाला गोकुळातून नेलेले असते, म्हणून उद्धवाची सुद्धा त्यांना शंका येऊ लागते. भ्रमराला उद्देशून त्या उद्धवाला खूप औपरोधिक बोलतात. हिंदी साहित्यात सूरदास, नंददास इ. कृष्णकवींनी हा प्रसंग 'भ्रमरगीत' म्हणून फार बहारीने रंगविला आहे. या प्रसंगावरचा नामदेवांचा एकच अभंग आहे. पण तो उत्कृष्ट आहे. श्रीकृष्णावरील गोपींच्या अतीव प्रेमामुळे त्याने दिलेल्या विरहतापाची चीड नामदेवांनी या अभंगातून अगदी तीव्रपणे व्यक्त केली आहे. भागवतात राधेचा उल्लेख पुसट आढळतो. परंतु नामदेव तिचेही विलास शब्दांकित करतात. गोपींना कृष्णदर्शनाची वाटणारी उत्कंठा, त्याच्या मीलनाने झालेला आनंद, त्याच्या विरहातून निर्माण झालेली तगमग इत्यादींचेही नामदेव अगदी रसाळ वाणीने रेखीव वर्णन करतात. नामदेवांनी गौळणी, विरहणी, पाळणे, जाते, बागुल, हुंबरी, कुरनी, धेनू इ. अनेक लोकगीतांच्या रचना करून श्रीकृष्णाच्या लीलांची जी रसाळ वर्णने केली आहेत, ती तर खरोखरच चिरंतन ठसा उमटविणारी आहेत. त्यांच्या या रचनांमधून त्यांच्या काव्यवाणीचे माधुर्य, भाषेचे सहजसौंदर्य, वर्णनातील चित्तवेधकत्व प्रकर्षाने जाणवते. उदाहरणादाखल आपल्या परिचयाची पुढील गौळण पहा -

परब्रह्म निष्काम तो हा गौळिया घरी ।  
वाक्या वाळे अंदु कृष्ण नवनीत चोरी ॥  
म्हणती गौळणी हरीची पाउले धरा ।  
रांगत रांगत येतो हरी हा राजमंदिरा ॥  
लपत छपत येतो हरी हा राजभुवनी ।  
नंदासी टाकुनि आपण बैसे सिंहासनी ॥  
सांपडला देव्हारी यासी बांधा दाव्यांनी ।  
शंख चक्र गदा पद्म शारंगपाणी ॥  
नामा म्हणे केशवा, अहो जी तुम्ही दातारा ।  
जन्मोजन्मी द्यावी तुमची चरणसेवा ॥ (अ. क्र. २४३)

शब्दांच्या कृत्रिम रांगोळ्या न काढता रचना किती सहजतेने आविष्कृत झालेली आहे, हे पहाण्यासारखे आहे. 'हरिची पाउले धरा' या शब्दातून हा खोड्या करून पळतो म्हणून याला धरा व भवसागर तरुन जाण्यासाठी याचे पाय धरा अशा दोन्ही प्रकारचे अर्थ निघू शकतात.

देहुडा चरणु वाजवितो वेणु । गोपिकारमणु स्वामी माझा ॥  
देखिला गे माय यमुनेच्या तीरी । हात खांद्यावरी राधिकेच्या ॥  
गुंजावर्ण डोळे शिरी बाबर झोटी । मयूर पिच्छ वेटि शोभतसे ॥  
सगुण मेघःश्याम लावण्य सुंदर । नामया दातार केशवराज ॥ (४५५)

देहुडा चरण ठेवून श्रीकृष्ण यमुनेच्या तीरी वेणू वाजवित आहे. त्याचा एक हात राधेच्या खांद्यावर आहे. डोळे लाल आहेत. डोक्यावर मोरपिस खोवलेले आहे. अशा प्रकारचे चित्र आपल्या डोळ्यांसमोर लगेच उभे रहाते. ही गौळण म्हणजे चित्रमय काव्याचा एक उत्कृष्ट नमुनाच आहे. किंबहुना मी तर असे म्हणेन की, चित्रमयता ही नामदेवांच्या गौळणींची एक 'खासियत' आहे. 'रात्र काळी घागर काळी । यमुनाजळे ही काळी वो माय ॥' या अभंगातून नामदेव 'कृष्णरंगाचे' सौंदर्यच जणू आपल्यासमोर उलगडून दाखवितात.

तळवे तळहात टेकीत । डाव्या गुडघ्याने रांगत ॥
रंगणी रंगनाथ । तो म्यां देखिला सये ॥ (२४५)

या गौळणीतून आपल्याला तळवे टेकवून डाव्या गुडघ्याने रांगणाऱ्या, एका हातात लोण्याचा गोळा असलेल्या, चुंबन घेताना तोंडाला लोण्याचा परिमल येणाऱ्या बाळकृष्णाचे दर्शन घडते. मराठी, कानडी, हिंदी, कोकणी, गुजराती अशा पाच भाषांचा समावेश असलेली नामदेवांची 'गौळणी ठकविल्या' ही भिन्न भाषी गौळण प्रसिद्ध आहे. श्रीकृष्णाने आपली वस्त्रे द्यावीत म्हणून या गौळणी आपापल्या भाषेत त्याची विनवणी करतात. यातून नामदेवांची बहुश्रुतता दिसून येते.

बाळ सगुण गुणाचे तान्हे गे । बाळ दिसते गोजिरवाणे गे ।
काय सांगता गाऱ्हाणे गे । गोकुळीच्या नारी ॥ (२६५)

या गौळणीतून यशोदा आपला श्रीकृष्ण कसा चांगला आहे, हे सांगते. त्याचबरोबर गौळणींनी श्रीकृष्णावर केलेल्या आरोपांचेही निराकरण करते आहे. हृद्य अशा या रचनेतून मातृप्रेमाचे दर्शन घडते.

यशोदे घराकडे चाल मला जेवू घाल ॥ ध्रु ॥ (२४४) या रचनेमधून श्रीकृष्ण यशोदेला 'मला जेवू घाल' असे सांगतो आहे. सकृतदर्शनी असे वाटते की श्रीकृष्णाला फार काही नको. पण तसे जर असते तर तो श्रीकृष्ण कसला ? त्याला पुरणपोळी हवी मग तो गुळासाठी अडवणार नाही. तूप लावून भाकरी हवी, वांग्याचे भरीत हवे शिवाय कांद्याची कोशिंबिरी पाहिजे. खडीसाखरेचे खडे, वडे, मांडे, दह्याचा मठ्ठा हे सर्व पदार्थ त्याला हवे आहेत. उपरोक्त दोन रचना बऱ्याच जणांनी आपल्या लहानपणी ऐकल्या असतील. श्रोत्यांचे बालपण त्यांच्या मनःचक्षुसमोर उभे करण्याचे विलक्षण सामर्थ्य या रचनेत आहे. गड्यांनो राजा की रे झाला । कृष्ण सिंहासनी बैसला ॥ (२४२) निवडी आपली गोधने कान्होबा निवडी आपली गोधने ॥ (२९१) या रचनाही अशाच सहज, सरस आहेत. गौळण, यशोदा, पेंद्या अशा निरनिराळ्या व्यक्तींच्या तोंडून नामदेव श्रीकृष्णाचे खोडकर रूप आपल्यासमोर उभे करतात.

रूपे श्यामसुंदर निलोत्पल गाभा ।
सखिये स्वप्नी शोभा देखियेली॥
नेत्र विशाल भाल दंत हिरया ज्योती ।
बाईये मदनमूर्ति देखियेला ॥ (२८१)

अशा मनोहर श्रीकृष्णाचे ध्यान गौळणींना लागले आहे. अशीच एक गौळण दही-दूध विकण्यासाठी म्हणून निघाली.

मस्तकी ठेवोनिया डेरा । करू निघाली विकरा ।
साच करितसे पुकारा । म्हणे गोविंद घ्या वो ॥ (२८०)

परंतु 'दही-दूध घ्या' असे म्हणण्याऐवजी ती 'गोविंद घ्या' असे ओरडू लागली. लोकांना नवल वाटले. काहीजण तिच्याजवळ आले व तिला म्हणू लागले, 'दाखव तरी आम्हाला श्रीकृष्ण ! कसा काय तो तुझ्या डेऱ्यात सामावला ?' तेव्हा कुठे ती गौळण भानावर आली. परंतु श्रीकृष्णाने तिची लाज राखली.

बाळा भरूनियां बाळा । देखे श्रीरंगु सावळा ।
वेधी वेधल्या सकळां । गोपी गोविंदासवे ॥

ज्ञानदेवांनी 'दुडीवरी दुडी गौळणी साते निघाली । गौळणी गोरसु म्हणो विसरली ॥' (६११) व तुकारामांनी 'कोणी एकी भुलली नारी । विकता गोरस घ्या म्हणे हरी ॥' (३८००) या गौळणीतून वरील घटनाच रंगविली आहे. नामदेवांची गौळण ही तपशील पुरविणारी व प्रत्ययकारी आहे.

एकूणच नामदेवांच्या गौळणी या सुगम व चित्रमय आहेत. त्यातून भक्तीची विविध उत्कट रूपे दृक्गोचर होतात.

**टीप :** नामदेवांच्या अभंगांचे क्रमांक शासकीय गाथेतील आहेत. ज्ञानदेव-तुकारामांच्या अभंगांचे क्रमांक आवटे गाथेतील आहेत.

ॐ गो. श्री. दत्तोपासक
श्रीदत्त-विठ्ठल मंदिर, ३३ मंगळवार पेठ, पुणे ४११ ०११.

## 'सायुज्यमुक्ती'

मुक्ती मिळावी चौथी आता नको पुन्हा जन्म
मुक्ती मिळाया प्राप्त पाहिजे आत्म्याचे ज्ञान
ज्ञान व्हावया प्राप्त पाहिजे देवाचे प्रेम
भगवंताचे प्रेम देतसे विवेक-वैराग्य
वैराग्यासह विवेक येई ज्ञानमार्गातून
ज्ञानाकरिता अंगी असावा दैवी सत्वगुण
सत्वगुणाचे देणे देते मरणाचे स्मरण
स्मरण मृत्युचे सतत देतसे भक्ती निष्काम
ऐशी भक्ती कशी करावी ? जिथे नसे स्वार्थ
संत सांगती आयु वेच तू देवाधर्मार्थ ॥

**सौ. मंजिरी कुलकर्णी**
अटल सोसायटी, १/५ बिबवेवाडी रोड, पुणे ३७.
फोन : ५१०२१६

# संत ज्ञानदेव आणि संत नामदेव

**डॉ. वि. म. बाचल**

एम. ए. (इकॉ.),
एम. एम. (पॉलिटिक्स.) पी.एचडी.,
जी. डी. आर्ट

माजी प्राचार्य फर्ग्युसन कॉलेज. कुलगुरु टिळक महाराष्ट्र विद्यापीठ. निरनिराळ्या सामाजिक संस्थांवर संचालक. नियतकालिके व वर्तमानपत्रांत लेख.

नामदेव, कबीर, त्रिलोचनु सधना, सैनु तरे ।

कहि रविदास सुनहु रे संतहु
हरि जिऊ ते सभै सरै
निमत नामदेऊ दूध पिलाइआ ।
तऊ जग जनम संकट नहि आइया ॥

संत रोहिदास यांचे हे पद आहे. 'अमृतसर' या शीखांच्या तीर्थक्षेत्राची स्थापना करणाऱ्या शीखांचे चौथे गुरु रामदास यांनी अन्य भगवद्‌भक्तांच्या बरोबरीने संत नामदेवांचा गौरव केला आहे. संत नामदेवांच्या नंतर दोनशे वर्षांनी शीख धर्मसंस्था संत नानक यांचा काळ येतो. गुरुनानक आणि त्यानंतरच्या सर्व शीख गुरूंनी संत नामदेवांच्या कार्याचा गौरव केला आहे. संत नामदेवांचे बासष्ट अभंग (शबद) गुरुग्रंथात समाविष्ट आहेत. यावरून त्यांचे महत्त्व लक्षात येते.

तसे पाहिले तर एक हजार वर्षांपूर्वी उत्तर भारताच्या सीमावर्ती प्रदेशांमधून भारतावर परकीयांची, विशेषतः मुस्लिमांची आक्रमणे झाली. या आक्रमणांचा पहिला आघात सिंध-पंजाब या प्रदेशांनी झेलला. आक्रमण इतके जबरदस्त होते की त्यांनी आमच्या संस्कृतीलाच आव्हान दिले. या संकटाशी सामना देण्यासाठी या सीमावर्ती प्रदेशात जसे वीर युयुत्सु निर्माण झाले तसेच आध्यात्मिक प्रवृत्तीचे साधु-संतही निर्माण झाले.

संत नामदेवांनी उत्तर भारताची पहिली यात्रा केली ती संत ज्ञानदेवांच्या बरोबर आणि तीसुद्धा ज्ञानदेवांच्या खास आग्रहास्तव. किंबहुना श्रीविठ्ठलाची साथसंगत सोडण्यास तयार नसलेले परमभक्त संत नामदेव हे भागवत धर्माचा प्रचार आणि प्रसार करण्यासाठी खरे प्रचारक ठरतील हे ओळखून संत ज्ञानदेवांनी हा आग्रह केला आणि तो सार्थ ठरला.

संत ज्ञानदेवांच्या समाधीनंतर संत नामदेवांनी उत्तर भारताच्या यात्रा केल्या आणि विशेषतः पंजाबात वीस वर्षे वास्तव्य केले. तेथे त्यांना भगत त्रिलोचन, बाबा बहोरदास विष्णुस्वामी, केशो कलाधारी यांच्यासारखे पंजाबी शिष्य मिळाले. हे शिष्य समाजाच्या सर्व स्तरांमधून आले होते. महाराष्ट्रात संत नामदेवांबरोबर समकालीन संत सावतामाळी, गोराकुंभार, चोखामेळा इत्यादी विविध जातींतील संतांची मांदियाळी उभी राहिली तशी पंजाबातही लाभली.

या शिष्यांनी अज्ञान, दारिद्र्य आणि शोषण यांचा निःपात करण्याचा संदेश दिला. संत नामदेवांनी जे जीवनदर्शन दिले त्यामध्ये त्यांनी जातीपातीची बंधने तोडा, माणसामाणसातील भेदभाव नष्ट करा, अहंकाराचा त्याग करा असा संदेश अभिप्रेत होता. संत नामदेवांच्या साखी आणि अभंगामध्ये, भजनांमध्ये ही गोष्ट प्रकर्षाने लक्षात येते. आजही शीख बंधूंच्या आदिग्रंथाचा नित्यपाठ करणाऱ्या हजारो भाविकांच्या पठणामध्ये हे जाणवते. आदिग्रंथाचे लेखन पंजाबी भाषेच्या गुरुमुखी लिपीत झाले आहे आणि विशेष म्हणजे काश्मीरची शारदा, कांगडाची टाकरी, प्राचीन मध्यप्रदेशाची नागरी या लिपींच्या समन्वयातून आदिग्रंथाच्या गुरुमुखी लिपीचा उदय झालेला आहे. शीखांचा आदिग्रंथ मध्यकालीन भारतीय धार्मिक वाङ्मयाचा ज्येष्ठ-श्रेष्ठ ग्रंथ मानला जातो.

आपल्या ज्ञानेश्वरीला जे मराठी सारस्वतात स्थान आहे ते शीखांच्या आदिग्रंथाला स्थान आहे. उत्तर भारतात उदात्त विचारांचा प्रचार आणि आचार करणारे संत नामदेव आद्य हिंदी प्रचारक होत. भारतीय एकात्मतेचे ते प्रतीक होत. संत नामदेवांनी धर्मप्रसारांची योजनाशील बैठक तयार केली. उत्तर भारतात बहुतेक प्रांतांत संत नामदेवांची प्रभावचिन्हे, नामदेव-मंदिरे, नामदेव-मठ, नामदेव-गुरुद्वारे आढळतात. या प्रदेशातील सर्वसाधारण जनता श्रद्धेने संत नामदेवांची जीवनगाथा कीर्तन-प्रवचन रूपाने ऐकते, ऐकवते आणि सुखावते. त्यांच्या मराठी मिश्रित हिंदी अमृतवाणीचा (आपल्याकडील ज्ञानेश्वरीच्या पारायणासारखा !) आदराने नित्यपाठ होत असतो.

संत नामदेवांच्या कार्यामुळे काशी-प्रयागच्या परिसरात संत कबीर प्रभावित झाले. गुर्जर प्रदेशात संत नरसी मेहता प्रोत्साहित झाले. पंचनद्यांच्या पंजाबात संत नानकांना उत्तेजन मिळाले आणि अशा प्रकारे उत्तर भारताच्या भक्ति-आंदोलनाचे संत नामदेव हे आदि-गुरु बनले. अर्थातच प्रश्न निर्माण होतो -

संत ज्ञानदेवांच्या आग्रहामुळे संत नामदेव उत्तर भारतात गेले आणि प्रभावी झाले. तसे ते गेले नसते तर महाराष्ट्राची भागवत परंपरा महाराष्ट्रापुरतीच मर्यादित राहिली असती काय ?

वारकरी संप्रदायाचे श्रीविठ्ठल, श्रीपंढरीनाथ हे आद्यदैवत. या विठ्ठलाला संत नामदेवांनी उत्तरेत विशिष्ट स्थान मिळवून दिले. ते म्हणतात -

बीठलु भैला काई करऊ । इभै बीठलु, उभै बीठलु,
बीठलु बिनु संसारु नाही । नामेचे सुआमी बीठलो ।
तिऊ नामे मनी बीठुला । बाप बीठुला बाह दे ।
मेरो बापु माधऊ तू धन कैसो । सावला ओ बिठुलाइ ले ॥

(तीर्थ विठ्ठल, क्षेत्र विठ्ठल किंवा सावळ्या विठ्ठला तुझ्या दारी आले.) या पंक्ती काय दर्शवितात ? संत नामदेवांच्या 'श्री ज्ञानेश्वरांची समाधी' या अभंगसंहितेमधून श्रीज्ञानेश्वरांच्या कार्य-कर्तृत्वाची, श्रीज्ञानेश्वरांच्या भावंडांच्या भावजीवनाची प्रचीती येते. श्रीनामदेव महाराजांनी माऊलींच्या समाधी-सोहळ्याचे केलेले वर्णन इतके चित्ररूप, भावगर्भ आणि सर्व तपशीलांसह केले आहे की, माऊलींचा तो समाधीसोहळा

आपण साक्षात पाहात आहोत, अनुभवत आहोत असे भाविकांना वाटू लागते. या समाधी-अभंगामधून त्यांनी करुण, उदात्त आणि भक्ति या रसांचा उत्कर्ष तर साधला आहेच परंतु त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे श्रीज्ञानेश्वरांची भव्योदात्त व्यक्तिरेखा, त्यांचा अध्यात्मक्षेत्रातील थोर अधिकार, त्यांच्या भावंडातील एकरूप भावपूर्ण जीवन, त्यांच्या समकालीन संतजनांच्या ओझरत्या व्यक्तिरेखा स्पष्ट होतात. नारा, विठा, गोंदा आणि महादा या नामदेव महाराजांच्या चारी मुलांनी समाधीची जागा झाडून स्वच्छ केली होती. भागीरथीचे जल संतांनी आणून ठेवले होते. निवृत्तिनाथांना वंदन करून श्रीज्ञानदेव म्हणतात :

पाळिले पोसिले चालविला लळा । बा माझ्या कृपाळा निवृत्तिराजा॥ श्रीज्ञानेश्वरांचे हे बोल ऐकून 'वोसंडोनि निवृत्ति आलिंगो लागला । आणिकांच्या डोळा अश्रू येती - अशी - नामा म्हणे संत कासाविस सारे। लाविती पदर डोळीयांसी ॥' अशी शोकमय अवस्था होते. निवृत्तिनाथांच्या शोकाचे वर्णन करताना श्रीनामदेव म्हणतात - 'बांधल्या तळ्याचा फुटलासे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ॥ बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळा पांगलेसे ॥ हरिणीविण खोपी पडयेली ओस । दशदिशा पाडसे भ्रमताती ॥ नामा म्हणे देवा पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचे ॥' समाधीच्या जागी शिळा बसविल्यानंतर श्रीनामदेव आक्रंदतात - नामा म्हणे आता लोपला दिनकर । बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ॥

श्रीज्ञानदेव आणि श्रीनामदेव यांच्यातला जिव्हाळा व्यक्त करणारे अधिक समर्पक शब्द असू शकतात काय ?

डॉ. वि. म. बाचल
शिप्रा सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

# संत नामदेव व संत रामदास एक तौलनिक अभ्यास


सुनील चिंचोलकर

बी.कॉम.

१२ वर्ष१९७६-८८ सज्जनगड येथे व्यवस्थापक. १४ पुस्तके प्रकाशित. शिवचरित्र व श्रीसमर्थ रामदास स्वामी व वारकरी संप्रदायावर रंगीत स्लाईडस्, महाराष्ट्र व बाहेर प्रचार दौरे.

अध्यात्माच्या प्रसारासाठी ज्ञानेश्वरी, दासबोध, गीता वगैरेंवर महाराष्ट्र व बाहेर प्रवचने.


**साधू दिसती वेगळाले । परि ते स्वरूपी मिळाले ।**

संत रामदास आणि संत नामदेव यांच्या तत्त्वज्ञानाची तुलना करणे हे प्रस्तुत लेखाचे प्रमुख प्रयोजन आहे. तुलना करण्याच्या दोन पद्धती आहेत. एका पद्धतीनुसार ज्या दोन्हींची तुलना करावयाची त्यातील फरक दाखवायचा. दुसऱ्या पद्धतीनुसार ज्या दोन्हींची तुलना करावयाची त्यांच्यातील साम्य दाखवायचे. प्रस्तुत लेखात संत रामदास आणि संत नामदेव यांच्या साम्य स्थळांवर प्रकाशझोत टाकला आहे. दोन संतांच्या तत्त्वज्ञानातील फरक हा बहुतांश अभिव्यक्तीतील फरक असतो आणि काही अंशी तत्कालिन सामाजिक व्यवस्थेचा तो भाग असतो. मूलभूत सिद्धांताच्या बाबतीत सारेच संत एकाच सत्याचे प्रतिपादन करीत असतात. सन १८९३ साली झालेल्या शिकागो येथील धर्मपरिषदेत स्वामी विवेकानंद यशस्वी झाले याचे प्रमुख कारण म्हणजे सारे धर्म एकाच सत्याप्रत जातात, हे त्यांनी प्रतिपादन केलेले तत्त्वज्ञान होय. जर एका विशिष्ट धर्माचे समर्थन ते करीत राहिले असते तर त्यांच्या विचारांच्या विशालतेला आणि व्यापकतेला बांध घातला गेला असता. संत रामदास आणि संत नामदेव यांची तुलना करताना त्यांच्यातील वैचारिक भिन्नतेची चर्चा करणे म्हणजे मनाच्या विशालतेला सीमा घालण्यासारखे होईल. तसेच देशकालपरत्वे दिसून येणारा फरक अपरिहार्य म्हणून स्वीकारणे पोषक ठरेल. 'साधू दिसती वेगळाले । परि ते स्वरूपी मिळाले । अवघे मिळोनि येकचि जाले । देहातीत वस्तू ।।' हे रामदासांचे वचन या दृष्टीने चिंतनीय आहे.

**रामदासांची विठ्ठलभक्ती-नामदेवांची रामभक्ती**

रामदास स्वामींनी स्थापन केलेल्या समर्थ संप्रदायाचे आराध्य दैवत श्रीराम होते, तर संत ज्ञानेश्वरांनी स्थापन केलेल्या वारकरी संप्रदायाचे आराध्य दैवत विठ्ठल होते. दैवते भिन्न असली तरी सारेच संत अभेद भक्तीचे पुरस्कर्ते असल्याने सर्वांचीच भूमिका समन्वयाची होती. सारे वाद किंवा सारे कलह हे अनुयायांच्या अनुभवशून्य सांप्रदायिक कट्टरतेतून निर्माण होतात. समर्थ रामभक्त असूनही पंढरपूरला विठ्ठलाने त्यांना रामरूपाने दर्शन दिले. त्या प्रसंगी त्यांनी लिहिलेला 'येथे उभा का श्रीरामा' हा अभंग प्रसिद्ध आहेच. तसेच 'निरजर वर स्मरहरधर भीमातीरवासी' ही त्यांनी केलेली विठ्ठलाची आरती प्रसिद्ध आहे. समर्थांची खालील सवाई दर बुधवारी सज्जनगड व चाफळ येथे आजही म्हटली जाते -

'नाम विठ्ठल सुंदर । ब्रह्मा विष्णु आणि हर ।
गुणातीत निर्विकार । शुकादिकी गायिला ।। १ ।।
चंद्रभागा रम्य तीर । तेथे उभा कटिकर।
दिंड्या पताका अपार । यात्राघोष जाहला ।।२।।
तेथे येतां रामदास । दृढ श्रीरामीं विश्वास ।
रूप पालटोनी त्यास । रामरूपीं भेटला ।। ३।।
पुन्हा विठ्ठलरूप । रामविठ्ठल येकरूप ।
पूर्वपुण्य हें अमूप । लक्ष पायी ठेविल्या ।।४ ।।'

समर्थांनी विठ्ठलावर अनेक अभंग केले आहेत. संत नामदेवांनी देखील रामभक्तीने भरलेले अनेक अभंग लिहिलेत, विस्तारभयास्तव येथे एकच अभंग देतो -

श्रीराम सोयरा आला माझ्या घरा ।
दिधला म्यां थारा हृदयी माझ्या ।।१ ।।
पावलों विश्रांति धाले माझे मन ।
न लगे आता ध्यान शिकावया ।। २ ।।
ज्यासाठी हिंडणे जटामौन नग्न ।
धरिले तेणें ठाणें हृदयी माझ्या ।। ३ ।।
योग याग तप करावें साधन ।
तोहि जाण ओठीं सदा वसे ।। ४ ।।

नामदेवांनी व रामदासांनी त्यांना समकालीन असणाऱ्या व पूर्वीच्या बहुसंख्य देवतांच्या व संतांच्या आरत्या केलेल्या आहेत, यातून खूप शिकण्यासारखे आहे.

**दोघेही अद्वैतवादी**

रामदास आणि नामदेव हे दोघेही अद्वैत वेदांताचे पुरस्कर्ते होते. निर्गुणवाद हे आध्यात्मिक जगतातील अंतीम सत्य दोघांनी अनुभवले होते. संत नामदेव म्हणतात

: 'ब्रह्मी ब्रह्म एक मुळीं नाही जग । सर्व माया योग कल्प जाणा।
स्थावर जंगम सर्व मायोपाधि । जाण पा त्रिशुद्धि आत्मज्ञानें ।।
रवीच्या किरणे जैसें मृगनीर । तैसें ब्रह्मी कीर विश्व जालें ।।
नामा म्हणे याची ऐका निज खूण । स्वरूपी तल्लीन होनि राहे ।'

संत रामदास म्हणतात -

'दृष्टीसि दिसे मनासि भासें । तितुके काळांतरीं नासे ।
म्हणोनि दृश्यातीत असे । परब्रह्म तें ।।
ते परब्रह्म धुंडावें । विवेक त्रैलोक्य हिंडावें ।।
माईक, विचारें खंडावें - । परीक्षवंतीं ।।'

याचा अर्थ दृश्यविश्व म्हणजे माया हे नाशिवंत असून, परब्रह्म हेच अंतिम सत्य असून, याच देही आणि याच जन्मी त्या सत्याचा साक्षात्कार करून घेणे व मन स्वरूपानुसंधानात ठेवणे हे अंतिम सत्य दोघांनीही प्रतिपादन केले आहे. माया ही पुरातन आहे, अहंकार हेच

मायेचे स्वरूप आहे. देहबुद्धी हा परब्रह्म प्राप्तीतील सर्वात मोठा अडथळा आहे. या बाबत दोघांचेही एकमत आहे. आत्मज्ञानावाचून सारे सायास व्यर्थ आहेत हे सांगताना नामदेव म्हणतात -

'कांसवीचीं पिलें पोशिलीं कृपेनें । तैसा पैं आत्मज्ञानें सुखी झाले ॥
नामा म्हणे खूण अनुभवीं जाणें । परब्रह्मत्वी पाहाणें केशव चरण ॥ १ ॥'

समर्थ रामदास म्हणतात -

'न जाणतां कोटीवरी । साधनें केली परोपरीं ।
तरी मोक्षास अधिकारी । होणार नाहीं ॥
माया ब्रह्म वोळखावें । आपणास आपण जाणावें ।
इतुक्यासाठी स्वभावें । चुके जन्म ॥'

अशा प्रकारे अध्यात्मातील अद्वैतवादाच्या ज्या मूलभूत संकल्पना आहेत त्याबाबत दोघांमध्ये शब्दशः एकवाक्यता आहे. निर्गुण ब्रह्ममध्ये केवळ संकल्पाने दृश्यविश्व निर्माण झाले ही नामदेवांच्या अभंगातील कल्पना रामदासी वाङ्मयात अनेक ठिकाणी आढळते.

## आणि तरीही सगुणाचे पुरस्कर्ते

सामान्य माणसाला परब्रह्माच्या स्वरूपाचे आकलन होत नाही. म्हणून मूर्तीपूजा किंवा सगुणोपासना अपरिहार्य मानली आहे. रामदास आणि नामदेव हे दोघेही अद्वैतवादी असूनदेखील ज्या सत्याचा आपणास साक्षात्कार झाला आहे ते सत्य जनसामान्यापर्यंत पोहोचवावे व त्यासाठी मूर्तीपूजेची कास धरावी असे दोघांनाही वाटते. 'तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल। देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल ॥' या अद्वैतबोधाचा साक्षात्कार झाल्यानंतरदेखील नामदेवांनी 'निर्गुणपणाचा अभिमान सांडिला । निर्गम लाजविला नारायण ॥' आणि सगुणभक्ती करताना - 'स्फुंदस्फुंदोन नामा उभा महाद्वारी । चित्त पायावरीं विठोबाच्या ॥ उभा दीनानाथ उभारोन बाहे । पालवीतु आहे पीतांबरें ॥ आरता ये नाम्या धरितां पोटाशीं । कोणें गांजिलासि दुराचारें ॥' समर्थ रामदासांना देखील 'नभी वावरे जो अणुरेणु काही । रिता ठाव या राघवेवीण नाही ॥' या अद्वैतबोधाचा साक्षात्कार होऊन देखील 'रघुनाथ भजने ज्ञान जाले । रघुनाथ भजने महत्त्व वाढले । म्हणोनिया तुवा केले । पाहिजें आधीं॥' असाच त्यांचा आग्रह होता. दोघांनी सगुणभक्ती आणि निर्गुणभक्ती यांचा समन्वय साधला. समर्थ रामदासांची अशी दृढ श्रद्धा होती की, 'सगुणाचेनि आधारे । निर्गुण पावीजे निधरि ॥' म्हणून 'सगुण रक्षुन निर्गुण बोलज जावे' असे ते प्रवचनकारांना सांगत अन्यथा 'सगुण नेले संदेहाने । निर्गुण नेले ब्रह्मज्ञानें ॥' असे होऊन दोन्हीकडे साधकाची फजिती होईल. नामदेव म्हणतात - 'निर्गुण गुणासी आलें । परब्रह्म ठसविलें । भक्त पुंडलिका लाधलें । गौप्य केले प्रगट ॥ निर्गुण गुणाकार। मूर्ती सांवळी सुंदर । सकलही गुणांचे माहेर । मुक्तिपेठ पंढरी ॥' अलिकडे सगुणाच्या मतांचा उच्छेद करून निर्गुणाचे प्रतिपादन करण्याचा उद्योग अनेक विद्वान मंडळी करतात. परंतु निर्गुणीचे वैभव आले भक्ति मिषे । तें हें विठ्ठलवेषें ठसावले॥' या नामदेवांच्या अभंगांचे स्मरण ठेवून सगुण भजावे अन्यथा निर्गुणाच्या मायाखाली अहंकारांची जोपासना होत रहाते.

## नवविधा भक्ती अन् सद्गुरु

'श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यं आत्मनिवेदनम् ॥' हा भागवतातील श्लोक उद्धृत करून समर्थ रामदासांनी नवविधाभक्तीचे नऊ समास लिहिले. संत नामदेवाने देखील नवविधाभक्तीसंबंधी पन्नास पाऊणशे अभंग लिहिले आहेत. 'शहाणे करावे जन । पतित करावे पावन । सृष्टीमध्ये भगवद्भजन । वाढवित जावे ।' ही समर्थांची ओवी संत नामदेवांच्या 'नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञान दीप लावू जगी ॥' या अभंगाशी मिळतीजुळती आहे. 'चहुवर्णा नामाधिकार । नामी नाही लहान थोर ॥' किंवा 'नित्यनेम प्रातःकाळी । माध्यानकाळी सायंकाळी। नामस्मरण सर्वकाळी । करीत जावें ॥' हे रामदासांनी नामस्मरण भक्तीचे केलेले वर्णन नामदेवांच्या खालील अभंगाशी मिळतेजुळते आहे :

'काळवेळ नसे नामसंकीर्तनीं । उंच नीच योनी हेंही नसे ।
धरा नाम कंठी सदा सर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ॥
नामा म्हणे फार सोपें हे साधन । वाचें घेणें नाम इतुकेची ॥'

परमार्थामध्ये मतामतांचा गलबला खूप असल्यामुळे ईश्वरप्राप्तीसाठी सद्गुरुची आवश्यकता आहे. याबाबतीत दोघांचेही एकमत होते. 'सद्गुरुविण जन्म निर्फळ । सद्गुरुविण दुःख सकळ । सद्गुरुविण तळमळ । जाणार नाही॥' किंवा 'सद्गुरुविण ज्ञान काही । सर्वथा होणार नाही ॥' किंवा 'न जाणोन कोटीवरी । साधने केली परोपरी । तरी तो मोक्षास अधिकारी । होणार नाही ॥' व नामदेवांचा खालील अभंग एकाच आशयाचे आहेत : 'सद्गुरुवाचूनि नाम नये हातां । साधन साधिंता कोटीगुणें ॥ जैसा कांतेविण करणे संसार । तैसा हा व्यापार साधनाचा । जव सद्गुरु नाही केला प्रतार । साधन विचार व्यर्थ गेला । नामदेव म्हणे सद्गुरुपासोनी । नाम घ्या जाणोनी नाना काहीं ॥' समर्थांनी बालपणीच रामरायाकडून अनुग्रह घेतला तर नामदेवांनी विसोबा खेचर यांच्याकडून अनुग्रह घेतला.

## भारत भ्रमण अन् मनास उपदेश

भारतभ्रमण किंवा तीर्थयात्रा हे संत नामदेव आणि समर्थ रामदास यांच्यातील साम्याचे अलौकिक उदाहरण आहे. दोघांनीही आपल्या तीर्थावळींचे वर्णन अभंगाद्वारे केले आहे. समर्थांचे 'तीर्थावळी' हे प्रकरण संक्षिप्त आहे. मात्र संत नामदेवांनी आपल्या तीर्थयात्रेचे वर्णन सविस्तर केले आहे. कै. शं. दा. पेंडसे यांनी लिहिलेल्या, 'राजगुरु रामदास' तसेच 'संत नामदेव' या दोन्ही चरित्र खंडात दोघांच्या तीर्थयात्रेचे जे वर्णन केले आहे त्यावरून दोघांनी हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत पायी भ्रमण केले होते असे दिसते. ज्या तीर्थस्थानांना संत नामदेव जाऊन आले त्या सर्व ठिकाणी रामदास जाऊन आले. दोघांनी तीर्थयात्रेच्या माध्यमातून लोकसंग्रह करून समाज संघटन केले.

मनुष्य दुसऱ्याला उपदेश देण्यात पटाईत असतो. परंतु रामदासांनी २०५ श्लोकांद्वारे आणि नामदेवांनी २५ अभंगाद्वारे स्वतःच्या मनासच उपदेश केला आहे. दोघांनी मनाला केलेल्या उपदेशात खूपच साम्य आहे. उदाहरणार्थ :

नामदेव : नको नको मना हिंडो दारोदारी ।
कष्ट झाले भारी वाया सिण ॥
रामदास : बहु हिंडता सौख्य होणार नाही ।

*समूळ साल माया सांडूनिया दिजे । परि अहंबीज जतन करा ॥ ३ ॥*
*ते बीज भाजोनि करा ओवाळणी । संतांचे चरणी समूळ देह ॥ ४ ॥*
*पुढे त्या बीजांची न करावी दुराशा । न धरावी आशा पुढिलांची ॥ ५ ॥*
*आहे नाही देह धरी ऐसा भाव । म्हणे जनी देव सहज होसी ॥६॥ अ. २५७'*

नश्वर देहानेच देवत्त्व गाठता येते हे जनाबाईनी स्वानुभवाने सांगितले आणि जीवनाकडे प्रेमाने बघण्यास सांगितले. 'ब्रह्म सत्यम्' हे अनुभवल्यानंतरही त्यांनी जगाला खोटे मानले नाही.

जनाबाईना वारकरी संतांच्या सहवासात राहायला मिळाले. या संतांमधील देवत्त्व त्यांनी जाणले. आपल्यालाही ते प्रतीत व्हावे म्हणून या वैष्णवांचा नामोल्लेख त्यांनी केला आहे.

*'वैष्णव तो कबीर चोखामेळा महार । तिजा तो चांभार रोहिदास ॥ १ ॥*
*सजण कसाई वाया तो कसाब । वैष्णव तो शुद्ध एकनिष्ठ ॥ २ ॥*
*कमाल फुलार मुकुंद जोहरी ॥ जिर्ती देवद्वारी वस्ति केली ॥ ३ ॥*
*राजाई गोणाई आणि तो नामदेव । वैष्णवांचा राव म्हणवितसे ॥ ४ ॥*
*त्या वैष्णवाचरणी करी ओवाळणी । तेथे दासी जनी शरीराची ॥ ५ ॥'*

विविध जातींचाही उल्लेख करीत जनाबाईनी वैष्णवधर्माचे सर्वसमावेशक रूप आपल्यापुढे उभे केले आहे आणि या रूपावर देहभाव विसरून प्रेम करण्यास सांगितले आहे.

जीवनातील बारीक-सारीक प्रसंगांना ओलावा देत जनाबाईची ही प्रेमगंगा वैष्णवधर्माच्या अपार सागरात रूपांतरित होताना दिसते.

सौ. स्मिता विनायक कुलकर्णी
संत नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे ७.



◀ संत नामदेव



वारकरी ▶



तैनांगुर ग्रामी बंदवासी येथील श्रीविठ्ठल रखुमाई मंदिरावरील प्रभावळी व संत मूर्तीचा देखावा

# पंढरीची वारी तैनांगुरी आली

**सौ. माया जोशी**

महाराष्ट्र मंडळ, तैनांगूर मंदिर, भजन मंडळ आदि अनेक सामाजिक संस्थांशी संबंध.

'क्लेशोऽधिकतरस्तेषां अव्यक्तासक्तचेतसां, अव्यक्ताही गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥' असे भगवंतांनी भक्तियोगाचे महत्त्व सांगताना गीतेत म्हटले आहे. निराकार, निर्गुण, अव्यक्त परमेश्वरस्वरूपाचे ध्यान करणे सामान्यांना क्लेशदायक असते व हे जाणूनच संत ज्ञानेश्वरांनी स्वतः ज्ञानयोगी असूनही भक्तिसंप्रदायाची किंवा वारकरी संप्रदायाची स्थापना महाराष्ट्रात केली. 'सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ।' हे त्यांनी लोकांना पटवून दिले तर तुकोबांनी 'तुज व्हावा आहे देव, तर हाचि एक उपाव' असे ठासून सांगितले. नामदेवांनी तर कीर्तनाचे रंगी नाचत नाचत हा भक्तीचा गुलाल पंजाबपर्यंत नेऊन उधळला.

खरे तर ह्या भक्तीची लाट ४ थ्या शतकात तमिळनाडूत झाली. वैष्णव संत आळवार व शैवसंत नायन्नार ह्यांनी हजारो - भक्तिपर पदे लिहून भक्तिमार्गास प्रतिष्ठा मिळवून दिली. ही भक्तीची लाट पुढे १२ व्या शतकात विठ्ठलभक्तीच्या रूपाने महाराष्ट्रात व कर्नाटकात लोकप्रिय झाली व उत्तरेत १५ व्या शतकात तुलसीदासांच्या रामभक्तीत तर सूरदासांच्या कृष्णभक्तीत परावर्तित झाली. या कलियुगात ह्याच कीर्तनभक्तीला पुन्हा प्रतिष्ठित करायला चेन्नई येथे एक सत्पुरुष झाले. त्यांचे नाव 'स्वामी हरिदास'. कली संकीर्त्य केशवम् म्हणजे 'कलियुगात कीर्तनभक्तीच तारेल' हे त्यांचे ब्रीदवाक्य होते. स्वामी हरिदास हे स्वामी ज्ञानानंदगिरींचे शिष्योत्तम. स्वामी ज्ञानानंद हे ज्योतिर्मठाचे शंकराचार्य शिवरत्नगिरींचे शिष्य. आपल्या गुरूंच्या स्मरणार्थ स्वामी हरिदासांनी 'नामसंकीर्तन मंडळी' ही संस्था ७ जुलै १९५९ रोजी स्थापन केली व त्याद्वारे संकीर्तनभक्तीचा प्रचार देश-परदेशात केला. ह्या संस्थेच्या शाखा देशात चेन्नई, मुंबई, कलकत्ता, नागपूर, जयपूर इ. ठिकाणी असून परदेशात अमेरिका, इंग्लंड, कॅनडा, मलेशिया इ. ठिकाणी आहेत.

स्वामी हरिदास हे उत्तम वक्ते, गायक व प्रवचनकार होते. त्यांचे अनेक भाषांवर प्रभुत्व होते. मराठीचा तर त्यांचा विशेष अभ्यास होता. त्याकरिता काही काळ ते आळंदीस राहिले होते. त्यांच्या कीर्तनातून मराठी संतजीवनाचे दर्शन व अभंग नेहमी येत. महाराष्ट्रातील वास्तव्यात पंढरपूरचा आषाढी-कार्तिकीचा उत्सव पाहून दुसरे पंढरपूर दक्षिणेत निर्माण करण्याचे एक भव्य स्वप्न त्यांनी उरी बाळगले. स्वामी हरिदास कुशल संयोजक होते. त्यांनी लगेच कांजीवरमहून ३० कि.मी. दूरवर तैनांगुर ग्रामी बंदवासी येथे एक प्रशस्त जागा घेऊन देवळाचे बांधकाम केले. हे देऊळ उत्तर-दक्षिण स्थापत्यकलेचा एक मनोरम आविष्कार आहे. बाहेरील रचना जग्गनाथपुरीसारखी असून आतील मूर्तीचे कोरीव काम, चांदीच्या दारावरील नक्षीकाम, दैवतांचे अलंकार, वस्त्रे, पूजासाहित्य हे सर्व दक्षिणेतील ऐश्वर्याचे व सौंदर्यदृष्टीचे प्रतीक आहेत. सर्व बांधकाम टेंपल आर्किटेक्चरचे नावाजलेले तज्ज्ञ श्री. मुथुय्या स्थपति ह्यांच्या देखरेखीखाली झाले असून आतील म्यूरल्स प्रसिद्ध तज्ज्ञ श्री. नटनम् ह्यांनी केली असून ती डोळ्यांचे पारणे फेडतात. पांडुरंग-रखुमाईची मूर्ती नितांत सुंदर असून त्यांच्यासमोर स्वामी हरिदासांना पंढरीस भेट मिळालेली एक छोटी विठ्ठलाची मूर्ती ठेवलेली आहे. स्वामी ज्ञानानंदगिरी व स्वामी हरिदास ह्यांच्या स्मरणार्थ 'वृंदावन मठ' ही इमारत बांधली असून अतिथींकरिता सुसज्ज खोल्या बांधलेल्या आहेत. मोठी वेदशाळा व डायनिंग हॉल आहे. सर्वांत महत्त्वाचा आहे तो 'नामसंकीर्तन हॉल' याच्या प्रवेशद्वारीच 'नाचू कीर्तनाचे रंगी ज्ञानदीप लावू जगी' म्हणणाऱ्या संत नामदेवांची उभी मूर्ती कोरलेली असून हॉलच्या आतल्या व बाहेरील भिंतीवर जास्त करून मराठी संतांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. जणु स्वामी हरिदासांनी मराठी संतांना वाहिलेली ही श्रद्धांजलीच आहे.

ह्या देवळाचे बांधकाम पूर्ण होत आले असताना २ वर्षांपूर्वी स्वामी हरिदासांनी रुद्रप्रयाग येथे जलसमाधी घेतली. त्यांचे कार्य ट्रस्टचे विश्वस्त व स्वामी नामानंदगिरी ह्यांनी पूर्ण केले. ९ फेब्रुवारी १९९६ रोजी मंदिराचा कुंभाभिषेक झाला. गेली २ वर्षे पंढरीचा आदर्श ठेऊन आषाढी एकादशीचा उत्सव मोठ्या थाटामाटात साजरा केला जातो. कांजीवरम ते तैनांगुर वारी काढण्यात येते. रोजची पूजाअर्चा, प्रदक्षिणा, भजन, कीर्तन ह्यामुळे सर्व वातावरण विठ्ठलमय झालेले असते. तो सोहळा पाहताना वाटते की, 'मदभक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद' असे म्हणणारा पंढरीचा राणा तैनांगुरीस तर वास्तव्याला आलेला नाही ना ?

सौ. माया जोशी
द्वारा श्री. अशोक जोशी, नं. १०, गोवर्धन स्ट्रीट,
रोयापटा, चेन्नई - ६०००१४.

# शीखांच्या गुरुग्रंथसाहेबातील नामदेवांची वाणी व त्यांचे पंजाबातील कार्य

**श्री. केशवचंद्र गंगाधर भडभडे**

बी. एससी.

६५ वर्षे थिऑसॉफिकल सोसायटीचे सक्रीय सभासद. ठिकठिकाणी थिऑसॉफिवर प्रभावी भाषणे. अध्यापन आवडीचा विषय, स्वेच्छेने शिक्षकी पेशा पत्करला. युवकांनी थिऑसॉफिचा सखोल अभ्यास करावा म्हणून प्रयत्नशील. विपुल लेखन, निस्वार्थीपणा, सेवाभाव व विनम्रता गुणविशेष. अंतःप्रज्ञा व अद्‌भूत बालक ही पुस्तके नुकतीच प्रसिद्ध झाली.

संत नामदेव यांचे नाव माहीत नाही असा मनुष्य अखिल शीख समाजात विरळाच. उत्तरेकडील नामदेव सांप्रदायी लोकांना नामदेवांची काव्यकृती म्हणजे हिंदी गाथाच वाटते. नामदेवांचे मराठी अभंग भाषाभिन्नत्वाने उत्तर भारतात समजणे कठीण. त्यांच्या हिंदी काव्यकृतीला 'भक्त नामदेवजीकी मुखवाणी' म्हणतात.

संत नामदेव ८० वर्षे जगले आणि त्यांनी उत्तर भारतातील दीर्घ वास्तव्यात पुष्कळच हिंदी पद्यरचना केली असली पाहिजे. मराठीतील त्यांची अभंग रचना जशी थोडीच उपलब्ध आहे तसाच प्रकार त्यांच्या हिंदी पद्यरचनेचा झाला असला पाहिजे.

संत नामदेवांची एकूण उपलब्ध हिंदी पदसंख्या १३० आहे. त्यापैकी गुरुग्रंथसाहेबात ६१ पदे आहेत. उरलेली ४९ पदे ग्रंथसाहेबात नसल्यामुळे नामदेव सांप्रदायिकांच्या व शीख समाजाच्या नित्य परिचयाची नाहीत.

अलीकडे काही हिंदी साहित्यिकांचे लक्ष या मध्ययुगीन संतांच्या काव्यकृतीकडे वेधल्यामुळे नामदेव, कबीर, नानक, सूरदास इत्यादी संतांच्या उत्तम काव्यरचना विश्वविद्यालयातील पाठ्यपुस्तकांतून समाविष्ट झाल्या. मध्ययुगीन सर्वच संतांच्या काव्यकृतीत एकूण पुष्कळच साम्य दिसते.

ग्रंथसाहेबातील भक्तांच्या काही पदांना निरनिराळ्या रागात बद्ध केले असूनसुद्धा अनेक गुरुद्वारांतून ती नुसती वाचली जातात. त्यात गायक कमी असतील. काही भक्तांची भजने शीख समाजाने तयार केली असून ती गाइली जातात व नामदेवांच्या काही पंक्तीही गाइल्या जातात.

महाराष्ट्राबाहेर जाऊन भागवत धर्मीय भक्तिमार्ग, वारकरी पंथ व विठ्ठल हे दैवत यांची माहिती उत्तरेकडच्या लोकांना देणारे नामदेव हे पहिलेच महाराष्ट्रीय संत.

विठ्ठल भगवानाबद्दलची पदे नामदेवांनंतर कबीर, नानक, गुरुअर्जुन देव, नरसी मेहता, मीराबाई या संतांनी आपल्या काव्यात गाइली आहेत. कबीर, सैना, रोहिदास, नानक, धन्नाजाट व नामदेवांचा पंजाबी शिष्य जल्लो सुतार हे संत पंढरीचे एकनिष्ठ वारकरी होते. नामदेवांनंतर उत्तरेकडील मोठमोठे संत पंढरपुरात येऊ-जाऊ लागले. कारण विठ्ठल हे दैवत अज्ञ व गरीब जातीतील भक्तांना सहज पावते अशा कथा संत नामदेवांनी उत्तरेकडील लोकांत आपल्या प्रेमळ रसवंती वाणीने लोकप्रिय केल्या होत्या. त्यामुळे उत्तरेकडील साधुसंतांचे थवे दक्षिणेकडे येत राहिले.

ततो निवृत्तः प्रायातः पश्यन् भीमरथी तटे ।

द्विभुजो विठ्ठलो विष्णुः भुक्ति मुक्ति प्रदायकः ।।

(पद्‌मपुराण, उत्तरखंड, गीतामाहात्म्य, षष्ठाध्याय ।)

बाबा पूरणदास यांनी 'जन्मसाखी श्रीस्वामी नामदेवजी' या गुरुमुखी किपीतल्या ग्रंथात, वि = उत्पत्ती, ठ = ठहरना (स्थिती), ल = नाश (लय). उत्पत्ती, स्थिती, प्रलय करणारा तो विठ्ठल अशी व्याख्या केली आहे.

विठ्ठल = विष्णु = विष्टल = विठ्ठलदेव अशी व्युत्पत्ती कै. वैजनाथ काशीनाथ राजवाडे इतिहासाचार्य यांनी प्रतिपादिली आहे.

ग्रंथसाहेबातील १६ संत, नामदेव, कबीर, नानक, जयदेव, त्रिलोचन, धन्नाजाट, रोहिदास, रामानंद, परमानंद, पीपाजी, सैन, भीखन, वेणी, शेखफरीद, सूरदास इत्यादी संतांत नामदेव सर्वांत प्राचीन व सूरदास सर्वांत अर्वाचीन. विठ्ठल नाव संत नामदेवांच्या वाणीतून उत्तर भारतात प्रथम पोचले हे वर सांगितले आहे.

**ग्रंथसाहेबातील संत नामदेवांची ६१ पदे.**

यातल्या काही पदांना रागात बद्ध केलेले आहे. इतरांना नाही. ७ वे पद राग गुजरी, ९ वे राग सोरटी, १२ वे राग धनाश्री, १८ तोडी, २० तिलंग, २२, २९ बिलावल, २८ गोंड, ३०, ३१ रामकली, ३४ माली गाउडा, ३५ बिठल (माधव) ३७ मारु, ३८, ४१, ४७ भैरऊ, ५३, ५५, ६० सारंग, ५६,५७ मल्हार, ५८ कानडा, ५९, ६१ प्रभाती यात अकाल पुरुषाने प्रत्येकात ब्रह्म लपवून ठेवले आहे. पण ती आत्मज्योती जाणणारे फार थोडे, असे म्हटले आहे.

भक्तश्रेष्ठ नामदेव यांचे स्थान भागवत धर्माच्या प्रतिष्ठापनेत संत श्रीज्ञानेश्वर माऊलीइतकेच महत्त्वाचे आहे. तरी त्यांच्या चरित्र व काव्यविषयक संशोधनाकडे विद्वानांचे फारसे लक्ष गेले नाही. म्हणून शक्य तितके साधार चरित्र लिहायला श्री. शंकर पुरुषोत्तम जोशी या महाराष्ट्रातील इतिहास संशोधकाने अथक परिश्रम करून आपल्या 'पंजाबातील नामदेव' या ग्रंथात ते संग्रहीत केले व त्याचबरोबर त्यांची संशोधित अधिकृत गाथाही प्रसिद्ध केली आहे.

**नामदेवांचा काळ :** 'प्रेम प्रबोध' या लेखकाने लिहिलेल्या अत्यंत

जुन्या नामदेव चरित्रातील हकीकती, महाराष्ट्रातील नामदेव चरित्राशी जुळणाऱ्या आहेत. त्यावरून महाराष्ट्रातील व पंजाबातील नामदेव एकच हे सिद्ध होते. श्री. जोशी यांनी आपल्या पुस्तकात (पंजाबातील नामदेव) ग्रंथसाहेबातील नामदेवांची हिंदी पदे मराठी भाषांतरासह दिली आहेत. (६१ पदे)

## शीखपंथाची स्थापना

संत नामदेवांचा काळ - इ. स. १२७० ते १३५०

गुरु नानकांचा काळ इ. स. १४६९ ते १५३९.

ग्रंथसाहेबाची निर्मिती पाचवे गुरु अर्जुनसिंग यांनी १५८१ ते १६०६ मध्ये म्हणजे संत नामदेवांनंतर सुमारे दोन शतकांनी केली. म्हणजे संत नामदेवांची हिंदी पद्यरचना गुरुग्रंथसाहेबांत २ शतकांनंतर प्रविष्ट झाली. आद्य नामदेवांची मराठी अभंगातील विचारसरणी ज्या हिंदी पद्यात आहे ती ग्रंथसाहेबातील पद्ये आद्य नामदेवांची आहेत व 'भक्त नामदेवांची मुखवाणी' या नावाने प्रसिद्ध आहेत हे वर सांगितलेच आहे.

नामदेवांचे पंजाबातील बहुतेक भक्त शिंपी आहेत. ते शीखांप्रमाणे जानवे घालतात, संध्या करतात, श्राद्धे करतात, विवाहादी मंगल कार्ये वैदिक पद्धतीने करतात. गळ्यात तुळशी माळा घालतात. एकादशी व्रत करतात.

## गुरुच्या शोधात नामदेव

आर्त भक्ताच्या अवस्थेपासून ज्ञानी भक्ताच्या अवस्थेपर्यंत नामदेवांचा विकास झाला. वेदज्ञानी, शास्त्रज्ञांनी, पुराणिक, हरिदास यांच्याकडून समाधान न झाल्यामुळे :

ऐसे विचारिता बहुत भागलो । म्हणून शरण आलो पांडुरंगा ॥
भयभीत झालो संसार करिता । नामा म्हणे आता तारि मज ॥
(सं. सं. गा. १६६४)

त्यामुळे पूर्वपरिचित अशा स्वानुभवी पुरुषाची त्यांना आठवण झाली आणि हृदयस्थ पांडुरंगाच्या प्रेरणेने विसोबा खेचरांना गुरु करण्याचे त्यांनी ठरवले.

## नामदेवांना गुरुपदेश व निर्गुणानुभूती

निर्गुणीचे वैभव आले भक्तिमिषे । हे विठ्ठलवेषे ठसावले ॥
चोविसा वेगळे सहस्त्रा आगळे । निर्गुणा निराळे शुद्धबुद्ध ।

ज्ञानस्वरूप परब्रह्म आहे म्हणूनच मराठी संत बुद्ध म्हणजे ज्ञानावतार मानतात. गुरु खेचरस्वामीनी नामदेवांना निर्गुणानुभूती देऊन निर्गुण ब्रह्म हेच विश्वरूपाने सगुण झाले असे 'अन्वयात्मक' ज्ञान दिले.

जेथे देव नसे तेथे माझे पाय । ठेवी बा 'अन्वय' विचारूनी ॥

असे संत विसोबा खेचर म्हणाले :

## तुकाराम, नामदेव पांडुरंग

जनतेस शिकवून शहाणे करण्याचे ध्येय संत तुकारामांनी आपल्या पुढे ठेविले होते. हे ध्येय ज्या साक्षात्काराने निश्चित झाले तो असा :

नामदेव केले स्वप्नामाजी जागे । सवे पांडुरंगे येऊनीया ॥ १ ॥
सांगितले काम करावे कवित्व । वाउगे निमित्य बोलों नको ॥२॥
माप टाकी सळे । धरिली विठ्ठले । या परोनी केले सावधान ॥ ३ ॥
प्रमाणांची संख्या सांगे शत कोटी ।
उरले ते शेवटी लावी तुका ॥ ४ ॥

या दृष्टांतात नामदेव व पांडुरंग स्वप्नात - म्हणजे (जागृत, स्वप्न) या उच्च भूमिकेवर भेटले असे नमूद केले आहे. त्या वेळी संत नामदेव जिवंत नव्हते. पंढरपूरच्या शिळामूर्तीत जो देव आहे तो खरा विठ्ठल.

## ग्रंथसाहेबातील संत मंडळी

यात ज्या भक्तांची वाणी-काव्य-कृती-समाविष्ट आहे त्यांची काव्यकृती इतरत्र पुष्कळ पसरलेली आहे.

यातील प्रमुख भक्तांचे गट - १- नामदेव, जयदेव, त्रिलोचन,

गट - २ - रामानंद, सैन, कबीर, रोहिदास, पीपा, परमानंद, धन्नाजाट, नानक

गट - ३ - भीरवन, शेखफरीद, वेणी, सूरदास

जयदेव, त्रिलोचन, संत नामदेवांच्या सहवासात दीर्घ काल होते व त्यांचे शिष्य झाले होते.

## विठ्ठल व गौतम बुद्ध एकच

अठ्ठावीस युगापासून चालू असलेल्या अधिकाराच्या व्यासपीठाचे हे नाव आहे. तो अधिकारी तुकारामांचा मार्गदर्शक होता. सिद्धसंघात प्रत्येक युगात अधिकारावर असलेला एक एक अधिकारी व्यास म्हणजे बोधिसत्त्व (पुढे बुद्ध होणारा) असतो. त्यापैकी अठ्ठावीस व्यास (कृष्णद्वैपायन) गौतम बुद्ध या नावाने बुद्ध झाले. बुद्ध झाल्यावर ते सगळे, व्यासाच्या गादीचा अधिकार सोडून निवृत्त होतात. त्यापूर्वी ते नवीन बोधिसत्त्व-व्यास-यांना ती सूत्रे देतात. काही कारणामुळे सध्याचे बुद्ध-गौतम पृथ्वीवरच राहिले. ते 'गोबी' समुद्रात अदृश्य रूपाने राहतात. त्या ठिकाणाला 'श्वेत दीप' हे नाव आहे. कालांतराने 'गोबी' समुद्र आटून गोबीचे वाळवंट राहिले. परंतु श्वेतदीपात भगवान गौतम बुद्धांचा अजून निवास आहे. श्वेतद्वीपावरून पांढरेपूर - पंढरपूर हे नाव आले. गौतम बुद्धांचा प्रभाव पंढरपुरात अजून आहे.

बुद्ध 'दीपंकर' हे पहिले बुद्ध. त्यानंतर २५ वे बुद्ध गौतम. दीपकरांच्या आधीचे तीन बुद्ध धरून गौतम बुद्ध हे २५ + ३ अठ्ठाविसावे. एकेक बोधिसत्त्व एक द्वापरयुगभर अधिकार पदावर असतात, अशी २८ द्वापरयुगे पृथ्वीवर झाली व २८ बोधिसत्व म्हणजे व्यास झाले. त्यापैकी २८ वे भगवान गौतमबुद्ध. संत एकनाथ म्हणतात : यालागी बौद्धरूपे पंढरी नांदसी । (एकनाथ गाथा आवटे क्र. ३९३२). दशावतारांची नावे देताना श्रीकृष्णानंतरचा अवतार बुद्ध न म्हणता एकनाथांनी विठोबा म्हटले आहे. हिंदू धर्माच्या गणनेप्रमाणे हल्लीचे व्यास-कृष्णद्वैपायन व्यास - हे २८ वे व्यास (चित्रावशास्त्री कृत भारत वर्षीय प्राचीन चरित्र कोष - व्यास नाव पहा.)

## कारण देहाचा नाश

मुकुंद राजांनी 'परमामृतात' नेणिवेच्या निरासे ' ।

कारण शरीर नासे ' । म्हणजे कारण देह विघटित होतो असे म्हटले आहे. बऱ्याच संतांनी यालाच 'लिंग देह' म्हटले आहे. थिऑसफीच्या वाङ्‌मयात कारणशरीरच म्हटले आहे. यालाच 'विज्ञानमयकोष'ही म्हणतात. इंग्रजीत (Causal body. Cause = कारण) म्हणतात.

(अन्नमय कोष, प्राणमय कोष, मनोमय कोष, विज्ञानमय कोष, आनंदमय कोष)

लिंगदेह भंग जव झाला नाहीं । तोवरी बा पाहीं मुक्ती कैची ?

गुरु सोडवी तात्काळ । गाठ लिंगदेहाची - ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरांनी गुरूला उद्देशून म्हटले आहे - लिंग-देह कमळाचा । पोटि वेंचु (मरण) तया चिद् भ्रमराचा ।। बंदिमोक्षु जयाचा । उदेला होय ।। समर्थांनी, उच्च दर्जाच्या पुरुषाचे, 'लिंगदेहासि विभांडले' असे म्हटले आहे. विभांडणे म्हणजे, फोडणे, छेदणे. म्हणजे अशा पुरुषाचा लिंगदेह फोडून टाकलेला असतो. लिंग देह विरविरलें । जनी म्हणे या विठ्ठले ।। त्यामुळे काय स्थिती झाली ? जनाबाई म्हणते - 'ऐसी विश्रांती लाधली।। आनंदकळा संचरली । तेथे सर्वांग सुखी झाले । लिंगदेह विसरले ।। त्या एकी-एक होता । दासी जनी नाही आता ।। त्यामुळे जनाबाईंचे वैयक्तिक मीपण नष्ट झाले. सृष्टीशी एकरूप झाल्याचा हा अनुभव असतो.

नामदेवांचा लिंगदेह गुरु विसोबा खेचर यांनी नष्ट केला. त्याचे वर्णन नामदेव करतात -

खेचरें खेचरी बुद्धि अगोचरी । नामा झडकरी देवो केला ।।
गुरुशिष्य झाले एकतत्त्व देखिले । देही देह निमले निज तत्वीं ।।
अहं सोहं भाव हारपल्या श्रुति । नामयाची तृप्ती खेचरी झाली ।।
तव पाहे भोवते तव लिंग नाही तेथे । आताचरण हे केऊते कोठें ठेऊं ।।?

आप-आपणचि हे सृष्टी शिवाची ** । आम्ही दोन्ही गुरुशिष्य झालो।

** (पहा - महाराष्ट्र सारस्वत आवृत्ती ४, पृ. १७० व मराठी वाङ्‌मयाचा इतिहास खंड १, पृ. ५९१)

सर्व सृष्टीत एकच तत्त्व आहे हे पाहिले, आणि माझा देह विसोबा खेचरांच्या देहात बुडाला. आणि दोघांचे देह त्या निजतत्त्वात बुडाले. मी तो ईश्वर आहे असा अनुभव आला. मग त्या स्थितीतून मी जेव्हा सभोवार पाहिले तेव्हा माझा लिंगदेह पूर्वीप्रमाणे तेथे नाही असे दिसले. विसोबांच्या अंतरंगात नामदेवांना समाधान मिळाले.

श्री. सी. जिनराजदास यांनी ही अनुभूती ग्रथित केली आहे. ते आंतरराष्ट्रीय थिऑसॉफिकल सोसायटीचे चवथे अध्यक्ष होते. 'बट धिस कॉजल बॉडी इनस्टेड ऑफ रिमेनिंग, व्हॅनिशेस. व्हेन द् प्युपिल फ्रॉम हिज बुद्धिक बॉडी, लुक्स् डाऊन ऑन द हायर मेंटल फ्लेम नो कॉजल बॉडी इज् देअर एनी लाँगर टु रिप्रिझेंट हिम्.' वरील दोन्ही अनुभव सारखे आहेत.

अध्यात्ममार्गावरचे साक्षात्कार संत सविस्तरपणे प्रकट करीत नाहीत. कारण त्यांना वास्तविक अनुभव अज्ञजनांपासून गुप्त ठेवायचे असतात. 'अंतर स्थितीचिया खुणा । अंतर्निष्ठ जाणती ।।' असे समर्थ रामदास स्वामी म्हणतात. म्हणजे त्याच योग्यतेच्या माणसांना ते समजावे. अयोग्य माणसांना ते समजू नयेत हा त्यामागचा हेतू असतो. माकडाच्या हातात कोलीत दिल्यास त्याचा तो विनाश करण्यासाठी उपयोग करील. ॲटमबॉंब सुरक्षित ठेवले आहेत. ते अतिरेक्यांच्या हातात पडल्यास सध्याच्या बॉंबस्फोटापेक्षा हजारो पटींनी विनाश होईल. ॲटमबॉंबमुळे हिरोशिमा, नागासकी संपूर्णपणे नष्ट झाले. सध्याचे ॲटमबॉंब त्यापेक्षा शेकडो पटींनी संहारक आहेत. म्हणून ते उत्पन्नच होऊ नयेत असा आग्रह. ॲटम बॉंबचा साठा करून ठेवलेले देश इतर देशांनी ते तयार करू नयेत याबद्दल आग्रही आहेत. कारण त्यांना इतर देश शक्तीशाली न होऊन आपल्या वर्चस्वाखाली राहावे हा हेतू. संत आपले अनुभव इतरेजनांना सांगत नाहीत. कारण ते अनुभव प्रत्येकाला स्वतःच मिळवावे लागतात व ते मिळवायच्या प्रक्रिया गुरुच त्यांना सांगतो व शिकवतो. व्यक्तिशः गुरु योग्य शिष्यालाच योग्य वेळी त्या प्रक्रिया सांगतो. असो. थोडे विषयांतर झाले. कारण असा प्रश्न एकदा एका साधकाने विचारला होता.

बुद्धिलोकातून जाणीव मनोलोकात उतरते तेव्हा कारणदेह पुनः नवीन तयार होतो व तो पहिल्या सारखाच असतो. मुंज झालेला बटु 'द्विज' म्हणजे दुसरा जन्म घेतलेला, असे म्हणतात याचे कारण वरीलप्रमाणे विघटित झालेला कारणदेह पुनः संघटित होतो याचे प्रतीक आहे. सगळे मुंज झालेले बटू खऱ्या अर्थाने द्विज होत नाहीत कारण मुंजीचा विधी हा केवळ प्रतीकमात्र असतो. पुढे कालांतराने तो बुद्धिलोकात (कारण देहाच्या म्हणजे उच्च मानसिक लोकांच्या पलीकडच्या वरच्या लोकांत) जायचा आहे हे सुचवण्यासाठी आहे.

*(आधार ग्रंथ :

१) 'पंजाबातील नामदेव' - ले. श्री. शंकर पुरुषोत्तम जोशी,

२) महाराष्ट्रातील संत व त्यांचे साक्षात्कार - ले. प्रा. राजाराम सखाराम भागवत - ठाणे. प्रकाशक, मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन गणेशवाडी, डेक्कन जिमखाना, पुणे ४.,

३) सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय 'परिशिष्ट - नं. २ ले. वा. ल. विपळोणकर, पुणे व राजाराम सखाराम भागवत, ठाणे. प्रकाशक, मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन, गणेशवाडी, डेक्कन जिमखाना, पुणे ४.')

४) सी. जिनराजदास कृत 'First Principles of Theroophy' आवृत्ती ५, पृ. ३३८.

केशवचंद्र गंगाधर भडभडे
'नयनतारा', गणेशवाडी, डेक्कन जिमखाना, पुणे ४११ ००४.

# नामा कहै त्रिलोचना

**डॉ. वामन रामचंद्र अंतरकर**

एम. ए., एल. एल. बी. पी.एचडी

प्रबंध - श्रीमत् आद्य शंकराचार्यांचा जीवनवृत्तांत. २३ वर्षे खालसा कॉलेज येथे संस्कृत व अर्धमागधीचे प्राध्यापक. ३ पुस्तके प्रसिद्ध.

१३ व्या शतकात महाराष्ट्रात मोठमोठ्या संतांची एक मांदियाळीच निर्माण झाली. त्यात श्रीज्ञानेश्वरांसारखे अवतारी संत होते तर श्रीनामदेवांसारखे तयार झालेले संत होते. हे सर्वच संत पंढरपुरच्या विठोबाचे थोर भक्त होते. परंतु श्रीनामदेवांची विठ्ठलभक्ति जरा आग्रही किंवा हट्टी स्वरूपाची होती व म्हणून कै. प्रा. सोनोपंत दांडेकर त्यांना 'दांडाईत भक्त' म्हणत असत. त्यांचा उत्तर हिंदुस्थानात व विशेषतः पंजाबात मोठ्या प्रमाणावर संचार होता व मराठी अभंगादि रचनेबरोबरच त्यांनी हिंदी पद्यरचनाही पुष्कळ प्रमाणात केली. शीखपंथाचा धर्मग्रंथ गुरुग्रंथसाहेब यात त्यांची ६१ पद्ये समाविष्ट केली गेली आहेत.

श्रीनामदेवांच्या काळात उत्तर हिंदुस्थानात त्रिलोचन या नावाचेही एक संत होते. त्यांच्याबद्दलची निश्चित अशी फारशी माहिती नाही असे विद्वानांचे मत आहे. परंतु हे महाराष्ट्रीय नव्हते व ते काही काळ श्रीनामदेवांच्या सहवासात होते एवढे निश्चित आहे. पूरणदासकृत श्रीनामदेवचरित्रात ते श्रीनामदेवांचे शिष्य म्हणून काही काळ त्यांच्याबरोबर होते असे म्हटले आहे. त्यांचीसुद्धा चार पदे गुरुग्रंथसाहेबात समाविष्ट केलेली आहेत.

कबीरांनी श्रीनामदेव व त्रिलोचन यांच्यामधील पुढील संवाद दिला आहे :

'नामा माइया मोहिया । कहे त्रिलोचन मीत । काहे छीपहु छाइले। राम न लावहु चीत ।।'

**अर्थ :** त्रिलोचन श्रीनामदेवांना म्हणतात : 'नामदेवा, तू मायेने मोहून गेला आहेस. तू सर्व काळ कपडे छापण्यात व रंगविण्यात गुंतला आहेस व रामाकडे चित्त लावीत नाहीस का ?' त्यावर श्रीनामदेव पुढीलप्रमाणे उत्तर देतात : 'नामा कहै त्रिलोचना । मुख ते रामु संमाली। हाथ पाउ करि कामु सभु । चित्त निरंजन नालि ।।'

**अर्थ :** नामदेव म्हणतात : 'त्रिलोचना, मी मुखाने राम (म्हणजे रामनाम) सांभाळतो. हात व पायांनी सर्व कामे करतो व माझे चित्त निरंजनाच्या म्हणजे परमेश्वराच्या ठिकाणी चिकटलेले म्हणजे रंगलेले आहे.' (तळटीप)

श्रीनामदेवांनी स्वतःबद्दलचे दिलेले हे स्पष्टीकरणात्मक उत्तर परमार्थाची वाटचाल करणाऱ्यांना अतिशय उपयुक्त व मार्गदर्शक असे आहे. परमार्थ म्हणजे परमेश्वरस्वरूपाची प्राप्ती होय. मनाने पूर्णपणे परमेश्वराला अर्पण होऊन त्याच्याशी एकरूप होणे हे त्याचे स्वरूप आहे. त्याकरता आज दृश्याच्या व्यवहारात मी व माझेपणाने अडकलेले मन त्यातून पूर्णपणे काढून घेऊन ते परमेश्वराकडे लावणे जरूर आहे. असे करताना मनाबरोबरच शरीराचेही दृश्य व्यवहारातील अगदी अपरिहार्य असे व्यवहार वगळता बाकीचे सर्व व्यवहार पूर्णपणे सोडून/टाकून देणे किंवा त्यात कर्तव्यापुरते राहून सर्व जरूर ते व्यवहार इतरांप्रमाणे करणे असे दोन पर्याय असतात. पहिल्याला 'स्वरूपतः कर्मसंन्यास' तर दुसऱ्याला 'फलतः कर्मसंन्यास' असे म्हणतात. मनाची अलिप्तता व त्यांचे परमेश्वराशी संलग्न असणे हे मात्र दोहोंतही सारखेच असते. श्रीनामदेवांचे त्रिलोचनांना सांगणे असे की त्यांनी मुखात रामाचे म्हणजे परमेश्वराचे नाम अखंड सांभाळले व देहाने व्यवहारातील सर्व कर्मे करीत - अर्थात् कर्तव्यापुरती - आपले चित्त निरंजनाशी म्हणजे परमेश्वराशी एकरूप / समरस करून टाकले आणि हा मार्गच सामान्यांना कमी-अधिक प्रमाणात आचरता येण्यासारखा आहे. एकंदर गीतेचा आचरणाच्या दृष्टीने हाच सारांश आहे व तो अगदी थोडक्या व गीतेच्याच शब्दांत सांगावयाचा असेल तर '(तस्मात्सर्वेषु कालेषु) मामनुस्मर युध्य च ।' (८:७) - माझे सतत स्मरण ठेऊन युद्ध कर म्हणजे कर्तव्यकर्म कर (येथील 'युद्ध' हा शब्द सर्व कर्तव्यकर्मांचा संकेत आहे.) असा सांगता येईल. गीतेत इतर महावाक्ये असतील परंतु गीतेच्या एकंदर उपदेशाचा सारांश गीतेच्याच शब्दांत सांगणारे हे वाक्य त्या सर्वांत श्रेष्ठ महावाक्य आहे, असे म्हणावयास हरकत नाही. श्रीनामदेवांनी हेच तत्त्व त्यांच्या वरील उत्तरात सांगितले आहे.

श्रीगोंदवलेकर महाराजांनीसुद्धा हीच गोष्ट अगदी याच शब्दात सांगितली आहे. ते म्हणत : 'हातानें प्रपंचाचें काम, मुखानें भगवंताचें नाम व अंतःकरणांत समाधान इतकाच परमार्थ मला कळतो. बाकी सर्व वेदान्त आहे.' गीतेचे सारही 'कर्तव्याची जागृति व भगवंताची अखंड स्मृती' किंवा 'कर्तव्यात स्मरण' या शब्दांत ते सांगत. 'मामनुस्मर युध्य च' या गीतावचनाचा हा मराठी अनुवाद आहे हे सांगवयास नकोच.

श्रीएकनाथ व श्रीतुकाराम या संतश्रेष्ठांनीही परमात्मप्राप्तीकरता व्यवहार सोडून वनात वगैरे जाण्याची गरज नाही, नामस्मरणाच्या-परमेश्वराच्या अखंड अनुसंधानाच्या साहाय्याने व्यवहारात राहूनही - गृहाश्रम न सोडता त्याची प्राप्ती होते असे त्यांनी स्पष्टपणे - श्रीतुकारामांनी तर विठोबाची शपथ घेऊन - सांगितले आहे. त्यांची पुढील वचने पाहावी.

श्रीएकनाथ :

१) तैसा गृहाश्रमु न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां ।
निजव्यापारीं वर्ततां । बोधु सर्वथा न मेळे ।। नाथभागवत - ९:४३५

२) मजमाजीं रंगली चित्तवृत्ति । तयालागीं विसरला गृहासक्ति ।
त्यासी गृहाश्रमींच माझी प्राप्ति । सुखसंपत्ति निजबोधु ॥
नाथभागवत - १७:४३१

श्रीतुकाराम :

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरीचीं ॥ १ ॥
न लगती सायास जावें वनान्तरा । सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥
ठायींच बैसोनि करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥
यावीण असतां आणीक साधन । वाहतसें आण विठोबाची ॥ ५ ॥

याप्रमाणे आतून म्हणजे मनानें संन्यास म्हणजे जगातील सुख-दुःखादि द्वन्द्वांबद्दल अनासक्ति व व्यवहाराची प्राप्त कर्तव्ये न चुकणे वा टाळणे किंवा यथायोग्य रीतीने करणे हेच वरील संतांच्या दृष्टीने परमार्थ-आचरणाचे सार आहे. यालाच डॉ. राधाकृष्णन् यांनी 'Renunciation in action and not of action' व योगी श्री. अरविंदांनी 'Actionless action, action held in God-Consciousness' असे म्हटले आहे. श्रीज्ञानेश्वरांनी तात्त्विक भाषेत 'आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अन्तःकरण । पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥' (ज्ञाने. ५:२०) असे आतील संन्यासाचे स्वरूप सांगितले आहे.

हे सर्व सकृद्दर्शनी जरी सोपे व सुकर वाटले तरी प्रत्यक्ष आचरणात आणायला तितकेच कठीण आहे. त्याकरिता श्री नामदेवांनी साधक होऊ इच्छिणाऱ्याला त्याचा सोपा असा मार्ग सांगितला आहे व तो आहे व्यवहारातही 'मुख ते रामु संमाली । ('मुखानें भगवंताचे नाम' श्रीगोंदा. महाराज). अभ्यासाने व तज्जन्य वाढत्या रुचीनें व्यवहार होत असताही त्याचा मनातील रंग फिका होत जाऊन हळूहळू नामाची अखंड धारणा होत जाईल व साधकाचे अंतरंग त्याने भरून जाईल आणि मग जेथे नाम तेथे राम व जेथे राम तेथे काम राहणार नाही व मग खऱ्या कर्तव्यबुद्धीने म्हणजे फलाची आशा न ठेवता - बाहेरून कर्म होऊनही न केल्यासारखे होईल व श्रीनामदेवांसारखे चित्त अखंड निरंजनांत रंगून जाऊन साधक त्यांच्या पदवीला प्राप्त होतील.

तळटीप : या सर्व माहितीकरता श्री. शंकर पुरुषोत्तम जोशी यांचे 'पंजाबातील नामदेव' हे पुस्तक पाहावे. प्रकाशक - के. भि. ढवळे, गिरगांव, मुंबई, १९४०.

डॉ. वा. रा. अंतरकर
ए-३, तेजकीरण सोसायटी, ७९, राम मंदिर रोड, विले पार्ले,
मुंबई - ४०० ०५७



## नामदेवाची पायरी

जगामध्ये तशा खूपच आहेत पायऱ्या
दैवदैवतांच्या शिखरापर्यंत नेणाऱ्या,
संतांच्या समाधीपर्यंत जाणाऱ्या;
विहिरीतील निर्मळ जळ
गरिबाघरी नेऊ देणाऱ्या
आणि -
गंगेकाठी, गोदेकाठी
पवित्र स्नानासाठी नीट पोचविणाऱ्या
पायऱ्या सर्वत्रच आढळतात :
सर्वात अलौकिक आहे -
आमच्या संत नामदेवांची
पंढरीच्या पांडुरंगाच्या महाद्वाराजवळची
पहिली पायरी !
ही पायरी ओलांडल्याशिवाय
तिचे पावन दर्शन घेतल्याशिवाय
कोणीही खरा भक्त
पांडुरंगाच्या चरणाची भेट
घेऊ इच्छित नाही...
नामदेवांनी जन्मभर
केला विठुनामाचा गजर
चंद्रभागेच्या पवित्र वाळवंटात
स्वानंदाचा उधळीत बुक्का
अभंगाच्या आधारे संकीर्तन केले :
अनेकांना भक्तीच्या वाटेकडे
प्रेमाने बोट धरून नेले !
दासी जनीचा उद्धार केला
अन् शेवटी प्रभूच्या मंदिराची
पायरी होऊन राहिले
त्या पायरीला आमची अनंत वंदने असोत
आमच्या मनातील भोळी भावफुले
सतत तेथे उधळली जावोत :

वि. म. कुलकर्णी, पुणे.

# नामदेवांचे पंजाबातील कार्य


**प्रा. अजित कुलकर्णी**

बी. ए. (तत्त्वज्ञान) एम.ए. तत्त्वज्ञान, समाज शास्त्र, पी.एच.डी. काम सुरु. रजिस्ट्रार बी.एम.सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली २५ वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान. श्रीज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इ. गाढा अभ्यास. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक. धर्मभूषण पदवी श्रीमत् जगदगुरु शंकराचार्य (पुरी) १९९६.


इवलेंसे रोप लाविले द्वारी । त्याचा वेलु गेला गगनावरी ।।

मोगरा फुलला, मोगरा फुलला । ऽऽ

या ज्ञानदेवांच्या अभंगाची धून अनाहुत ऐकून माझी चित्तवृत्ती गुंगून गेली. या चिंतनात भक्ती मोगऱ्याच्या वेल सुगंधा बरोबर नामदेव साकार होवू लागले. वारकरी सांप्रदायाची हरिनामाची वेल बंधुता, समता व एकात्मतेचा गंधरूपी बोध नेणारे, चिपळ्या व वीणा घेतलेले नामदेव उत्तरेकडे जाताना दिसू लागतात आणि ऐकू येऊ लागते -

नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगी ।।

परेहुन परते घर । वाचे विठ्ठल रखुमाई ।।

या ज्ञानदीप ज्योतीवर मानवी जीवन उज्ज्वल करण्याचे जीवनध्येय नामदेवांचे होते.

नामदेवांच्या जीवनातील सुमारे २० वर्षांचा काळ भारताच्या पंजाब, गुजराथ, राजस्थान इ. भागात गेला होता. भारताच्या सांस्कृतिक इतिहासात नामदेवांचे स्थान चिरस्मरणीय आहे. याचा महाराष्ट्राला व वारकरी संप्रदायाला नक्कीच अभिमान आहे.

ज्ञानदेवांनी संजीवन समाधी घेतल्यानंतर नामदेवांनी भागवत धर्माच्या प्रसाराकरिता उत्तरेकडे प्रयाण केले होते. नामदेवांचे आयुष्य सुमारे ८० वर्षांचे होते. दीर्घ आयुष्याच्यामानाने ज्ञानदेवांचा संग थोडा असला तरी अखंड कृपा आशीर्वादाचे फळ म्हणजे नामदेवांचे कार्य म्हणता येईल. भागवत धर्माचे महाराष्ट्रातील महान प्रचारक म्हणून नामदेवांकडे पाहता येते.

### पंजाबातील सामाजिक व राजकीय परिस्थिती

महाराष्ट्रात ज्ञानदेवादी भावंडांनी समाधी घेतल्यानंतर नामदेवांनी भागवत धर्म प्रसाराचे कार्यासाठी भारतभ्रमण केले. प्रथम ज्ञानदेवादी संतमंडळींबरोबर नामदेवांनी भारतभ्रमण केले होते. तेव्हाच त्यांनी सर्व भारतीय समाजाचे निरीक्षण व परीक्षण केले होते. आता या भ्रमण काळात नामदेवांची प्रचारकाची भूमिका होती. दक्षिणेकडून उत्तरेकडे नामदेव गेले, तेथे ते स्थिरावले. त्या वेळी उत्तरेकडे मुसलमानी राजसत्ता होती.

संपूर्ण भारतातील समाजजीवन पूर्णतः धर्माधिष्ठित होते. भारताच्या उत्तरेलाही धर्मप्रधान समाज होता. समाज कर्मकांडात गुरफटलेला होता. समाजात रुढीचे प्राबल्य होते. मनुष्य जीवन सर्वोतोपरी धर्म व कर्मबंधनात बद्ध होते. उत्तरेकडे समाजात धर्मशास्त्राला अयथार्थ महत्त्व होते. समाजात ज्ञान, भक्ती, धर्म व कर्म याविषयी अज्ञान व अविवेकाचे व विधिनिषेधांचे स्तोम होते. समाजातील उच्च-नीच भावनांनी - जातीजमातीत ऐक्य नव्हते. त्यामुळे समाज सुसंघटीत नव्हता. लोक स्वार्थी, ध्येयहीन, लोभी, विषयासक्त होते. परस्परांत वैरभावना होती. त्यामुळे लोक आत्मनाश ओढवून घेत होते.

भारताच्या दक्षिणेपेक्षा उत्तरेकडील स्थिती अत्यंत बिकट व दयनीय होती. लोकजीवन विस्कळीत झाले होते. सर्वत्र अंधकार वाटत होता. वेदान्तांच्या ज्ञानाला बहुजन समाज मुकलेला होता. लोकांचे नीतिधैर्य खचून गेले होते. त्यामुळे खऱ्या ज्ञानाची ओळख लोकांना नव्हती.

### राजकीय स्थिती

महाराष्ट्रात ज्ञानदेवांच्या काळात महाराष्ट्रात परकीय सत्ता नव्हती. परंतु त्यानंतरच्या काळात परकीय सत्ता आली. भारताच्या उत्तरेकडे सर्वत्र मुसलमानी राजवट होती. ही राजवट धर्मांध व जुलमी होती. सक्तीने धर्मांतर करविले जात होते. मुसलमानांचा सांस्कृतिक व धार्मिक आक्रमणांवर जोर होता. त्यामुळे समाजात अस्थिरता, निराशा, भयग्रस्तता निर्माण झाली होती. भारतीय संस्कृती नष्टप्राय होईल की काय असे वाटू लागले होते.

हे देवा, पापछळे, कापते मेदिनी ।...

दैत्यांचे नि भारे, दाटली आवनी ।। या नामदेवांच्या अभंगातील ओव्या खूप काही सांगून जातात.

इस्लामी आक्रमणांमुळे वैदिक विद्या व कला यांना समाजात पायबंद बसला होता. हिंदूंना अत्यंत कठोरपणे वागवले जात असे. त्यांच्यावर जबरदस्त कर बसवला जाई. हिंदु स्त्रियांचे शील धोक्यात होते.

असा हा संक्रमणाचा काळ होता. या वेळी महाराष्ट्रात व उत्तरेकडे भारतीय संस्कृतीचे रक्षण करण्याचे कामात 'ज्ञानदीप लावू जगी ।' ही प्रतिज्ञा नामदेवांची दिसून येते. उत्तरेकडेही त्या वेळी अनेक संत झाले. परंतु नामदेवांचे कार्य म्हणजे परमार्थाच्या प्रांगणातील हे आगळे-वेगळे कार्य दिसून येते.

### पंजाबातील नामदेवांचे अनमोल कार्य

नामदेव हे श्रीज्ञानदेवांचे अंतरंगी शिष्य होते. वारकरी संप्रदायातील

प्रेरक ज्ञानदेव होते, तर प्रचारक नामदेव होते. ज्ञानदेव-नामदेवांचे कार्य म्हणजे वेदान्त विषयाला पारखे झालेल्या अज्ञानी लोकांना संजीवनी होती. अध्यात्मिक जीवनात धर्मनिष्ठा व व्यावहारिक जीवनात सदाचार हे वारकरी संप्रदायाचे मूलमंत्र आहेत. याने समाजाला नैतिक धैर्य प्राप्त होऊन एक विलक्षण सामर्थ्य प्राप्त झाले होते. या सामर्थ्यामुळेच उत्तरेकडील सर्वांगीण संकटास सामना करून नामदेवांचे कार्य आजही टिकले आहे.

तळमळीचा कार्यकर्ता सदैव फळाची अपेक्षा न ठेवता कर्तव्य भावनेने कार्य करीत असतो, त्यामुळे तो आनंदी व समाधानी असतो आणि लोकहित व राष्ट्राकरिता सदैव कार्यरत असतो.

नामदेवांनी ओळखले की, उत्तरेकडून इराण, अरबस्तानात येणारा ईस्लामी समाज रोखला पाहिजे. त्यासाठी प्रथम हिंदु समाज संघटनेची गरज आहे हे ओळखून नामदेव पंजाबात दीर्घकाळ राहिले. नामदेव हे अत्यंत मृदू, प्रेमळ प्रवृत्तीचे संत असल्याने लोकांचे आत्मिक सामर्थ्य वाढविण्यासाठी भागवत धर्माच्या मूलमंत्राचा प्रचार करण्याचे काम हाती घेतले.

नामदेवांनी ज्ञान, भक्ती, प्रेम यांनी समन्वय साधून भागवत धर्माची ध्वजा फडकाविली. भारतीय संस्कृतीचे रक्षण आणि संवर्धन करून राष्ट्रीय ऐक्याचे कार्य नामदेवांनी केले. मानवतेचा व अद्वैताचा साक्षात्कार झाल्यामुळे हिंदु व मुस्लीम यांच्यात ऐक्य घडविले. त्यामुळे नामदेव समतेच्या तत्त्वाचे प्रेषित झाले होते.

नामदेवांचे वैशिष्ट्य म्हणजे, ते ज्या ज्या भागातून भ्रमण करीत गेले त्या त्या भागातील लोकभाषेला आत्मसात करून लोकमानस जिंकून समतेचा पुरस्कार केला.

## तत्त्वज्ञानाच्या माध्यमाने ज्ञान जागृती

नामदेवांच्या आध्यात्मिक जीवनात परमेश्वर दर्शनाची उत्कटता, आर्तता, एकनिष्ठा, अचल श्रद्धा असल्याने या चैतन्य शक्तीच्या माध्यमाने सांगितले की,

एक अनेक बिआपक पूरक जत देखउ तत सोई ।
माइआ चित्रविचित्र विमोहित बिरला बुझै कोई ।।

एकच परब्रह्म अनेक वस्तूंना व्यापून राहिले आहे. जिकडे पाहावे तिकडे तेच दिसत आहे.

इभै बीठलु, ऊभै बीठलु, बीठलु बिन संसारु नाही ।।

इकडे तिकडे सर्वत्र विठ्ठलच भरला आहे. त्याच्या वाचून विश्वसंसारात दुसरे काही नाही.

अद्वैत सिद्धान्त मांडला, तो अशा अभंगातून मांडून लोकांना धर्म संकल्पनेला तत्त्वज्ञानाच्या माध्यमाने जागृत केले आणि अद्वैताच्या सार्वभौमत्त्वानी सबंध पंजाब दुमदुमून टाकला होता.

समाजात क्रांती/सुधारणा दोन मार्गाने होत असते. एक क्रांतीच्या मार्गाने दुसरा उत्क्रांतीवादी (जुन्याला नव दृष्टी देणे) सुधारणा करणे. नामदेवांना राजकीय राजवट किंवा समाजात क्रांतीने परीवर्तन घडू शकणार नाही, हे माहीत होते. परंतु ज्ञान व भक्तीमार्गाने मनुष्याला (उत्क्रांतीने) आंतरिक बदलण्याचे कार्य नामदेवांनी केले.

आत्मोद्धाराबरोबर लोकोद्धार व समाज विकास व्हावा ही नामदेवांच्या कार्याची तळमळ होती. वर्षानुवर्ष जो समाज रुढींनी ग्रस्त होता, त्यांना भक्तीची दीप ज्योती मिळाली होती. अध्यात्माची दालने सर्व समाजासाठी खुली होती आणि नामदेव सांगू लागले. :

'आम्हा सापडले वर्म । करू भागवत धर्म ।।'

या ध्येयवादाने कार्य केले. भूतदया, जनसेवा, परोपकार व परस्पर समभाव, या सद्‌गुणांनी नामदेवांनी समाज जीवन शुद्ध केले. वाङ्मयसंपदा, विचारप्रणाली व सदाचाराची संहिता या अपूर्व वारकरी संप्रदायाच्या देणगीने सबंध पंजाब नामदेवांनी आपलासा केला.

नामदेव शिंपी समाजातील होते. त्यामुळे राजस्थान, गुजराथ व पंजाबातील शिंपी समाज त्यांच्या मागे प्रामुख्याने उभा राहिला. त्यावर नामदेव म्हणाले -

मन मेरे गजु जिव्हा मेरी काती । मपि मपि काटउ जमकी फांसी।।

असे समाजात शिंपीकाम नामदेवांनी केले.

अशा विविध अंगांनी धर्म व कर्माची मूलतत्त्वे लोकांना सांगून समाजजीवनातील सत्त्वाचे संवर्धन केले.

## मानवतेच्या धर्माचा संदेश

नामदेवांच्या ईश्वर भक्तीच्या ज्ञान ज्योतीवर असंख्य दीप उजळून निघू लागले होते. मानवी जीवन व समाज जीवन यातमध्ये शब्दांनी नामदेवांनी ऐक्य घडविले. मनुष्याने परस्पर एकमेकांवर प्रेम करावे, एकमेकांतील वैर संपावे, जाती-जातीतील वैमनस्य दूर व्हावे, तसेच सर्वत्र प्रेमभाव वाढेल अशी अभंगाद्वारे प्रेरणा नामदेवांनी दिली. या एका प्रेरणेची धुमाळी सर्वत्र झाली. समता, ममता, बंधुता याने जगताना सर्वजण एका ईश्वराची लेकरे आहोत, हा संदेश नामदेवांनी दिला आणि तसे प्रत्यक्ष घडलेही !

हिंदु व मुस्लीम यांच्या संघर्षात नामदेवांनी समन्वय व ऐक्याची भूमिका घेऊन, प्रेमाने वागावे, नीतीने वागावे, मानवतेची सेवा हाच खरा धर्म याची ओळख करून दिली. तसेच मानव प्रेमाचा भक्तीरस सर्वांना वाटला.

हिंदु पुर्जे देहुरा, मुसलमान मसीत ।
नामा सोई सेविया, जहाँ देहुरा न मसीत ।।
मन मेरा सुई, तन मेरा धागा ।
खेचरची के चरण पर नामा सिंपी लागा ।।

अर्थ : हिंदु देवळात देवाजी पूजा करतात व मुसलमान मशिदीत करतात. नामदेव अशा ठिकाणी पूजा करतात की जेथे देऊळही नाही व मशीदही नाहीत. मनरूपी सुई व शरीररूपी दोरा घेऊन हा नामा खेचर (गुरु) चरणी लीन झाला आहे. (मानस पूजा, निर्गुणाची पूजा)

नामदेव लोकांच्या ऐक्यासाठी सांगतात, सर्व लोकांचे रक्त एकच आहे. दुःखही समान आहे. यासाठी जातीभेद, धर्मभेदावरून भांडण करू नका. सर्वजण प्रेमाच्या छत्राखाली राहू या.

का करी जाती का करी पाती । राजाराम येऊ दिन राती ।।
सुरति की सुई प्रेमका धागा । नामा का मन हरि सूं लगा ।।

यापुढे नामदेव म्हणू लागले -

हरि नाव हीरा हरि नाव हीरा । हरि नाव लेत मिटै सब पीरा ।।
हरि नाव जाती हरि नाव पांती । हरि नाव सकळ जीवन मैं क्रांती ।। १ ।।

अशा प्रकारे हरिनामाने सर्वत्र क्रांती नामदेवांनी केली. हिंदु-मुस्लीम आक्रमण संघर्षाच्या काळात, जातिसंस्था, उद्योग, व्यवसाय, उपासनामार्ग, धर्मसंकाचनेत नामदेवांचे कार्य समर्थ व प्रभावी ठरले.

## समाजाचे निरीक्षण करून, त्यावर मार्गदर्शन

नामदेव एकांतात राहणारे नव्हते. समाजाचे पूर्ण निरीक्षण, अभ्यास त्यांनी केला होता. कधी व्यक्तींवर तर कधी समाजाच्या अनिष्ट चालीरितीवर आसूड (परखड अभंगरचना करून) ओढून लोकजागृती केली. त्यासाठी उपमा, रूपक, दृष्टान्त लोक जीवनातील कल्पना याचा उपयोग करून नामदेवांनी समाजाला मार्गदर्शन केले.

मन स्थिर होई वा रे न होइ । ऐसा चिहन करै संसार ।।
भीतरि मैला धुतिग फिरै । क्यू उतरै भव पार ।।
रुद्राष सषा जप माला मंडे । ताकौ मरम न जानै कोई ।
आप न देषे और दिषावै । कपट मुक्ति क्यो होई ।। १ ।।

अर्थ - मन स्थिर होईल ? अरे बाबा, ते स्थिर होणार नाही. कारण अस्थिर मन हेच मुळी संसाराचे चिन्ह वा संकेत आहे. अंतःकरणात मलिनता आहे आणि तू वरवर धूत आहेस. रुद्राक्ष धारण केले, शिखा (शेंडी) धारण केलीस, जपमालेने मंडित झालास, तरी ते कोणाला समजलेले नाही. आणि दुसऱ्याला तो दाखवितो व आपल्याला तो दिसत नाही. अशा कपटाचरणाने मुक्ती कशी मिळेल ?...

लोकांच्या दंभाचरणाचा बुरखा अशा प्रकारे नामदेवांनी उघड करून लोकांचे दोष दृष्टोपत्तीस आणले आहेत.

धृग ते बकता । धृग ते सुरता ।।

मनात कुटिलता असल्यावर, बाहेरून स्नान करून काय उपयोग?

जैसे विषई चित्त परनारी । ऐसे नामदेव प्रीति मुरारी ।।

विषयलंपटता चांगली नव्हे, पण विषयी लोकांना त्यांच्याच अनुभूतीच्या आधाराने भक्तीचा मार्ग ते दाखवित होते.

या सर्वांत नामदेवांनी जो संदेश दिला तो असा की, परमेश्वराने सर्वांना समान व भेदरहित निर्माण केले आहे. जे भेद आहेत, ते मानवनिर्मित आहेत. मंदिर, मसजीत, मूर्तिपूजा, जातिभेद, वर्णभेद, उच्चनीच इ. भेदवृत्तीच्या विरोधी नामदेवांनी अंतरंग मोकळे केले आहे. आणि नामदेवांच्या या कार्यातून मानवधर्माचे खरेखुरे दर्शन होऊन समाजात ऐक्य, ध्येयनिष्ठा निर्माण झाली.

## नामदेव कार्याचा प्रभाव

नामदेवांच्या कार्याचा प्रभाव पंजाबात इतका प्रभावी ठरला की, शिख धर्माचे संस्थापक नामदेवाबद्दल म्हणतात -

नामा छीबा कबीरू जुलाहा पुरे गुरुते पाइ । (श्रीगुरुसाहेब ग्रंथ पृ. ३६).

नामदेव शिंपी व कबीर वीणकर असूनही ब्रह्मरूप झालेत.

तसेच शिखधर्माचा पवित्र असणारा 'श्रीगुरुसाहेब ग्रंथात' नामदेवांची ६१ पदे समाविष्ट झाली आहेत. नामदेवांनंतर एक शतकांनी शीख धर्म स्थापना व श्रीग्रंथसाहेबा ग्रंथाची निर्मिती शिखांचे पाचवे गुरु अर्जुनसिंग यांनी केली आहे. नामदेवांची श्रीग्रंथसाहेबातील पदे 'मुखबानी' या नावाने प्रसिद्ध आहेत.

पंजाबातील नामदेवांचे कार्य पुढे नेणारे पाच शिष्य होते - विष्णु स्वामी, बहोरदास, जाल्लो, लद्धा व केसो कलाधारी. आजही त्यांचे कार्य टिकून आहे. असे हे सांस्कृतिक प्रबोधनाचे उपकारक कार्य आहे.

नामदेवांच्या साहित्याबद्दल प्रेम व आदर असणारे शीख धर्मसंस्थापक गुरु नानक, कबीर, संत रोहिदास, संत मीराबाई, नरसी मेहता, सुरदासजी, दादूदयाल, मलूकदास, सुंदरदास इ. हे होते असे त्या त्या साहित्यातून दिसून येते. हा ही एक नामदेवांचा गौरव आहे.

मि. मॅक्स ऑथर मॅकोलिफ यांनी 'दि शिख रिलीजन' (१९०९) या पुस्तकातही नामदेवांचा उल्लेख केला असून एक उल्लेख असा आहे की, धर्मगुरु नानकापूर्वीच नामदेवांची पदे व साहित्य लोकप्रिय होते. आणि पुढे त्याला धर्मग्रंथात स्थान प्राप्त झाले आहे. तसेच या इंग्रजी लेखकांनी नामदेवांच्या ६१ पदांचा इंग्रजीत अनुवाद केला आहे. असे नामदेवांचे पंजाबातील क्रांतीदर्शी कार्य आहे.

## नामदेवांचे कार्यप्रभावातून गुरु नानकांना स्फूर्ति

सबंध पंजाबातील लोकांच्या हृदयात नामदेवांचे स्थान आगळे-वेगळेच होते. गुरुनानक हे शीख धर्माचे संस्थापक आहेत. संस्कृतातील 'शिष्य' शब्दापासून, पंजाबी 'सिक्ख' शब्द तयार झाला आहे. 'नानक' हे धर्मसंस्थापक गुरु असल्यामुळे त्यांचे जे अनुयायी, ते 'सिक्ख' किंवा 'शिख' म्हटले गेले. या शिकवणीच्या आचार-विचार वागणुकीला 'शीख धर्म' किंवा 'शीख संप्रदाय' संबोधिले गेले. नामदेवांचा काळ इ. स. १२७० ते १३५० होता तर गुरु नानकांचा काळ १४६९ ते १५३९ होता.

नामदेव हे गुरु नानकांपूर्वी होऊन गेले होते. त्यामुळे नामदेवांची शिकवण, आचार, साहित्य हे नानकांचे स्फूर्तीस्थान बनले असे म्हटले तर वावगे होणार नाही. सबंध जगात एक नवविचार क्रांतीचे वातावरण होते. त्यामध्ये नामदेवांचे विचारधनाने नानक आदि गुरु प्रभावित झाले होते. हे गुरु नानकांच्या संदेशातील तत्त्वावरून दिसून येते. श्रीगुरुसाहेब ग्रंथाची निर्मिती शिखांचे पाचवे गुरु अर्जुनसिंग यांनी केली. त्यांची कारकीर्द इ. स. १५८१ ते १६०६ अशी आहे.

## नामदेवांची शिकवण म्हणजे नामवेद

नामापरता मंत्र नाही त्रिभुवनी ।
ऐसी बोली वाणी वेदशास्त्री ।।
किंवा
वेदशास्त्र मंथुनी काढयिले सार ।

नामदेव वैदिक धर्माला मानीत होते, असे यावरून दिसते. आजही नामदेव सांप्रदायी शीख जानवे घालतात. संध्या करतात. विवाहादी मंगलकार्ये वैदिक पद्धतीने होतात. गळ्यात तुळशीची माळ घालतात. एकादशी व्रत करतात. बाह्याचरणापेक्षा अंतरंग शुद्धीचा विचार दिसतो. हे सांप्रदायी शीख मांसाहार करीत नाहीत. उपासनेत नामाचे महत्त्व

अधिक आहे. नाम उपासनेचे वैशिष्ट्य असे की, एक तर वस्तूज्ञान करविते आणि वस्तूज्ञान झाल्यावर त्या वस्तूशी सामरस्य उत्पन्न करते. आकारला देव । नामरूपा आला । म्हणौनि स्थापिला नामवेदी ।। याप्रमाणे हरिनामाचा सुकाळ केला आहे. भक्ती, नीति, सहृदयता व श्रद्धा या अधिष्ठानावर नामदेवांचा परमार्थ विचार आहे. त्यामुळे नामदेव संप्रदायात उत्कट भाव आहे. भक्तीचा छंद हा जीवनाचा गाभा बनतो, तेव्हा मनुष्याला ईश्वराचा साक्षात्कार होतो व त्याने परमानंद प्राप्त होतो. अशा प्रकारे अद्वैत तत्त्वज्ञानाला मानणारे आहेत.

नामदेव संप्रदायी, शीख केस वाढवितात. कडे, कंगवा व कच्छ वापरतात. पण कृपण वापरत नाहीत. या संप्रदायात अशा प्रकारे आध्यात्मिक विकासाकडे प्राधान्याने पाहिले जात असते. सगुण व निर्गुणाचे उपासक आहेत.

## पंजाबातील नामदेवांची मंदिरे व स्मृतीस्थळे

पंजाबातील बाबा पूरणदासकृत 'जनमसाखी' तून व इतर साहित्यावरून असे दिसते की, नामदेव दक्षिणेकडून उत्तरेकडे भ्रमण करीत गेले. ते एकटेच तीर्थयात्रा करीत होते. गुजराथ, द्वारका तेथून मारवाड, मथुरा, हरिद्वार करून पंजाबात स्थायिक झाले. पंजाबातील गुरुदास जिल्हा ही त्यांची कित्येक वर्षे कर्मभूमी बनली.

**घुमान**

या मंदिराला पंढरी समजतात. हिंदु-शीख नामदेव भक्त मंडळी एकत्र येतात. काहीजण या मंदिराला 'नामदेवकी घुमानी' किंवा 'गुरुद्वारा बाबा नामदेव' असेही म्हणतात. हे पंजाबी नामदेव भक्तांचे केंद्रस्थान आहे. या मंदिराचा विस्तार हिंदू व मुस्लीम राजकर्त्यांनी व भक्तांनी केला आहे. पूर्वी येथे जंगल होते. नामदेवांनी आपल्या अलौकिक शक्तीने तळ्यात पाणी निर्माण केले आहे. तेथे जंगलात एक महारोगी केशो हा आत्महत्या करण्यास आला तेव्हा नामदेवांची भेट झाली. त्यांनी केशोला तलावात स्नान करण्यास सांगितले तेव्हा त्याचा महारोग बरा झाला व हाच केशो त्यांचा परमभक्त बनला. या तलावातील पाण्याचे वेगळेच महत्त्व प्राप्त झाले आहे. आंधळ्याला दृष्टीही लाभली असे सांगितले जाते. तेव्हा दिल्लीचा बादशहा याने नजराणा पाठवून नामदेवांचा गौरव केला, तर नामदेवांनी नजराणा परत केला. शेवटी त्या बादशहाने घुमानचे मंदिर बांधले. येथून शेवटी पंढरी नामदेव परतले. तो मकरसंक्रांतीचा दिवस होता. आज तेथे यादिवशी मोठी यात्रा भरते. हे मंदिर पंजाबात नामदेवाचे समाधी मंदिर समजतात.

भरतपूर, बिकानेर, अलवार, बन्सी, मरडी (जि. अमृतसर), दुनियापूर (जि. मुलतान), धारिवाल, भावलपूर, पक्काव रोड (जि. मुलतान), लाहोर, अमृतसर, पनार मुलतान, लायलपूर, जालंदर, लुधियाना, अंबाला, रोहोटाक, तारा भिवानी, हिसार येथे नामदेवांची लहान मोठी मंदिरे आहेत. सध्या काही मंदिरे पाकिस्तानात गेली आहेत. पतियाला जिल्ह्यात - बन्सी पठाण येथेही मंदिर आहे. जालंधरजवळ - पतारा गावात मंदिर आहे. तसेच **राजस्थानात** - पुष्कर, जयपुर, गंगापूर, कोटा, घोलपूर, खिलचीपूर, सीतामंडी, नरसिंहगढ, छीपा, बडौदा, छपरा, झालरपाटन, खानपूर, गुगल, बगरु, कोलायत, सांगानेर, काळाडेरा अशी सुमारे एकशे पन्नास मंदिरे आहेत. **हिमाचल प्रदेशात** - मंजारा व सुनवली येथे स्मृतीमंदिरे आहेत. **उत्तर प्रदेशात** - ज्वालापूर, शहापूर, पाकबडा, छपरोली, कपूरगड, भगवानपूर, सारंग, **मध्य प्रदेशात** - जबलपूर. महाराष्ट्र - पंढरपूर - नामदेव पायरी - समाधी व प्रदक्षिणेच्या वाटेवर मंदिर आहे. औंढ्या नागनाथ, नरसी; रिठे येथे मंदिरे आहेत.

**गुजराथ** - जुनागड नरसी मेहताचे ठिकाणी स्मृतीमंदिर. नामदेवांची मंदिरे व स्मृतीस्थळे येथे नामदेवांचे कार्य करताना काही चमत्कारही घडले होते. त्यानुसारही ती मंदिरे उभी राहिली आहेत. पंजाबात 'ऑल इंडिया श्रीनामदेव सभा' आहे. तेथून काही मंदिराचे व्यवस्थापन होते. दरवर्षी साधारणपणे जन्मतिथी, वसंतपंचमी हे उत्सव होतात. पंजाबात नामदेव मंदिराकडे श्रद्धेने लोक वळत आहेत.

## समारोप

नामदेवांच्यात विशाल, उदात्त व मौलिक मानवतेची दृष्टी सामावलेली आहे. ज्ञानदेव-नामदेव यांच्या या विचार बीज पेरणीतून हिंदु-मुस्लीम ऐक्य त्या वेळी तरी घडले होते. शीख धर्माचे बीज याच विचारधारातून झाले होते. या ज्ञानदीप ज्योतीतून मानवतेचे, साक्षात नामदेवांचे दर्शन घडून येते.


प्रा. अजित कुलकर्णी
६९५ नारायण पेठ, संपदा अपार्टमेंट,
लोखंडे तालमीजवळ, पुणे ४११ ०३०.

# संत नामदेवजी - गुरु ग्रंथ के संदर्भ में

**डॉ. के. जगजीतसिंह**

एम. ए. पी. एचडी, एल.एल.बी.
बार कौन्सिल

माजी प्राचार्य - खालसा कॉलेज - कला, विज्ञान व वाणिज्य मुंबई. पी.एचडी व एम.फिलचे मार्गदर्शक शिक्षण खाते, भारतसरकार पुस्तक पुरस्कार, उत्तम शिक्षक पुरस्कार. ७ इंग्रजी व ६ मराठी पुस्तकं प्रकाशित. शैक्षणिक व सांस्कृतिक समितींवर सभासद, अध्यक्ष, सेक्रेटरी. ८ संशोधनपर लेख.

आदि श्री गुरुग्रंथ साहिब ज्ञान तथा भक्ति का अक्षय भंडार है। इस में वह तत्त्वज्ञान है जो आदि ग्रंथ के वाणीकारो ने परब्रह्म परमात्मा के साथ अभेद होकर प्राप्त किया । इस में किसी व्यक्ति के सामान्य विचार मात्र संकलित नहीं है और न ही यह मात्र मानव द्वारा रचित ग्रंथ है । मूल रूप से यह अन्तःकरण द्वारा अभिव्यक्त विशुद्ध ज्ञान है जो अकाल पुरुष की अपनी वाणी है । गुरु नानक देव जी कहते है कि अमृत वाणी मेरी अपनी रचना नहीं है क्योंकि प्रभु परेसा से वशी भूत हो कर स्वयं प्रभुने यह सब कुछ मुझ से कहलवाया है ।

गुरु ग्रंथ साहिबमे सिख गुरुओ के अलावा कई भक्ती की वाणी भी शामिल की गयी है जिन में भक्त कबीर, बाबा फरीद, साचना, रविदास के साथ साथ कुल ३० भक्त और भट्ट शामिल है । गुरु ग्रंथ मे महाराष्ट्र राज्य के महान भक्त श्रीनामदेव जी की भी वाणी है ।

(गुरु ग्रंथ मे कुल ५८७३ शब्द - अभंग है उन मे संत नामदेव जी कुल ६० शब्द शामिल है ।)

आप का जन्म महाराष्ट्र मे हुआ । बेशक प्रारंभसेही भक्त नामदेवजी सगुण-साकार एक मात्र विठ्ठल के उपाशक थे परन्तु जब गुरु कृपासे उन्हें ब्रह्मज्ञान प्राप्त हुआ तो वे निर्गुण निराकार सर्वत्र, सर्वव्यापी परमात्मा के विराट स्वरूप के उपासक बन गये । इस प्रकार गुरु से नामदान प्राप्त करने के पश्चात भक्त नामदेव जी का मंदिर व मूर्तिया आदि बांध नहीं सकीं. विठ्ठल अब किसी मूर्ती का नाम नही था । भक्त नामदेव जी के लिये वह विठ्ठल सर्व संसार मे व्याप्त परम पिता परमेश्वर था जो कि कई रूपो मे अपने आप को प्रकट करता है । नामदेवजीने अपने अभंगोमें गुरुकी महत्ता, प्रभु भक्तिके उद्‌धारणा, सर्व व्यापक : परमात्मा, भरोसा विषयोंपर अपने विचार व्यक्त किये है ।

## आडंबरो का खंडन

भक्त नामदेव जी आडंबरो का भी खंडन करते है । वह कहते है : साप कुच छोडे बिख नही छोडे । (४८५) अर्थात साप कचुली छोडता है मगर अंदर से विष का त्याग नही करता । पानी मे खडा होकर बगुला ध्यान लगाता है । इसी तरह यदि मन के भीतर तृष्णा हो तो बाहिर वेष बनाने से कोई आत्मिक लाभ नही होता ।

वह अंत मै यही कहते है : हे भाई जब तक अपना मन शुद्ध नही तब तक ध्यान लगाने या नाम का जप करने का कोई लाभ नही.

## समर्पण

संत नामदेव जी अपने जीवन की पूरी बाग डोर उस प्रभु परमेश्वर के हाथ मे देने मे विश्वास रखते थे तभी तो वह राग गुजरी मे कहते है -

जौ राज देह त कवन बडाई
जौ भीख मंगावहि त किआ घर जाई (५२५)

अर्थात यदि परमात्मा राज करवा दे तो उस मे मेरा क्या बडापन है और यदि वह मुझसे भीख मंगवाता है तो मेरा क्या घट जायेगा । निर्वाण पदवी पाने के लिये हमे हरी का जाप करना चाहिये । ऐसा करने से आवा गवन के चक्कर से इनसान मुक्त हो जाता है ।

गुरु ग्रंथ साहिब की बाणी चाहे सिख गुरुओ ने रची है और चाहे अन्य भक्तो ने मूल रूप से उस का तत्त्वसार एक ही है । मूल सिद्धांत एक है अनेकता मे एकता के स्वर सुनाई देते है - वैसे ही जैसे किसी आरकैस्ट्रा से संगीत पैदा करने के लिये तरह तरह के साज बजाये जाते है परन्तु मिल के उन के स्वर अपने आप मे एक इकाई बन जाती है और सुनने वाले को मुग्ध कर देती है । वैसी ही है - यह गुरबाणी जो गुरु ग्रंथ मे शामिल की गई है ।

जितना महत्त्व गुरुओं की बाणी को दिया जाता है उतना ही सनमान संतो की बाणी को । इस प्रकार संतों की बाणी को भी गुरबानी ही माना जाता है ।

भक्त नामदेव जी सिख धर्म मे विश्वास रखने वाले श्रद्धालूओं की दृष्टि मे सिख गुरु न होते हुये भी उसी स्थान पर बैठे पाये जाते है - जहाँ सिख गुरु ।

इस संदर्भ मे संत नामदेव जी की बाणी को भी पूरी मानव जाती के सामने वे आदर्श रखने का सनमान हासिल है जो उन अट्टल सच्चाईयो पर आधारित जो कल भी सच्च थी, आज भी सच्च है और भविष्य मे भी सच्च रहे गी ।

डॉ. के. जगजित सिंह
सी/३, रविदर्शन, शेराली राजन रस्ता,
बांद्रा (प.), मुंबई ४००_०५०.

# पंढरी महात्म्य आणि तीर्थावळीतील भूगोल

**प्रा. संजीव नलावडे**

एम. ए. (भूगोल) एम्.फील

पर्यावरणशास्त्र विषयांतर्गत 'प. महाराष्ट्रातील वन्यजीवन' यावर डॉक्टरेटसाठी संशोधन चालू. भूगोल, पर्यावरण, वन्यजीवन या विषयांत विशेष गती. इतिहास, धर्मशास्त्र, तत्त्वज्ञान विषयांची आवड संत वाङ्मयात विशेषतः दासबोधातील निसर्ग आवडीचा विशेष. ७ पुस्तके व ८० हून अधिक लेख प्रसिद्ध. फर्ग्युसन महाविद्यालयात भूगोल विभाग प्रमुख.

संत ज्ञानेश्वर (१२७५-१२९६) आणि संत नामदेव (१२७०-१३५०) हे महाराष्ट्राच्या संत मालिकेतील दोन संतश्रेष्ठ होय. हे दोघेही समकालीन होते. मात्र ज्ञानदेवांनी अल्पवयात समाधी घेतली तर नामदेव मात्र दीर्घायुष्य जगले. गुरुदेव रानड्यांनी नामदेवांचा गौरव 'विठ्ठल संप्रदायाचा प्रतिध्वनी' असा केला आहे. संत नामदेव पंढरपूरनिवासी असून त्यांच्या काळी विठ्ठल संप्रदायाचे ते मुख्य आधारस्तंभ होते. विठ्ठलावर आणि पर्यायाने पंढरपूरवर त्यांचे अतोनात प्रेम होते. त्यांच्याच काळात, त्यांच्याचमुळे पंढरीचा महिमा वाढला.

नामदेवांनी भारतभर प्रवास केला असावा हे त्यांच्या काही अभंगांवरून दिसून येते. त्यांचे काही अभंग हिंदीत असून काहींचा समावेश 'गुरुग्रंथ साहिब' या शीखांच्या पवित्र ग्रंथातही केलेला आहे. मात्र कालभिन्नतेचा विचार करता हे नामदेव दुसरेच असावेत असाही एक मतप्रवाह आहे. मते काही असली तरी नामदेवांनी भारतवर्षाचा बराच मोठा भाग पायाखाली घातला होता हेच खरे. त्यांच्या तीर्थावळी आणि पंढरी माहात्म्य या अभंगांतून हे स्पष्ट होते.

तीर्थावळी हे संत ज्ञानेश्वर आणि संत नामदेव यांच्या एकत्र प्रवासाचे व अनुभवाचे चिंतन आहे. 'पृथ्वीची तीर्थे करावी समस्त । पहावे महंत साधुजन ॥' या हेतूने ज्ञानदेव नामदेवांकडे आले व त्यांनी नामदेवांना तीर्थयात्रेला बरोबर चालण्याची विनंती केली. नामदेवांना विठ्ठलाचे चरण सोडावयाचे नव्हते म्हणून त्यांनी ज्ञानदेवांना लगेचच होकार दिला नाही. त्यांनी तीर्थयात्रेसाठी पांडुरंगाची आज्ञा मागितली व अशी आज्ञा झाल्यावरच ते ज्ञानदेवांसमवेत तीर्थाटनाला बाहेर पडले. दोघेही भीमा ओलांडून (पैलतीरी उतरून) प्रस्थान करते झाले. तीर्थावळीत हा प्रवास नक्की कोणत्या दिशेने, कसा केला, कोठली स्थळे पाहिली याचा तपशील नाही. संपूर्ण प्रवासात नामदेवांचे चित्त सतत पांडुरंगापाशी कसे होते याचे तपशीलवार वर्णन नामदेव करतात. मात्र

'पश्चिम प्रभास आदि करोनि द्वारका ।

पाहिल्या सकळिक मोक्षपुऱ्या ॥' या अभंगावरून हे संतद्वय द्वारका-प्रभास इ. पश्चिमेकडील तीर्थस्थळे पाहून 'सकळिक मोक्षपुऱ्या' करून पंढरपुरास परतले असावेत असे दिसते. मात्र एवढ्या तीर्थांना भेटी देऊनही नामदेवांचे समाधान नव्हते. त्यांचे लक्ष प्रवासातही सतत पंढरपूर आणि पांडुरंगाकडेच लागलेले होते. 'उदंड तीर्थांची ऐको जाय प्रौढी । चित्त माझे वोढी चंद्रभागे ॥'

नामदेवांनी ज्ञानेश्वरांच्या संगतीने केलेली ही तीर्थयात्रा फक्त पश्चिम भारतातील तीर्थस्थळांपुरतीच मर्यादित असावी असे दिसते. पंढरी माहात्म्यात नामदेवांनी भारतवर्षातील असंख्य तीर्थस्थळांचा उल्लेख केला आहे. या तीर्थस्थळांना त्यांनी अन्य वेळी भेट दिली असली पाहिजे असे वाटते. सर्व तीर्थांमध्ये पंढरपूर हेच तीर्थ सर्वश्रेष्ठ आहे. बाकी कोट्यावधी तीर्थे असूनही प्रत्येक तीर्थात काहीतरी लांधन (दोष) आहे. उणीव आहे, न्यून आहे याचा तपशील पंढरीमाहात्म्यात आढळतो. पंढरपूरशी तुलना करताना इतर तीर्थांची वैशिष्ट्ये व त्या प्रत्येकात असलेली त्रुटी नामदेव स्पष्टपणे दाखवतात व पंढरपूरचे श्रेष्ठत्व व पावनपावित्र्य सिद्ध करतात. पंढरीमाहात्म्यात नामदेवांनी उल्लेखलेल्या तीर्थस्थळांचे भौगोलिकदृष्ट्या पुढीलप्रमाणे गट करता येतील.

उत्तरेकडील तीर्थे : कुरुक्षेत्र, मथुरा, अयोध्या, प्रयाग, काशी, गया

पश्चिमेकडील तीर्थे : द्वारका-प्रभास, पुष्कर



तीर्थावळी व पंढरी माहात्म्यात निर्देशित तीर्थस्थळे

पूर्वेकडील तीर्थे : श्रीशैल्य पर्वत, जगन्नाथ

दक्षिणेकडील तीर्थे : करवीर (कोल्हापूर), गोकर्ण, कांची, नृसिंहपूर

लोण्हार असा एका तीर्थाचा उल्लेख आहे. हे सध्याचे लोणार (जि. बुलढाणा) असावे की काय असे वाटते (येथे प्रसिद्ध दैत्यसूदन मंदिर आहे. हे वऱ्हाडातील सर्वात प्राचीन स्थळ असून विष्णूने लवणासुरावर या ठिकाणी विजय मिळविला अशी कथा आहे. याला 'विष्णुगया' असेही काही ठिकाणी म्हटले आहे. या माहात्म्यामुळे नामदेवांनी या स्थळाला भेट दिली असणे शक्य आहे.) काशीचा उल्लेख अनेक ठिकाणी त्यांनी वाराणशी असाही केला आहे. यावरून वरील दोनही नावे त्या वेळी प्रचलित होती असे दिसते. तसेच काशीच्या मनकर्णिका घाटाचाही उल्लेख आहे. नामदेवांच्या अभंगात गंगा, गोमती, गोदावरी, तुंगभद्रा, कावेरी या नद्यांचाही निर्देश आहे. गोमतीचे पाणी अरुच-क्षारयुक्त असल्याचेही त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. गोदावरीच्या भौगोलिक स्थानाचे वर्णन करताना ही नदी सर्व नद्यांच्या मध्यावर 'सकळिका मध्ये गोदावरी ।' असे सांगण्यासही ते विसरलेले नाहीत. गंगेचा उल्लेख अनेक ठिकाणी 'भागीरथी' असाच ते करतात. जसे 'वाराणसी भागीरथी देखा । पांडुरंगी भीमरथी ॥' चंद्रभागा कशी प्राचीन नदी आहे हे सांगताना त्यांनी 'जेव्हा नव्हती गोदा गंगा । तेव्हा होती चंद्रभागा ॥'. असे म्हटले आहे. चंद्रभागेचा निर्देश 'पुण्य सरोवर' असा तीन ठिकाणी तरी केला आहे. यावरून दोन निष्कर्श संभवतात १) त्या काळी चंद्रभागेचे पात्र आजच्या पेक्षा मोठे असावे व त्याच्या पाण्याचा विस्तार इतपत मोठा असावा की ते एखाद्या सरोवरासारखे भासत असावे किंवा २) त्या काळी या ठिकाणी एखादे 'कुंडल कासार' या चंद्राकृती सरोवर (Ox-bow lake) असावे. या संदर्भात या नदीचे अधिक संशोधन होणे गरजेचे आहे. नामदेवांच्या अभंगात चंद्रभागा नदी आणि काठाचीही वर्णने खूप आहेत. जसे -

धन्य धन्य भिंवरातर । चंद्रभागा हे निकट ॥
धन्य धन्य वाळूवंट । मुक्तीपेठ पंढरी ॥
(भिवंरा = भीमा)

मात्र पंढरीमाहात्म्यातील तीर्थक्षेत्रांच्या यादीत वा अन्यत्र हिमालयातील हरिद्वार, बद्रीनाथ-केदारनाथ तसेच अतिदक्षिणेकडील रामेश्वर, कन्याकुमारी या तीर्थाचा उल्लेख नाही. यावरून नामदेव हिमालयात वा अतिदक्षिणेकडे गेले नसावेत असे म्हणण्यास जागा आहे. त्यांनी केलेला तीर्थसंचार दक्षिणेकडे कावेरीपर्यंत, पूर्वेकडे जगन्नाथ-गयापर्यंत, पश्चिमेकडे द्वारकेपर्यंत व उत्तरेकडे अयोध्या-काशीपर्यंत आहे. ज्या काळी पायी वा बैलगाडी एवढी दोनच साधने सामान्यांसाठी उपलब्ध होती त्या काळी एवढा विस्तीर्ण प्रदेश पालथा घालणे ही सोपी गोष्ट नव्हे.

प्रा. संजीव नलावडे
राखी अपार्टमेंट, पौड रोड,
पुणे ३८. फोन - ३६३००४

# " कुंडलीवरून अध्यात्म योग शोध "

**पंडित हिंगे**

साहित्य विशारद, ज्योतिष विशारद. ज्योतिषपंडित, ज्योतिषभास्कर, होरा कमल विशारद व ज्योतिष महामहोपाध्याय (संपूर्ण भारत), सामाजिक ज्योतिष विषयक वेगवेगळ्या मासिकांत, वृत्तपत्रांत लेखन, सहसंपादक-स्नेहांकित व इंद्रायणी काठी, नागरी संरक्षण दलात वॉर्डन पोस्ट, सायरन ऑपरेटर व ऑर्गनायझर - भारत-पाक १९७१ च्या युद्धात उत्तम कामाबद्दल ब्रॉंझ व सिल्व्हर मेडल प्रदान - अखिल भारतीय ज्योतिष संमेलनात, सन्मान व पुरस्कार.

सध्याच्या धकाधकीच्या जीवनात कधी कधी माणसांना अध्यात्माकडे वळण्याची बुध्दी होते, कारण मनःशांती देणारे ते एकमेव साधन आहे. जेव्हा त्या मार्गाकडे सुरुवात केली जाते त्या वेळी मात्र प्रत्येकालाच सहजगत्या ते साध्य होते असे नाही. कधी कधी भविष्यातूनदेखील मला अध्यात्माकडे वळता येईल का ? असे विचारले जाते. कुंडलीत जर तसे अध्यात्मिक योग जोरदार असतील तर व्यक्ति सहजच त्या मार्गाकडे वळते.

### परमार्थ तृष्णा वाढविणारा ग्रह

कुंडलीमध्ये अध्यात्मिक योग केव्हा होतात हे पाहणेदेखील महत्त्वाचे ठरते. गुरु, शनि, केतू हे अध्यात्माच्या दृष्टीने शुभ फल देणारे ग्रह आहेत. कुंडलीमध्ये विशेष करून केतू ज्या स्थानात असतो त्या स्थानाबद्दल ऐहिक दृष्टीने चांगली फळे मिळत नाहीत; कारण केतू ग्रह परमार्थ तृष्णा वाढविण्याच्या दृष्टीने अत्यंत उपयोगी पडतो. केतू हा ग्रह कुंडलीत लग्नाच्या अथवा चंद्राच्या नवमांशात जर पंचम, नवम् आणि द्वादश स्थानी असून जर गुरुची दृष्टी असेल तर मात्र मनुष्य निश्चितपणे अध्यात्माकडे वळतो.

### धर्मशास्त्र, अंतर्ज्ञानाचे ग्रहयोग

अध्यात्म मार्गातील संन्यासव्रत, विरक्ती, अंतर्ज्ञानी, ईश्वरभक्ति ह्या मार्गाकडे वळताना देखील कुंडलीमध्ये तसेच अध्यात्म मार्गावरील महत्त्वाचे योग असतील तरच त्याचा उपयोग होतो.

केतू हा लग्नाच्या नवमात असून जर तो चंद्राच्याही पंचमात असून त्यावर गुरुची दृष्टी असेल तर अशा व्यक्तिला अध्यात्मविद्येची निश्चितपणे प्राप्ती होते. कुंडलीतील पंचम स्थान, दशमस्थान, यातील ग्रह तसेच लग्न, नवम् आणि दशमस्थान बलवान असेल तर ती व्यक्ती धर्मशास्त्र, चार वेद यामध्ये पारंगत होऊन अंतर्ज्ञानी होते.

कुंडलीमध्ये दशमस्थानी चार ग्रह असणारा मनुष्य विरक्त मार्गाकडे वळतो. दशमस्थानी तीन ग्रह उच्च अथवा स्वगृहीचे असून जर ते शुभ वर्गात असून दशमेश बलवान असेल तर मात्र अशी व्यक्ति संन्यासी होते. मेष-वृश्चिक, धनु-मकर, कुंभ-मीन लग्नातला गुरु जर भाग्यस्थानी असेल तर ती व्यक्ती धार्मिक वृत्तीची असते. कुंडलीमध्ये पंचमेश आणि व्ययेशाचा योग्य योग त्या संबंधितच ईश्वरभक्तिकडे वळवितो.

कुंडलीमध्ये पूर्ण चंद्र जर भाग्यात, चतुर्थात दशमात अगर पंचमात असून त्यावर गुरुची दृष्टी असेल तर मनुष्य त्रिकालज्ञानी होतो. १२ वे स्थानातील ग्रह अष्टमात असून तो उच्च असेल व भाग्यस्थानाचा स्वामी १२ वे स्थानी असेल तर व्यक्तिची चांगल्या प्रकारेच धार्मिक प्रगती होते. हर्शल हा ग्रह म्हणजे बुधाची मोठी प्रतिमा असे म्हणतात. बुध हा बुद्धिचा कारक तर हर्शल तीव्र बुद्धी ! असा हा ग्रह ज्या वेळी रवि, चंद्र, बुध आणि गुरु यांच्या शुभयोगात (युति/नवपंचम/लाभ) असून बलवान असेल तेव्हाच बुद्धिच्या शक्तिवर भूत, भविष्य जाणण्याची उत्तम शक्ति देतो.

कुंडलीतील चार स्थानांपैकी धर्म, मोक्ष व त्रिकोण स्थाने अनुक्रमे (१, ५, ९ व ४, ८, १२) लग्न, पंचम, नवम, चतुर्थ, अष्टम आणि व्यय हेच अध्यात्मिक प्रगतीकरिता उपयोगी पडतात. धनु, मकर, कुंभ, मीन ह्या अध्यात्मिक राशी आहेत; आणि त्या अनुक्रमे नवम्, दशम्, एकादश, द्वादश स्थानी असल्याने त्यांना महत्त्व प्राप्त झालेले आहे.

कुंडलीतील पंचम आणि नवम ही स्थाने पूर्व पुण्यस्थाने आहेत.




पंचमस्थानावरून उपासना पूर्वसुकृत, धर्मशास्त्र, मंत्रशास्त्र, प्रगती वगैरे गोष्टींचा विचार होतो - तर नवमेस्थानावरून धर्मश्रद्धा-धार्मिक आचार, विचार, दानधर्म हे पाहतात. दशमस्थानावरून कृती तपाचरण व नंतर व्यय (द्वादश) स्थानावरून परलोक प्राप्ती, मोक्ष प्राप्ती, सद्‌गती, ईश्वरोपासना वगैरेंचा विचार केला जातो.

श्रीआद्य गुरु शंकराचार्यांच्या कुंडलीतील अध्यात्मास पोषक असे ग्रहयोग पाहता येतील.

श्रीआद्य गुरु शंकराचार्य

लग्नस्थानाचा स्वामी चंद्र व्ययात असून त्यावर शनी, गुरु-मंगळ




ह्या ग्रहांची दृष्टी आहे. मोक्षस्थान बलवान - गुरु आणि शनी यांचा परिवर्तन योग (गुरुचे राशीत शनी आणि शनीचे राशीत गुरु आहे.)

संत नामदेवांची उपलब्ध पत्रिका तपासली असता त्यामध्येही काही महत्त्वपूर्ण योग मिळालेले आहेत. ते खालील प्रमाणे -

॥ श्रीसंत नामदेव ॥

शके ११९२ कार्तिक शुक्ल एकादशी

२६.१०.१२७० सकाळी ६/०० पंढरपूर -

टीप : कंसातील आकडे अंशाचे आहेत.




ह्या कुंडलीत तूळ लग्नाचा स्वामी शुक्र मोक्षस्थानी राहू बरोबर आहे. लग्नस्थानी गुरु आहे. पंचमस्थानी (अंशात्मक) चंद्र येत असून पंचमस्थानाचा स्वामी शनी लाभस्थानी नेपच्यूनचे युतीत आहे. शुक्र-हर्शलचा - नवपंचम योग पत्रिकेत आहेच.

संत नामदेवांनी असंख्य अभंग, भजने रचली. भक्तिमार्गाचा प्रसार केला तसेच वारकरी पंथाचा प्रसार केला. त्यासाठी पायी प्रवासही केला. संत नामदेवांनी ज्ञानेश्वरीबाबत तर अत्यंत महत्त्वाच्या दोन ओळी लिहून ठेवलेल्या आहेत. त्या खरोखर किती सार्थ आहेत त्या पहाच !

"नामा म्हणे श्रेष्ठ ग्रंथ ज्ञानदेवी
एक तरी ओवी अनुभवावी ॥"

नामदेवाप्रमाणेच संत ज्ञानेश्वर, निवृत्तीनाथ, एकनाथ, मुक्ताबाई, विद्यारण्य स्वामी, रामकृष्ण परमहंस, शारदामाता इ. कितीतरी संत महात्म्ये होऊन गेलेले आहेत. त्यांच्या कुंडल्यांमध्ये अत्यंत महत्त्वपूर्ण असे अध्यात्मिक योग असल्यामुळे त्या त्या व्यक्ती संसारापासून विरक्त होऊन अध्यात्माकडे वळलेल्या आहेत. आपल्या महाराष्ट्राची 'धनु' ही गुरुची रास त्यामुळे अनेक संतही महाराष्ट्रातच होऊन गेले ही परंपराच आहे.

कुंडलीत अध्यात्म योग असल्याखेरीज व्यक्ती अध्यात्माकडे वळणार नाहीच !

पंडित हिंगे
अमरबाग सोसायटी, ई/१३
गाडीतळ - हडपसर - पुणे ४११ ०२८.
दूरभाष (०२१२) ६१०४३५

## माय माऊली

रूपाचा ठेवा
वाणीत गोडवा
सुगरणीचा हात
पाठी मायेची थाप
साधा सरळ स्वभाव
नाही आपपर भाव
हृदयाची माया
धरी वात्सल्याची छाया
तृप्त अन् शांत
जशी समईची वात
नित उत्साह अमाप
प्रकटला आपोआप
राहो समाधान उदंड
हीच प्रार्थना अखंड

सौ. मंजिरी मोहन रानडे
५९० शनिवार पेठ, वैद्य वाडा, पुणे ४११ ०३०.

# नामदेव : एक आगळा संत

**डॉ. कालिदास जोशी**

बी. एस्सी (ॲग्री.) एम.एस्सी (ॲग्री)

योगशिक्षण, एम. ए. (फिलॉसॉफी) पी.एचडी योग व व्यक्तिमत्व एन. डी. (डॉक्टर ऑफ नॅचरोपथी)

३० वर्षे योगविज्ञान प्राध्यापक व प्रमुख म्हणून निवृत्त. पी.एचडीला मार्गदर्शक, परदेशात योग शिकविण्यासाठी प्रवास. योग तज्ज्ञ म्हणून निरनिराळ्या राज्य सरकार, विद्यापीठ, लोकसेवा आयोग भारत सरकार वगैरे समितींवर नेमणूक. सहाय्यक संपादक म्हणून Encyclopedia of Hindusum १९८९ पासून नेमणूक. ६ योगांवर इंग्रजी हिंदी पुस्तके, प्रतिष्ठित मासिकांत ३० योगांवर संशोधनात्मक लेख.

आपल्या भारत देशाचे वर्णन पुष्कळदा 'संतांची भूमी' असे केले जाते. आजच्या परिस्थितीत ते कितपत योग्य ठरेल हे सांगणे कठीण असले तरी मध्ययुगीन काळात हे वर्णन अगदी यथार्थ होते. त्या काळात प्रत्येक प्रांतात, प्रत्येक भाषेत ईश्वरभक्तीचा व सदाचाराचा महिमा वर्णन करणारे अनेक संत होऊन गेले. महाराष्ट्रात होऊन गेलेल्या अनेक संतांच्या मधे प्रमुख नावे घ्यायची झाली, तर 'निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, एकनाथ, नामदेव, तुकाराम' या अनेक भक्तांच्या तोंडी असलेल्या वचनाचा उल्लेख करता येईल. त्यातही पुन्हा 'ग्यानबा तुकाराम' ही जोडी अगदी अग्रणी म्हणून समजायला काहीच हरकत नाही.

जनमानसावर सर्वात अधिक प्रभाव ह्या दोघांचा हे जरी खरे असले तरी नामदेवांचे स्थान हेही अखिल मराठी संतांच्या मांदियाळीत वैशिष्ट्यपूर्ण व आगळे आहे ही गोष्ट त्यांचे चरित्र व कार्य पाहिले असता ठळकपणे लक्षात आल्यावाचून राहात नाही.

नामदेवांचा जन्म इ. स. १२७० मधे पंढरपुरात झाला. ज्ञानदेवांच्यापेक्षा ते एक वर्षाने मोठे. त्यांना आऊबाई नावाची मोठी बहीण होती. वडील दामाशेटी हे शिंपी काम व कापड विक्रीचा धंदा करीत. नामदेवांनी आपला हा पिढीजात उद्योग कधी केला नाही. त्यांचे सारे लक्ष्य बालपणापासूनच विठ्ठलभक्तीत एकवटले होते. संसारात, अर्थार्जनात, घरगृहस्थीत लक्ष्य नाही म्हणून त्यांना आई गोणाई व पत्नी राजाई यांनी व त्यांच्या पित्यानेही अत्यंत त्रासून जाऊन कळवळून बोल लावल्याची, दूषणे दिल्याची अनेक उदाहरणे साहित्यात नमूद झाली आहेत. पण नामदेवावर त्याचा फारसा परिणाम झाल्याचे, त्यांचे वागणे सुधारल्याचे किंवा मन पालटल्याचे दिसत नाही. भावार्थ दीपिकेच्या रचनेनंतर ज्ञानदेव आणि त्यांची भावंडे पंढरपुरात त्यांना प्रथमच भेटली तेव्हा नामदेवांनी त्यांना यथायोग्य वंदन केले नाही, नीट आगत-स्वागत केले नाही. हे पाहून मुक्ताबाईने नामदेवांना दोष दिला, हटकले, ही नामदेवांच्या पूर्वायुष्यातील व्यक्तिमत्वासंबंधीची एक वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट म्हणून सांगता येईल.

नामदेवांची विठ्ठलावर येवढी अनन्य श्रद्धा होती की त्यांनी पुष्कळ वर्षे कुणी गुरु केला नव्हता. पण पुढे त्यांना इतर संतांच्या सांगण्यावरून सद्‌गुरुची आवश्यकता पटली व त्यांनी विसोबा खेचर या सत्प्रवृत्त ब्राह्मणास सद्‌गुरु म्हणून पत्करले. ज्ञानदेवांनी त्यांना तीर्थयात्रेला चलण्याची विनंती केली तेव्हा पंढरपूर आणि विठ्ठल मूर्तीचा सहवास सोडण्याची कल्पना नामदेवांना अत्यंत कठीण वाटली. पण एकदा तीर्थयात्रेला जाऊन आल्यावर नामदेवांच्या मनाचे ते बंधन तुटले व पुढे ज्ञानदेवादि भावंडे व चांगदेव यांनी लवकरच इहलोकीची यात्रा संपवल्यावर पुढे थोड्याच दिवसांत ते दक्षिणेत म्हैसूर, तामिळनाडू, रामेश्वरम्, कन्याकुमारी या ठिकाणी जाऊन आले. त्यानंतर आपल्या ८० वर्षांच्या प्रदीर्घ आयुष्यात त्यांनी देशभर अनेकदा तीर्थयात्रा केल्या. काही ठिकाणी ते अनेक वर्षे राहिले. स्थानिक भाषा शिकून त्या त्या भाषेत त्यांनी नामसंकीर्तने केली. गुजराती, हिंदी, पंजाबी अशा विविध भाषांतील त्यांची अनेक भजने प्रसिद्ध आहेत. राजस्थान व पंजाबमध्ये नामदेवांनी दीर्घकाळ वास्तव्य केले.

नामदेव मराठीतील अभंगरचनेचे आद्य कवी झाले. चरित्र लेखन हा साहित्य प्रकार त्यांनीच प्रथम सुरू केला. त्यांच्या हिंदी पदांनी व कवनांनी त्यांना हिंदी भाषेतील भक्तिसाहित्यात सुरुवातीचे कवी म्हणून मानाचे स्थान प्राप्त करून दिले. नामदेवांच्यानंतर साठवर्षांनी जन्मलेल्या प्रसिद्ध गुर्जर संत नरसी मेहता यांनी आपल्या भजनात अनेकदा नामदेवांविषयी गौरवोद्‌गार काढले आहेत. मीराबाईच्या काव्यातही त्यांचा आदरपूर्वक उल्लेख आला आहे. शिखांचा पवित्र धर्मग्रंथ 'गुरुग्रंथसाहिब' मधे नामदेवांनी रचलेली अनेक भजने आहेत. त्यांत त्यांच्या जीवनातल्या अनेक चमत्कारपूर्ण घटनांचा उल्लेख आला आहे. उदा. विठ्ठलाने त्यांच्या हातून प्रसाद भक्षण करणे, त्यांच्या घराचे छप्पर शाकारून देणे, औंढ्या नागनाथाचे देऊळ फिरणे, मेलेली गाय जिवंत करणे, इत्यादी.

नामदेवांनी काशी क्षेत्री अनेक वर्षे निवास केला. पंजाबमध्ये गुरुदासपूर जवळ, अमृतसर जवळ घुमान येथे, हरिद्वार जवळ ज्वालापूर या ठिकाणी त्यांचे दीर्घकाळ राहणे झाले. घुमान इथे नामदेवांचे प्रसिद्ध मंदिर आजही आहे. तिथे दरसाल मोठी यात्रा भरते. राजस्थानमध्ये जयपूर, जोधपूर, अलवर, बिकानेर, पुष्कर, सांगानेर व इतर अनेक ठिकाणी नामदेवांची मंदिरे आहेत. महाराष्ट्राच्या सीमा ओलांडून दूरदेशी प्रतिष्ठा मिळविणारे नामदेव हे एक आगळे व्यक्तिमत्व होते ही गोष्ट निर्विवाद आहे.

नामदेवांना सामाजिक न्याय, समता, दलितांचा उद्धार या गोष्टींचे

अग्रदूत म्हणावे लागेल. याचा प्रत्यय त्यांनी प्रत्यक्ष आपल्या व्यक्तिगत जीवनातच आणून दिला. दमा आणि करुंड या शूद्र दंपतीची असहाय, अबोध कन्या जनाई हिला त्यांनी आपल्या घरातच प्रवेश दिला व तिचे सातव्या वर्षापासून संगोपन केले. स्वतःशिवाय आई-वडील, चार मुलगे, चार सुना, बहीण, पत्नी, मुलगी व जनाबाई असे त्यांचे पंधराजणांचे कुटुंब होते. सर्वात निम्न समजल्या गेलेल्या महार जातीतील संत चोखामेळा यांच्या मृत्यूनंतर मंगळवेढ्याहून त्यांच्या अस्थी पंढरपुरास आणून नामदेवांनी महाद्वारासमोरच त्यांचे स्मारक केले. नामदेवांनी स्वतः आचरिलेल्या ह्या मानवधर्माचे नैतिक व सामाजिक मूल्य फार मोठे आहे हे कुणालाही मान्य करावे लागेल.

अगदी अलीकडच्या काळात नामदेवांच्या काही अभंगांना सुप्रसिद्ध गायक गायिकांच्या आवाजाची जोड मिळून ते सर्वांच्या नित्य परिचयाचे झाले आहेत. सोपी सरळ भाषा, भावनांचा सुंदर उन्मेष आणि प्रासादिक प्रवृत्तींची बैठक ही वैशिष्ट्ये नामदेवांच्या सगळ्याच अभंगांत आढळतात. त्यांचे काही लोकप्रिय अभंग सांगायचे झाल्यास पुढील अभंगांचा उल्लेख करण्याजोगा आहे.

१) पतितपावन नाम ऐकुनी आलो मी द्वारा

२) प्रभाती चारियासी जावे, ३) सुखाचे हे सुख श्रीहरी मुख

४) देह जावो अथवा राहो, ५) बोलू ऐसे बोल जेणे बोले विठ्ठल डोले, ६) अमृताहुनी गोड नाम तुझे देवा, ७) माझा भाव तुझे चरणी

डॉ. कालिदास जोशी
एफ ३०५, रम्यनगरी, पुणे ३७.
फोन. नं. ५१९२२९











# 'नामयोगा'चे मेरू सहजयोगी नामदेव

श्री. वि. श्री. फणसळकर

एम. ए. (मराठी)

आयकर सेवा निवृत्त सुपर वायझर
पुस्तके, पु. बाबामहाराज आर्वीकर यांचे दिव्य जीवन दर्शन, विले पार्ले अमृत स्मृतिग्रंथ खंड १ श्री. रा. ग. बर्वे यांचेबरोबर

'आकारला देव नामरूप झाला । म्हणोनी स्थापिला नामवेदी ।।'

'नाम म्हणजे सर्व वेदांचें सार ।'

भक्तियोगात नामस्मरणाला मोठेच महत्त्व आहे. परंतु नामदेवांनी नामाला एक वेगळे परिमाण करून दिले. नामस्मरण हे एक केवळ स्वतंत्र साधन नसून तो पंचमवेदच आहे अशी नामदेवांची भूमिका आहे. 'नामवेद' हा शब्दही नामदेवांनी मराठी साहित्याला प्रथम दिला. ऐतिहासिक काळात मराठ्यांनी अटकेपार झेंडा फडकाविला परंतु त्यापूर्वी कित्येक वर्षे महाराष्ट्राची आणि भागवतधर्माची पताका पंजाबात नाचविली. इस्लामिक आक्रमण चालू असताही उत्तरेकडील हिंदूंना नामदेवांनी केवळ भक्तीसाठीच गोळा केले हे केवढे आश्चर्य !

बालभक्तीचे साक्षात् उदाहरण म्हणजे संत नामदेव होत. त्यांच्या अशा कथा त्यांच्या चरित्राभोवती निगडित झालेल्या आहेत. बालपणीच्या त्यांच्या तीव्र भक्तीमुळेच पांडुरंगाने नैवेद्य/ग्रहण केला अशी ही त्यांची वत्सलभक्ती होती.

नामदेवांच्या 'पक्षिणी प्रभाती चारियासी जाये । पिलू वाट पाहे उपवासी ।। तान्हे वत्स घरी बांधलेले देवा । तया हृदयी धावा माऊलीचा ।।'

अशा कितीतरी ओळी आपल्या मनात घर करून राहिलेल्या असतात.

नामदेवांच्या शेकडो अभंगांतून वत्सल भक्तीचा अविच्छिन्न प्रवाह वाहताना दिसून येतो.

'तू माझी माऊली मी गो तुझा तान्हा । पाजी प्रेम पान्हा पांडुरंगे ।।'

घरगुती वातावरणातून असे मनाला चटका लावणारे, जिभेवर नाचणारे अभंग ठायी ठायी नामदेवगाथेत विखुरले आहेत.

बालपणापासून 'विठ्ठल केवळ माझाच आहे, तो प्रत्यक्ष माझ्याशी बोलतो, माझ्या हातचा नैवेद्य खातो. सखा म्हणून सगुण स्वरूपात वावरतो या समाधानातच ते कितीतरी काळ होते.

पुढे नामदेव ज्ञानदेवांच्या भेटीसाठी आळंदीला गेले तेव्हा भगवंताशी असलेले त्यांचे सान्निध्य जाणून निवृत्तिनाथ व ज्ञानदेव नामदेवांच्या चरणी लागले. परंतु नामदेव आपल्या आत्मरत भावातच असल्यामुळे त्यांची वृत्ती 'काय वंदू याचे चरण । अंगी परब्रह्म मज लागी ।।' अशी होती. मुक्ताबाईचा स्वभाव परखड असल्याने तिने नामदेवांना नमस्कार केला नाही. ती म्हणाली, 'अखंड जयाला देवाचा शेजार । काय अहंकार गेला नाही ।।' 'मान अभिमानी वाढविसी देवा । दिस असता दिवा हाती घेसी ।।' हे तिचे उद्गार ऐकून नामदेव वरमले. अंतरी आपण कोरेच राहिलो ही जाणीव त्यांना मुक्ताबाईने करून दिली. मुक्ताबाई एवढ्यावरच थांबली नाही. तिने गोरोबा कुंभाराकडून 'अनुभवाचे थापटणे' नामदेवावर चालविले व अजूनही नामदेव 'कच्चा घट' असल्याचा निवाडा संतमंडळींकडून करून घेतला.

यापुढचा प्रसंग म्हणजे नामदेवांची आणि विसोबा खेचर यांची आवंढ्या नागनाथ मंदिरात झालेली भेट होय. नागनाथाच्या मंदिरात नामदेव गेले तेव्हा शिवपिंडीवर पाय ठेवून निजलेले विसोबा खेचर त्यांना दिसले. साहजिकच नामदेवांच्या मनात विस्मयाबरोबरच विसोबा खेचरांच्या साधुत्वाविषयी किंतु निर्माण झाला. विसोबांनी त्यांना आपले पाय दुसरीकडे हलविण्यास सुचविले. नामदेवांनी तसे करताच तेथेही शिवलिंग निर्माण झालेले नामदेवांनी पाहिले. अखेर या प्रसंगाद्वारे देव जिकडे तिकडे भरलेला आहे. 'देवाविणे रिता ठावच नाही' हे सत्य नामदेवांनी अनुभवले. नामदेवांच्या भक्तीची कक्षा उंचावली. नामदेव शरण आले. विसोबांनी त्यांना नाममंत्र दिल्यावर नामदेव कृतार्थ झाले. विसोबावरील आपल्या अभंगात नामदेव म्हणतात, 'श्रवणी सांगितली मात, मस्तकी ठेविला हात । पदपिंड विवर्तित केला नामा ।।'

बाळपणीचा नामदेव आता राहिला नाही. तो म्हणू लागला,

'पाषाणाचा देव बोलत भक्ताते । सांगते ऐकते मूर्ख दोघे ।।'

नामाचे महत्त्व अवर्णनीय आहे. नामसाधना ही संतप्रणीत उपासना मोठ्या मोलाची आहे. जीवन शुद्ध व अशुद्ध करण्याचे संकल्प हे एक महासाधन आहे. यासाठीच पवित्र नाम सतत घ्या असा संतबोध आहे. त्यात शुद्ध संकल्प असतातच. नाम हा ईश्वर निश्वसित प्रथम संकल्पच आहे. तो ईश्वराप्रमाणे पवित्र व दिव्यच असतो. नामसाधना ही सुलभ आहे, ती परम दिव्यतेचे दान देणारी आहे. म्हणूनच 'नामात् एवतु कैवल्यम्' असेही म्हटले जाते. नाम हे सकलसाधनेचे सार व मूल्य आहे. नामावाचून साधना शक्य नसते. मग ते नाम 'सोऽहम्', ॐ वा रामकृष्ण कोणतेही असो. नाम हे परमार्थ सफल करणारे पवित्र सुलभ आणि उच्च साधन आहे.

नामाने केवळ व्यक्तिउद्धार होतो असे नाही. विश्वोद्धार व सर्वजग परिशुद्ध करण्याचे नामस्मरण हे मोठे अनुपम साधन आहे.

नामाचा महिमा काय सांगावा ! 'सारे जग जर सुखरूप करण्याची इच्छा असेल तर प्रत्येक निश्वासात आपले संकल्प शुद्ध ठेवावेत. नामस्मरणाच्या सुलभ साधनात जीवन व्यतीत होऊ लागताच प्रत्येक श्वास ज्या पुरुषाचे नाम असेल त्याच्याकडे फेकला जातो आणि नामीचे

दिव्यत्व नामस्मरण करणाऱ्या व्यक्तीला लाभू लागते. हा संबंध जसजसा वाढेल तसतसा तो संकल्प प्रियशक्तीच्या प्राणद्रव्याचा आधार घेतो आणि यामुळे नामधारी जीवाच्या बाह्य शरीरातही फेरफार घडू लागतात.'

नामसाधनेची दिव्यता भक्तियोगातून सहजावस्था सहजयोग आणि इतरही ज्ञानेश्वरप्रणीत मौलिक विचारांचे साधार साक्षात्कारी विवेचन ब्रह्मीभूत बाबामहाराज आर्वीकर यांनी आपल्या दिव्यामृतधारा ग्रंथात अधिकारवाणीने केले आहे ते जिज्ञासूंनी पाहावे.

नामदेव हे भक्तियोगी संत आहेत. या भक्तियोगालाच ब्रह्मीभूत बाबामहाराज आर्वीकर यांनी उपरोक्त ग्रंथात 'सहजयोग' असे नामाभिधान दिले आहे. यासंबंधीचे विवरण करताना गुरु-शिष्य एकमेकांत कसे मिसळतात हे सांगताना ते म्हणतात 'गंधाने पाकळ्यातून क्रीडावे व फुलाने गंधास अंगावर धरावे पण प्रकट मात्र फुलाने व्हावे व आपल्या गंधास वितरित करावे. कसे एकजीव आहेत ते दोन्ही !'

ज्ञानदेव व नामदेव या उभयतांच्या वृत्ती भिन्न होत्या. ज्ञानदेव अन्तर्मुख तर नामदेव अन्तर्मुख असूनही प्रसंगी बहिर्मुख होतात. दोघांची कर्तृत्वे परस्परांना पोषकच ठरलेली आहेत. श्रीबाबामहाराज पुढे म्हणतात, 'गुरुकृपेच्या कल्लोळांत जीवाला 'जीवपण' उरत नाही व आत्मपणा येत नाही. तेव्हा या कल्लोळात डुंबलेल्या जीवाला कोठे व कसे ठेवावे, याचा विचार ज्ञानदेवांनी आपल्या व्यवस्थेप्रमाणे केलेला असतो. याचा अर्थ शिष्यरूप न बदलविता त्याला गुरुता अनुभवावयास देतात. असे होणे म्हणजे 'सहजयोग' घडणे होय. हे गुरुतत्त्व शिष्याच्या जीवदशेत आपणच पूर्णत्वाने जेव्हा विलसते, तेव्हा हा 'सहजयोग' प्राप्त होतो. त्यांनी असे विलसणे म्हणजे जीवावर 'कृपा' करणे होय. अशा प्रकारचा योग सहज का ! तर गुरुता प्राप्त होण्यास येथे शिष्याचे काडीएवढेही कर्तृत्व नसते. एवढे खरे की तो गुरुप्रेमरत असावा लागतो. म्हणजे श्रीगुरुच आपल्या कृपेच्या धारेतून आपल्या आंतरिक पूर्णावस्थेचा प्रकाश शिष्यरूपात प्रकट करतात. म्हणूनच यास नैसर्गिक असा 'सहजयोग' म्हणता येते. विभिन्नतेतून अभिन्नतेचा ओवलेला धागा होणे ही 'सहजावस्था' होय.' (दिव्यामृत खंड १ ला, पृ. १८१-१८२).

अखंडपणे गुरुप्रेमात असणे, सर्वसमर्पणभाव असणे या परते इथे शिष्याला काही करावे लागत नाही. श्रीगुरु म्हणजे भूलोकीचे प्रत्यक्ष परमेश्वरस्वरूपच. नामदेव हे या सहजयोगाचे वा आत्मसमर्पण भावाचे 'नामवेदा'च्या रूपाने निरूपण करीत कीर्तन करीत होते.

(नामदेवांच्या विविध पैलूंपैकी एका पैलूचा हा आविष्कार आहे.)

श्री. वि. श्री. फणसळकर
फाटक वाडी, राममंदिर रस्ता,
विलेपार्ले (पूर्व), मुंबई ४०० ०५७.



# भक्ताग्रणी नामदेव आणि अद्वैत

**डॉ. गजानन मो. पाटील**

एम. ए. एल. ए. बी. पी. एचडी

मुंबई व महाराष्ट्रात शासकीय महाविद्यालयांत संस्कृत, मराठी, प्राचीन भारतीय संस्कृती वगैरेचे अध्यापक. भाषाशास्त्र, सौंदर्यशास्त्र योग आदि विषयाचे अध्यापक. तत्त्वज्ञान, धर्म, संत साहित्य वगैरे अनेक विषयांवर विविध मासिकांतून लेख.

महाराष्ट्रातील वारकरी संप्रदायाला अद्वैत वेदान्ताची पार्श्वभूमी आहे असे सामान्यतः मानण्यात येते. पण अद्वैत वेदान्त ही स्थूल संज्ञा झाली. अद्वैत वेदान्ताच्या किमान सात तरी शाखा भारतीय दर्शन शास्त्रात मान्य केल्या आहेत. आद्य शंकराचार्यांचा केवलाद्वैत वाद, रामानुजाचार्यांचा विशिष्टाद्वैत वाद, वल्लभाचार्यांचा शुद्धाद्वैतवाद, निम्बार्माचार्यांचा द्वैताद्वैतवाद, चैतन्यप्रभूंचा अचिन्त्य भेदाभेद वाद, ज्ञानेश्वरांचा चिद्विलास वाद आणि काश्मिरी शिवाद्वैत वाद ! शाक्तांचा पण अद्वैतवादच आहे. ह्यापैकी चार शाखा वैष्णवी आहेत तर शेवटीची एक शैव आहे. उरलेल्या दोन ह्या निरीश्वरवादी आहेत. निरीश्वरवाद म्हणजे ईश्वराला न मानणे. पण येथे जगाचे मूलकारण म्हणून ईश्वराला मान्यता नाही तर, जगाचे उत्पत्तिकारण म्हणून ईश्वर मानला आहे. ज्ञानेश्वरांनी तत्त्वज्ञान म्हणून ईश्वर नाकारला (अनुभवामृत १.२९) पण आचरणाचा धर्म म्हणून पांडुरंगाची उपासना केली. केवळ शक्तीचे किंवा ऊर्जेचे म्हणजे ब्रह्माचे अस्तित्व ह्या विश्वाच्या उत्पत्तीला कारणीभूत आहे असा उपनिषदांचा सिद्धान्त (ईशवांनी : छांदो ३.१४१ उक्र. १३६ तैति. ३.१) आहे. ह्या औपनिषदिक ब्रह्मालाच वैष्णवाची विष्णू किंवा कृष्ण किंवा हरी असे नाव ठेवले तर शैवांनी त्याला परमशिव म्हटले आहे. खरे तर ज्ञानदेवांनी ह्या विषयीचे विज्ञान अत्यंत सुंदर आणि मार्मिक शब्दांत स्पष्ट केले आहे.

**। तुज सगुण म्हणू की निर्गुण रे । सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ।।**

अर्थात जगाचा उत्पत्तिकर्ता, रक्षणकर्ता आणि संहारकर्ता अशा तीन देवांची आवश्यकता न भासता एकच देव आपल्या विविध शक्तीने हे कार्य करू शकतो. ह्यासाठी तो सगुण-साकार असलाच पाहिजे असे नाही तर तो निर्गुण निराकारही असू शकतो. किंबहुना दुसऱ्या एका संतोक्तिने ह्यांचा पूर्वापरभाव विशेष स्पष्ट केला आहे.

सगुणाचें संगें आलों आम्ही । निगुर्णाचे भेटी ।।

आधी सगुणोपासनेपासून प्रारंभ होतो आणि त्या उपासनेतून ज्ञानोत्पत्ती झाली की त्यांची परिणती निर्गुणोपासना ! निर्गुणोपासना हे ध्येय किंवा संत, सगुणोपासना हे साधन किंवा प्रारंभ ! आणि हा तर्कशुद्ध आणि नैसर्गिक क्रम म्हणावा लागेल; कारण कोणीही मानव झाला तरी त्याला केवळ निर्गुणोपासना ही अशक्यच आहे. कदाचित् भगवद्गीतेच्या कथनाप्रमाणे

**। अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ भ. गी. १२.३**

अव्यक्त, निर्गुण, निराकाराची भक्ती, उपासना वा अर्चना ही ज्ञानेंद्रियांच्या द्वारेच ज्ञान मिळवणाऱ्या माणसाला कठीणच. त्या निर्गुणाची उपासना ध्यानाद्वारेच होते.

**ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनः ।**

योगीजन ध्यानावस्थेमध्ये भले त्याची उपासना करीत असतील, पण सामान्य व्यक्तीच्या व्यवहारामध्ये निर्गुण वा निराकार वा अव्यक्त ही केवळ कल्पनाच असू शकते. ही ध्यानावस्था केवळ योगमार्गानेच प्राप्त होते असे नाही तर

**ईश्वर प्रणिधानाद् वा । पा.यो.सू. १.३**

ईश्वर प्रणिधानाने पण समाधी अवस्था प्राप्त होते. ईश्वर प्रणिधान हापण एक मार्ग आहे. किंबहुना स्याणू निरुनन न्यायावर पुन्हा त्याला दुजोरा देताना ते म्हणतात,

**समाधिसिद्धी ईश्वर प्रणिधानात् । पा.यो.सू. २.४१**

ईश्वर प्रणिधानाने समाधि सिद्ध होते असे दृढ विधान त्यांनी केले आहे. महाराष्ट्रातील संतांची पांडुरंगावरील अपार, अथांग आणि अचल भक्तीच त्यांना समाधी अवस्थेपर्यंत पोहोचविण्यास पायाभूत झाली होती असे विधान चूक म्हणता येणार नाही. त्यांनी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधी ह्या अष्टांग योगाचा अभ्यास केल्याचा कुठे उल्लेख नाही. उलट त्यांनी यमनियमनादि योगाची निर्भर्त्सनाच केल्याचे आढळते.

भक्ताग्रणी नामदेवांच्या जीवनातील प्रसंग पाहिल्यास आपणास काही निश्चित असा धागा मिळू शकतो. त्यांची 'कटेवरी हात' आणि 'विटेवरी उभा' असलेल्या विठ्ठलावरील विशुद्ध अंतःकरणाची अविचल भक्तीच त्यांना योगमार्गातील विभूतीपर्यंत म्हणजे सिद्धीपर्यंत पोहोचविण्यास कारणीभूत झाली. अर्थात् पूर्वजन्मीच्या संस्कारांचा फार मोठा भाग आहे त्यात. त्या सिद्धीमुळेच त्यांनी पाषाणमय जड मूर्तीला दूध प्यायला लावले. परमात्मा, सचेतन जीवात्मा आणि अचेतन सृष्टी ह्यांचा संबंध अथवा कार्यकारण भाव त्यांना तेव्हा सुतराम् ठाऊक नव्हता. किंबहुना त्या विशिष्ट रूपातील मूर्ती म्हणजे सर्वश्रेष्ठ परमेश्वर अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. थोडेसे स्पष्टच म्हणावयाचे तर साक्षात परमेश्वर आपणाशी बोलतो, खेळतो ह्याचा त्यांना अहंकार झाला होता आणि म्हणूनच त्या चिमुकल्या मुक्ताईने गोरोबाकाकांना थापटण्याने मडकी तपासायला सांगितले. गोरोबाकाकांचा वडिलकीचा मान म्हणून

इतर सर्वांनी थापटणे मारले तरी हुं का चूं केले नाही, पण नामदेवांचा अहंकार दुखावला व त्यांनी नाराजी व्यक्त केली. तेव्हा गोरोबाकाका म्हणाले,

गोरा म्हणे कोरा राहिला गे बाई
शून्यभर नाही भाजियेला ।

नामदेव संतापले आणि त्यांनी विठ्ठलाकडे तक्रार केली, तेव्हा विठ्ठलांनीपण तेच सांगितले. ह्या ठिकाणी एक सिद्धान्त स्पष्ट होतो की विशुद्ध ज्ञानाशिवाय भक्ती म्हणजे केवळ बाह्य उपचार ठरतो. अशा भक्तीमुळे समाधान मिळेल, प्रसंगी प्रापंचिक अडीअडचणींचा विसर पडल्यामुळे सुखपण मिळत असेल. इतउपरही मृत्यूतर अवस्थेमध्ये सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता हा मुक्तीचा सोपानमार्गपण अवगत होईल पण तो भक्त्युत्तर ज्ञानाने, केवळ भक्तीने नव्हे. म्हणून विठ्ठलाने त्यांना औंढ्या नागनाथाला विसोबा खेचरांकडे पाठवले. तेथे विसोबांचे लोकविरुद्ध अनोखे वर्तन पाहून नामदेव स्तिमित झाले आणि विसोबांना पिंडीवरून पाय खाली ठेवण्यास सांगितले. हजार उद्‌बोधक प्रवचनांपेक्षा एक साक्षात् अनुभुती श्रेष्ठ आहे हे ओळखून विसोबांनी नामदेवांनाच पाय खाली ठेवण्यास सांगितले. तो काय आश्चर्य ? नामदेव जेथे पाय ठेवतात तेथे शिवलिंग. पाय ठेवायला जागा नाही. शेवटी नामदेव शरण गेले. विसोबांनी त्यांना उपदेश केला.

सर्वकाळी परमात्मा आहे सर्व देशी । भावना हे अहर्निशी दृढ धरी ।।
संतसमुदाय मिळती जेथें जेथें । जाय लोटांगणीं तेथें तेथें ।।
चिंता न करी नाम्या येणे तरसी जाण । तुज सांगितली खूण निर्वाणीची।।

ईश्वर अणुरेणूत सर्वत्र भरला आहे हा उपदेश विसोबांनी दिला.

तीर्थावळीच्या अभंगावरून असे दिसते की ज्ञानेश्वर आणि नामदेव देहाने बरोबर चालत असले तरी ज्ञानदेव भोवतालच्या परिसराचा आस्वाद घेत अद्वयानंदात मस्त होते, पण नामदेव मात्र कासावीस झाला होता. त्याला पंढरपूरची आणि तेथील विठ्ठलाची सारखी आठवण येत होती.

क्षणक्षण वासरू परतोनी पाहे । वियोग न साहे पंढरीचा । ना.गा. ९१२
न माझे येथे जिवलग कोणी ।।
तो माझा विठ्ठल दावा दृष्टी भरी । आस ती न धरी आणिकाची ।।
ना.गा. ९१३

ज्ञानदेवांनी त्याची समजून काढून विश्वात्मक ईश्वराची भक्ती त्याला पटविण्याचा प्रयत्न केला.

व्यापक विठ्ठल आहे सर्व देशीं । जरी सोडोनिया पाहसी भेद भावा ।।
तो नाही ऐसा ठाव उरलासे कवण । संपूर्ण सकळ गगन असे ।।
जो अक्षर अव्यक्त देशकाल रहित । उपासीत ज्ञानी सोहंभावे ।।
सर्वेंद्रियांसहित आवरोनी चित्ता । मानी अद्वैत नित्यसुखा ।। ना.गा. ९१३

पण ज्ञानदेवसारख्या अधिकारी ज्ञानी भक्ताचा अनुबोध पण नामदेवांच्या आर्तभक्तीपुढे पंगू ठरला.

सर्वमुख आहे मज त्याचे पाशी । आणिकाच्या वारी न पडे करा ।।
ना.गा. ९१३

इतकेच नव्हे तर पांडुरंगाच्या उपस्थितीत त्यांनी अन्य देवांबद्दल जे अनुदार उद्‌गार काढले ते वाचून आश्चर्य वाटते,

तया देवांची भेस न पाहती माझे नयन । न करीती पूजन कर त्यांचे ।।
तेणें पंथें माझे न चलती चरण । न ऐकती श्रवण कीर्ती त्यांची ।।
कटीतटी जेणे कर नाही ठेविलें । न देखों पाऊलें वीटेवरी ।।
त्यासी देव म्हणणे लाजे माझे मन । ते कष्ट दारूण कोणा सांगू ।।
ना.गा. ९२३

दोन्ही कर कटेवर ठेवून विटेवर उभे असलेले रूप म्हणजेच सर्व श्रेष्ठ परमेश्वर म्हणजे परब्रह्म ही त्यांची मनोमन धारणा !

नामदेवांच्या वारकरी संप्रदायाला अनुसरून अद्वैताची चाचणी वाचकांसाठी देत आहे.

ज्ञानेश्वरांचा चिद्‌विलास वाद हा शंकराचार्यांच्या केवलाद्वैत म्हणजे मायावादापेक्षा श्रेष्ठ आहे. पण तो मराठी भाषेत असल्यामुळे अभ्यासकांनी उपेक्षिला आहे. त्यांनी शंकराचार्यांच्या मायावादाचे संपूर्ण खंडन केले (अनुभवामृत प्रकरण ७). पण जगद्‌उत्पत्तीसाठी अन्य वैष्णवांप्रमाणे विष्णु वा कृष्ण वा हरी उत्पन्न केले नाही तर त्या परब्रह्माच्या ठिकाणीच स्फूरण आले आणि त्यातून ही सृष्टी उत्क्रांत झाली. तो चैतन्याचा म्हणजे चित् शक्तीचा विलास आहे म्हणून तो चिद्‌विलास वाद ! अनुभवामृताच्या प्रदीर्घ अशा सातव्या प्रकरणात ज्ञानोबांनी अज्ञान खंडन करून मायावाद साफ झिडकारून टाकले आहेच, पण विशेष आश्चर्याची, अभिमानाची आणि आनंदाची गोष्ट अशी की जगातील कोणाही दर्शनकाराने न सांगितलेला असा अपूर्व सिद्धांत सांगितला की परमसत्याच्या दृष्टीने पाहिले तर परमात्म्याच्या ठिकाणी ज्ञान नावाची पण गोष्ट नाही. म्हणून अनुभवामृताच्या आठव्या प्रकरणात ज्ञानखंडण पण केले आहे. कारण ज्ञान म्हटले की ज्ञाता आणि ज्ञेय हे दोन पदार्थ अपरिहार्य ठरतात. परंतु सर्व ब्रह्मच असले तर, बृहदारण्य प्रतिपदातील दुसऱ्या अध्यायाच्या चतुर्थ ब्राह्मणात चौदाव्या खंडात म्हटल्याप्रमाणे, 'यत्र वा अस्य सर्वमात्मैयाभूत केन कं जिघ्रेत... विज्ञानातारमरे केन विजानीयात्' तर ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुरीच लुप्त होते.

शैव सिद्धान्तामध्ये परमशिव हाच परमात्मा मानून अन्य सर्व विवरण जवळ जवळ वैष्णवांच्या प्रमाणेच केले आहे. शाक्त सिद्धान्ताची पण तीच गोष्ट !

ह्या विवेचनाप्रमाणे वारकरी संप्रदाय हा जवळ जवळ वैष्णवच आहे. त्याला भागवत संप्रदाय असेपण म्हणतात. त्याला अद्वैत सिद्धान्त हा असलाच तर रामानुज अथवा वल्लभांच्या किंवा निंबार्कांच्या पद्धतीचा अद्वैत सिद्धान्त असावा. पण शंकराचार्यांचा केवलाद्वैत वाद अथवा ज्ञानेश्वरांचा चिद्‌विलास वाद ह्यामध्ये तर तो मुळीच मानता येणार नाही. कारण त्या ठिकाणी ब्रह्म हे निर्गुण, निराकार अव्यक्त आहे पण येथे पांडुरंग हा सगुण, साकार आणि व्यक्त आहे. तुकोबारायांनी म्हटल्याप्रमाणे,

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ।।

विष्णूने किंवा विठ्ठलाने सर्व जग व्यापले आहे हा वैष्णव संप्रदायात

बसणारा भाग झाला. पण नामदेवरायांची आर्त भक्ती तर ह्याच्याही पुढे जाते. वर तीर्थावळीतील दिलेल्या विवेचनानुसार ह्यांना, ती एकमेव मूर्ती म्हणजे परमेश्वर आणि मी त्यांचा आवडता परम भक्त असे दिसते.

भक्ताग्रणी नामदेवमहाराज हे आर्तभक्त होते असे वर विधान केले आहे. ह्या ठिकाणी आर्त शब्दाचे विशेष आवश्यक विवेचन वाटते. आर्त हा शब्द भगवतगीतेच्या ७.१६ या श्लोकात आला आहे. भगवंतांच्या चार प्रकारच्या म्हणजे आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी आणि ज्ञानी ह्यापैकी तो पहिल्या क्रमांकाचा भक्त आहे. आणि या शब्दाचा शंकराचार्य अर्थ देतात, 'आर्ति परिग्रहीत तस्कर व्याघ्र रोगादिना अभिभूतः ।' रामानुज म्हणतात, 'प्रतिष्ठा हीनो भ्रष्टैधर्यः पुनरज प्राप्तु भामः ।' लो. टिळक गीतारहस्यात म्हणतात, 'आर्त म्हणजे रोगाने पीडलेला.' तर राधाकृष्णन् सांगतात, 'The man is distress, the aflicted वगैरे'. आर्त ह्याचा सर्वांनी दिलेला अर्थ रोगाने, भीतीने, प्रतिष्ठाहानीने किंवा संकटानी पीडलेला असा आहे. कोशकार आपटे कामार्त, क्षुधार्त, तृषार्त ही उदाहरणे देऊन गांजलेला, पीडलेला असलेला असा अर्थ करतात. पण एखाद्या गोष्टीसाठी तळमळणारा, आसुसलेला अर्थ कोणीच देत नाही. नामदेवांचे उदाहरण पाहिल्यानंतर 'दर्शनार्त' म्हणजे दर्शनासाठी तळमळणारा, व्याकुळ झालेला, आसुसलेला असा चतुर्थी तत्पुरुष समास करून आर्त शब्दाची एक नवी छटा स्पष्ट करावी असे वाटते. भ.गी. ७.१६ पण हा अर्थ जमून जाणारा आहे खास !

पसायदानामध्ये 'विश्वात्मक' असा शब्द आला आहे (आता विश्वात्मके देवें) त्या शब्दाला प्रत्यभिसादर्शनात किंवा नाथसंप्रदायात एक विशिष्ट अर्थ आहे. परमेश्वराच्या ठिकाणी विश्वाची उत्पत्ती स्थिती आणि लय करण्याची विविध शक्ती आहे. परमेश्वर विश्वाचे सृजन करून त्याला सुस्थितीत चालवतो तेव्हा तो विश्वात्मक असणे म्हणजे विधायक, रचनात्मक कार्य करणारा परमेश्वर विश्वात्मक. पण ह्याचा उलट 'कालोऽस्मि लोकक्षयकल्पक्षः' (लोकानामाहर्तुमिह प्रवृत्तम) असा. भ.गीतेतील ११. अ. श्लोकात म्हटल्याप्रमाणे तो रिपूसंहारक किंवा विघातक कार्य करतो जेव्हा त्याला **'विश्वोतीर्ण'** असे म्हटले जाते, तेव्हा विश्वोत्तीर्णाच्या प्रतिपक्षी म्हणून **विश्वात्मक** शब्दाचा विशेष अर्थ लक्षात घेणे जरूर आहे.

अस्तु. एकूण नामदेवरायांच्या **काव्यात** सगुण व निर्गुण, साकार व निराकार, व्यक्त आणि अव्यक्त ह्यांचेच अद्वैत झाले असून अनेकांत एकत्व ह्याचा साक्षात्कार तेथे होतो. इतिशम् ।

डॉ. गजानन मो. पाटील
१, खोत चाळ, अक्षीकर मार्ग,
दादर (प.), मुंबई ४०० ०२५,
दूरध्वनी ४३७३१४०

# संत नामदेवांच्या नवविधा भक्ती - आत्मनिवेदन

**श्री. गजानन शं. खोले**

ज्येष्ठ पत्रकार १९६४-९० संपादकीय विभाग सकाळ. स्वातंत्र्य सैनिक. पुरस्कार - करवीर पीठ - वनश्रीज्ञान पंडित, चिंचवड भूषण पुरस्कार, श्रीमोरया गोसावी संस्थान, पुणे महानगरपालिकेतर्फे प्रशस्तीपत्र व स्मृतिचिन्ह. श्रीदेवदेवेश्वर पर्वतीसंस्थान पुरस्कार, जिनसिवाले, विद्यावाचस्पती गुणे पुरस्कार, कै. मनीषा पिंगळे, एम.आय.टी सत्कार. वेदविज्ञान मंडळाचे प्रमाण पत्रकम् रुद्रवाणी तर्फे, पु. ल. देशपांडे गुणगौरव सन्मान पत्र. पुणे पत्रकार संघ माजी उपाध्यक्ष पिंपरी चिंचवड पत्रकार संघ संस्थापक, सदस्य माजी अध्यक्ष. २९ लहान-मोठी पुस्तके प्रसिद्ध.

## आत्मनिवेदन

आत्मनिवेदन हा नवविधा भक्तीतील सांगतेचा म्हणजे शेवटचा प्रकार आहे. आत्म + निवेदन या दोन शब्दांचा मिळून हा एक जोड शब्द निर्माण झालेला आहे.

आत्मन या संस्कृत शब्दापासून आत्मा हा शब्द बनलेला आहे. हा शब्द समासात प्रथमपदी येतो तेव्हा 'न्' लोपतो. उदाहरणार्थ आत्माराम! आत्माराम या शब्दाचे स्वसंतुष्ट, जीवात्मा असे अर्थ आहेत. आणि प्रत्येक प्राणिमात्राचा आत्मा हा श्रीराम स्वरूप म्हणजेच परमात्मा स्वरूप असतो हा त्यातील भावार्थ आहे. आपला आत्मा हा आपल्यापाशीच असतो. त्यावरून स्वतःचे, स्वतःपाशी असलेले, असे त्याचे अर्थ झालेले आहेत. निवेदन हा संस्कृत शब्द आहे. सांगणे, हा या शब्दाचा प्रचलित अर्थ बहुतेकांना ज्ञात आहे. पण या शब्दाचा आणखी एक अर्थ आहे, अन् तो म्हणजे काही वस्तू कोणेकाला देणे किंवा अर्पिणे होय. आपण देवपूजा झाल्यावर देवाला निवेद तथा नैवेद्य दाखवितो, हेही शब्द मूळ संस्कृत भाषेतीलच असून आपल्या देवास अर्पिलेले किंवा अर्पावयाचे अन्न किंवा खाद्यपदार्थ असा निवेद्य-नैवेद्य या शब्दाचा अर्थ आहे.

पूजा-अर्चा झाल्यावर आपण देवाला दूधसाखर, गुळखोबरे किंवा सणावारी भातभाजी पक्वान्न असे नैवेद्य समर्पण करतो. संत नामदेव हे सुद्धा अशा पदार्थांचा नैवेद्य पंढरीनाथाला रोज अर्पण करीत असत. पण एकदा त्यांनी भगवंताला जो नैवेद्य समर्पण केला तो आत्मनिवेदन भक्तिशी संलग्न असून तो त्यांचा नैवेद्य जगावेगळा आहे. कोणता तो आता आपण पाहू या त्यांच्या पुढील अभंगातून -

**देव देव्हारा पाठ हृदय संपुष्ट । मधी कृष्णमूर्ती बसविली ॥ १ ॥**
**प्रेमाचे पाण्याने प्रक्षाळीन तुज । आत्मस्वरूप निज पांडुरंग ॥ २ ॥**
**भावे केलें गंध भक्तींची अक्षता । वाहिली विठ्ठला देवावरी ॥ ३ ॥**
**मन केला मोगरा चित्त केले शेवंती । भक्तीची तुळसी अर्पियेली ॥ ४ ॥**
**धूप दीप आर्ती ओवाळीन तुज । एक केशवराज सकल सिद्ध ॥ ५ ॥**
**त्रिवेणी पक्वान्न केले ब्रह्मार्पण । वांच्छित भोजन अर्पियेले ॥ ६ ॥**
**नामा म्हणे देवा सेवा केली एका। चिप्राण सखा विटेवरी ॥ ७ ॥ ॥ १७५६ ॥**

आत्म + निवेदन याचा अर्थ स्वतःपाशी स्वतःचे असलेले देवाला अर्पण करणे असा हा या जोड शब्दाचा अध्यात्मातील अर्थ आहे. पण हे अर्पण करीत असताना अहंकाररहित होऊन आपले तन मन धन वगैरे आपले स्वतःचे जे काही असेल, ते सारे प्रेममयी अंतःकरणाने, श्रद्धेने परमात्म्याला अपर्ण करणे, हे या नवविधाभक्तीतील आत्मनिवेदनामध्ये अभिप्रेत आहे. नवविधा भक्तीतीला हा परमोच्च प्रकार मानलेला आहे. पण त्यामध्ये आणखी एक महत्त्वाचा भाग लुप्त असतो. या भक्तीत आपण जे भगवंताला अर्पण करणार आहोत, ते काळाबाजार, चोरी, लांडी-लबाडी, लांच आदी असुरीवृत्तीच्या मार्गाने संपादन केलेले असता कामा नये. स्वतःच्या बुद्धीने किंवा घामातून किंवा वडिलोपार्जित संपत्तीमधील वैधमार्गाने आपले झालेले जे असेल तेच देवाला अर्पण करणे, ही गोष्ट यामध्ये अत्यंत महत्त्वाची आहे. मग ती अर्पिलेली गोष्ट किती मूल्याची आहे याला येथे बिलकूल महत्त्व नाही. आत्मनिवेदन या भक्तिमुळे भक्त परमात्म्यामध्ये संपूर्ण विलीन होतो. तो आणि परमात्मा वेगळे आहेत ही द्वैत भावना किंवा जाणीव नाहीशी होत असते.

मी-मी, माझे-माझे या आपल्या भूमिकेमध्ये अहंकार, अहंभाव दडलेला असतो. मरणानंतर आपल्या समवेत काहीही येणार नाही याची प्रत्येक माणसाला पूर्ण जाणीव असते. तरीसुद्धा वृद्धापकाळी अंथरुणावर खिळून असतानाही मृत्यू दिसू लागला असतानाही, अनेकांना 'मीपण' सोडवत नाही. मग अशांना प्राण सोडताना भगवंताचे स्मरण कसे होणार ? विचारांती माणसाने हे मीपण सोडले पाहिजे असे संत नामदेव सूचीत करीत आहेत पुढील अंभगातून...

**मी म्हणें उरलें मायापोटी बालकापाहे तंव कौतुक तेंही नाही ॥ १ ॥ तेथीचें तेथें दंपत्य लोपलें । कळीकाळे मंथिलें नामें थोर ॥ २ ॥ तेंचि घेऊनि ठेलों. मी येथें लोपलों । ब्रह्मींच गुंतलों ब्रह्म माळें ॥ ३ ॥ नामा म्हणे चैतन्या चैतन्य मिळालें । अरूप रूपें ठेलें आपणामाजी ॥ ४ ॥ १७७३**

खरे तर मूलतः विचार करताना ही द्वैत भावना नसतेच, कारण आत्मनिवेदन या शब्दातील आत्मा हा जो शब्द आहे तो आत्मा हाच परमात्म्याचा अंश आहे. आत्मा म्हणजे देह नाही. देह नाशिवंत आहे. आत्मा अविनाशी आहे. आत्मनिवेदन भक्तीला आत्मसमर्पण हाही अर्थ आहे. आत्मसमर्पणात सर्व समर्पण येते, कारण आपल्यापाशी जे काही आहे ते आत्म्यासाठीच मूलतः असते. आत्मा हा आपल्या शरीरात आपण जिवंत आहोत तोपर्यंत राहात असतो. हे सर्व शरीरच भगवंताला समर्पण करणे, म्हणजेच आत्मार्पण होय, याचाच अर्थ त्या परमात्म्याशी एकरूप होणे, आनंदप्राप्ती हा आत्म्याचा स्वभाव आहे. परमात्म्याशी

एकरूप होणे म्हणजे आपणही आनंदरूपी बनणे होय. आत्मा हा परमात्म्याचा अंश आहे, तोच त्याला समर्पण करणे म्हणजे त्याचेच अस्तित्व त्याला अर्पण करणे होय.

ग्रीष्मऋतूत सूर्याचे ऊन कडक पडते. त्यामुळे सागराच्या पाण्याची वाफ होते. ती वाफ आकाशात जाते. तिचे ढग बनतात. तेच पर्जन्यस्वरूपात परत पृथ्वीवर अवतरतात. पृथ्वी सुजलां सुफलाम् करून, पर्जन्याचे ते पाणी नद्यांचे मार्गे परत सागराला मिळते. त्याच्याशी तादात्म्य पावते. हे गंगेचे उदाहरण म्हणजेच आत्मसमर्पण होय. स्वतःचे अस्तित्व मनाने पूर्ण विसरून परमात्म्याशी एकात्म पावणे म्हणजेच आत्मनिवेदन भक्ती !

आपल्याकडे जे सोळा संस्कार आहेत, त्यातील विवाह हा मधला संस्कार. त्यातील लाजा होमातील अग्नीनारायणाला प्रदक्षिणा घातल्यावर त्यात तांदळाच्या शिगेवरून वधू-वर सप्तपदी घालीत असतात. या वेळी हे वधू-वर म्हणजे लक्ष्मीनारायणाचे स्वरूपी असतात बरं कां ! या वेळी तो वर तिला म्हणतो मी तुला स्वामिनी म्हणून स्विकारले आहे. धर्मतत्त्वानुसार मी तुझे सर्वतोपरी पालन-पोषण-संरक्षण करीन. या वेळी वधू त्याला म्हणते, मी तुला पती म्हणून स्वीकारले आहे. आता आजपासून मी तुझ्याशी तुझ्या घराशी एकरूप होऊन तुझ्या आनंदात व दुःखातही सहभागी होईन.

आणि मग त्या वधूचे पूर्वाश्रमीचे नाव-गाव-आडनाव, घरदार सगळे संपुष्टात येते. व्यावहारिक दृष्ट्या आपल्या अध्यात्माने घातलेली त्या वधूची ही आत्मनिवेदन भक्तिच होय.

वैकुंठातील श्रीविष्णूंच्या चरणांमधून उगम पावलेली गंगा शिवशंकरांनी आपल्या मस्तकी धारण केली. ती अखेरी बंगालमधील पूर्वसागराला मिळाली. पंचमुखांनी सागराशी तिचा संगम झाला आणि तत्क्षणीच तिचे गंगा हे नाव, तिच्या पाण्याचे गुणधर्म, तिचे रूप सगळे सगळे काही सांगता स्वरूपी झाले. याचे नाव आत्मनिवेदन. ते आता पाहूया. संत नामदेवांच्या पुढील अभंगातून -

सुख दुःख दोन्हीं आम्हाशीं सारिखीं । प्रतीति पारखीं मना आली ।।१।। अंतर्बाह्य एक ब्रह्मचि कोंदलें ।। दुजेपण गेले निपटोनी ।। २ ।। त्वचा टाकूनियां सर्प गेला बिळीं ।। मग तो सांभाळी कोण सांगा ? ।। ३ ।। ओघ सोडूनिया गंगा सिंधू ठायें ।। विस्तराली धाये खळाळाची ।। ४ ।। नामा म्हणें रात्र जैसी कां पाहाले ।। धारणातें झाले तैसें आम्हां ।। ५ ।। १२४३

काया वाचा मने आपले तनमनधन हे परमेश्वराचे आहे, असे मानून आचरण करणे, चराचरात श्रीकृष्ण सामावलेला आहे, सारे विश्व हेच भगवद्रूप आहे, अशी श्रद्धा भावना मनात बाळगून भक्ती करीत जगणे म्हणजेच आत्मसर्पपण तथा आत्मनिवेदन भक्ती होय.

सृष्टीव्यापक आणि सृष्टीपेक्षाही महान अशा परमात्म्याचा दृश्य जग हा केवळ एक अंशभाग असून, त्या परमात्म्याचे उरलेले तीन भाग मानवी दृष्टीच्या पलीकडील आहेत.

पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही त्याचीच स्वरूपे आहेत. ती कशी आहेत - निराकार ! निराकार स्वरूपाशी एकात्म पावणे माणसाला फार कठीण असते. समजा वायू हा देव आहे. त्याच्याकडे बघत आपण वंदन करीत बसलो तर ते फार वेळ जमू शकेल का ? तेव्हा अशा या निर्गुण निराकार असलेल्या भगवंताला संत नामदेव अगदी मनमोकळेपणाने पण स्पष्ट शब्दात सांगत आहेत -

निर्गुणपणाच्या घेसी अभिमाना । तुज नारायणां न सोडी मी ।। १ ।। काय तुझी भीड धरावी मी आता । कृपालु बा अनंता देव राया ।। २ ।। पुंडलिकासाठीं उभा राहिलासी । ठकडा तूं होसी मजलागी ।। ३ ।। नामा म्हणे नको मज चाळवण । लवकरी चरण दावा मज ।। ४ ।।

निर्गुण निराकार असलेल्या परब्रह्मावर संत नामदेव कसे रागावले ते आताच आपण त्यांच्या वरील अभंगातून ऐकलं. पण प्रेम-ममता करणाऱ्यांचा राग त्या माणसावर फार काळ टिकूच शकत नाही. नदीला महापूर आला तरी तो काही काळानं ओसरतोच की नाही? तसंच असतं अशा प्रेममयी रागाचं ! अगदी असंच झालंय् पहा संत नामदेवांच्या मनाचं ! निर्गुण असलेल्या पांडुरंगाच्या सगुण स्वरूपाचे वर्णन ते करीत आहेत. आत्मनिवेदनपर भक्तितून-जीवीचिया खुणा भक्ता सांगे या अक्षर शब्दांमधून !

बाहेरी भितरी पाहतां दिसे एकू । उभा असे व्यापक पंढरीरावो ।। १ ।। पंढरीचा राणा विटेवरी जाणा । जीवींचिया खुणा भक्ता सांगे ।। २ ।। गुंतलो संसारीं भरलो कर्मभांडारीं । विषयामाझारी मोहियेलें ।। ३ ।। नामा म्हणे केशवा माझें उणे न पाहीं । चरणसेवा देई जन्मोजन्मीं ।। ४ ।। १६७५

कोणतेही घर घ्या त्यात बाल, तरुण, वृद्ध अशा वयोमानाची, आजोबा, आजी, आई-वडील, भाऊ-बहीण अशा नात्यागोत्याची मंडळी असतात. प्रत्येक घरात कधी ना कधी तरी अडचणी, प्रश्न निर्माण होत असतात. अशा वेळी घरातील बाल किंवा तरुण मंडळी त्या अडीअडचणी मोठ्या माणसांच्या कानांवर घालतात. मोठ्या माणसांनी जीवनात अनेक ऊन-पावसाळे पाहिलेले असतात. त्यामुळे ती अशा प्रसंगी मनाने डगमगून जात नाहीत. उलट त्यातून मार्ग काढतात आणि आपल्या मायेच्या छायेची सावली सर्व लहानग्यांवर धरतात. घरातील ही वयस्कर मंडळी म्हणजे त्या कुटुंबातील कल्पवृक्ष, अशी उदात्त भावना व्यक्त झालेला संत नामदेवांचा पुढील अभंग... पांडुरंगाच्या स्वरूपात !

कल्पतरुतळीं बैसलिया । कल्पिले फळ न पाविजे ।। १ ।। कामधेनू जरी दुभती । तरी उपवासी कां मरावें ।। २ ।। उगे असा उगे असा । होणार तें होय जाणार तें जाय ।। ३ ।। नामा म्हणे केशवा काय तुझी भीड । संतां महतां देखता सांगेन तुझी खोड ।। ४ ।। १६०५

परब्रह्म म्हणजेच भगवंत, म्हणजेच सूर्यनारायण ! हा सूर्यनारायण सगळ्या आकाशाला पूर्णपणे व्यापून टाकणारा आहे. पण त्याला डावलूनसुद्धा भक्त वैकुंठात जाऊ शकतो. आत्मनिवेदन भक्तीत मनाचे सामर्थ्य किती मोठे आहे ते नामदेव महाराज सांगत आहेत, पुढील अभंगातून --

एक भानु अवघा सृष्टीचा सोहळा । व्यापूनि सकळा आकाशासी ।। १ ।। पवन सिंधुवरी मनवेगें पाखरी । मार्गु षट्चक्री वैकुंठासी ।। २ ।।

तोचिभोगी सुख चिदानंदी वास्तु । संतसंगें प्रकाशु सफळ मग ।। ३ ।। नामा म्हणे यासी गुरुकृपा पाहिजे । संतसंगें पाविजे केशव चरण ।। ४ ।। ८५४

असं म्हणतात की, जे असे मनी ते दिसे स्वप्नी ! संत नामदेवांच्या मनात सतत विठ्ठलाचाच ध्यास होता. स्वाभाविक तो त्यांना अभंगरूपाच्या स्वप्नातून कसा अवतरला आहे, ते आता पाहूया पुढील अभंगातून - देह मंदिराभीतरीं । शेजे सूतलें श्रीहरी । निद्रा उन्मनीचे भरी । तें म्यां स्वप्नीं देखियेलें ।। १ ।। स्वप्नानें भुललें बाई । मागील नाठवेचि कांहीं । हा जीव परवस्तूच्या ठायीं । तनुमनेंसी आटला ।। २ ।। स्वप्न सांगूं कोणापासी। विवेक करिती तयासी । हें कोंडेंजी अज्ञानासी । संतावांचुनी नुगवे ।। ३।। ध्यानीं पहूडला सांवळा । जवळीं नारी बारा सोळा । विजणें वारिती सकळां। सोहं शब्दें जागरणी ।। ४ ।। धिं धिं तुरे वाजती । अनुहत ध्वनि गर्जती । तेथें निद्रा ना सुषुप्ती । चंद्र सूर्य मावळले ।। ५ ।। मन पवना नाही भेद । तया स्वामी हा गोविंदु । तया खुंटला अनुवादु ।

वेदश्रुति श्रमल्या ।। ६ ।। म्हणे विष्णुदास नामा । जन्ममरण नाहीं आम्हां । कृपा केली मेघशामा । संतसंगें तारिलों ।। ७ ।। २०७९

भगवंत आणि भक्त हे वेगवेगळे आहेत, असे मानणे म्हणजे द्वैत होय. परमात्मा आणि भक्त हे दोन्ही एकच आहेत हे तत्त्व स्वीकारणे म्हणजे अद्वैत होय. संत नामदेवांनी ते खरोखरी आपल्या जीवनात स्वीकारले होते. हे तत्त्व कसे अविभाज्य असते ते आता आपण पाहूया त्यांच्या अतिशय मनमोहक शब्द सुमनांच्या एका अभंग माळेतून -

तूं आकाश मी शामिका । तूं लिंग मी साळुंका ।
तूं समुद्र मी चंद्रिका । स्वयें दोन्ही ।। १ ।।
तूं वृंदावन मी चिरी । तूं तुळशी मी मंजिरी ।
तूं पांवा मी मोहरी । स्वयें दोन्ही ।। २ ।।
तूं चांद मी चांदणी । तूं नाग मी पद्मिणी ।
तूं कृष्ण मी रुक्मिणी । स्वयें दोन्ही ।। ३ ।।
तूं नदी मी थडी । तूं तारूं मी सांगडी ।
तूं धनुष्य मी भातोडी । स्वयें दोन्ही ।। ४ ।।
तूं वेद मी स्तविता । तूं शास्त्र मी गीता ।
तूं गंध मी अक्षता । स्वयें दोन्ही ।। ५ ।।
नामा म्हणे पुरुषोत्तमा । स्वयें जडलों तुझ्या प्रेमा ।
मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ।। ६ ।। १५०१

लग्न म्हणजे वधू-वरांच्या जीवनातील मंगलता. पावित्र्यता. त्यांचे मीलन म्हणजे द्वैतातून निर्माण होणारे अद्वैत. सांबाची पिंड हे त्याचे प्रतिक. वंशवेलाची वृद्धी आणि विद्या धन धान्य आरोग्य संपन्न दीर्घायुषी वैभव म्हणजे कल्याण हे त्याचे साध्य. हे सगळे भाव 'तू लिंग मी साळुंका' या शब्दात गुंफले गेलेले आहेत.

पण पती-पत्नींचे जीवन कशामुळे संलग्न होत असते ? तर उत्कट प्रेम. निखळ प्रेम ही एक मानवी मनाची अतिशय उच्चतम अशी भावना आहे. अशा प्रेमात घेण्याची म्हणजे स्वार्थाची भावना मुळीच नसते, तर उलट सर्वस्व, अगदी प्राणसुद्धा समर्पणाची भावना असते. असे प्रेम जो देतो त्यालाच ते लाभत असते. पण देणे किंवा लाभणे हे अविभाज्य असते. या जरी दोन म्हणजे द्वैती संकल्पना असल्या तरी त्याचे स्वरूप मात्र अद्वैती असते. ते कसे असते ते आता आपण नामदेवांच्या अभंगवाणीतून श्रवण करूया.

केशवाचें प्रेम नामयाची जाणे ।। नाम्या हृदयीं असणें केशवातें ।। १ ।। नामा तो केशव केशव तो नामा । अभिन्नत्व आम्हां केशवासीं ।। २ ।। नामा म्हणे केशवा दुजेपण नाहीं ।। परि प्रेम तुझ्या ठायीं ठेवियेलें ।। ३ ।। १२४२

व्यवहारी जीवनात प्रत्येक माणसानें आपल्यापेक्षा कमी संपत्ती आदी गोष्टी असलेल्या माणसांकडे पाहून देवाने आपल्याला त्यापेक्षा चांगले दिवस दाखविले आहेत, याबद्दल कृतज्ञ असावे आणि परतत्त्वात मात्र माणसाने आपल्यापेक्षा अध्यात्मिक दृष्ट्या अति उंच असलेल्यांकडे पाहून आपण तसे होण्याचा प्रयत्न करावा. यातील भावार्थ असा की, जन्माला आलेल्या क्षणापासून ते शरीरातून आत्मा बाहेर पडेपर्यंत माणसांचे श्वासोश्वास घेणे-सोडणे सतत अहर्निश सुरू असते. ते आपले श्वसन परमात्म्यस्वरूप व्हावे, ही मनीषा बाळगणे, तसे आचरण करणे, याचेच नाव आत्मनिवेदन भक्ती !


श्री. गजानन शं. खोले
१९८३ सदाशिव पेठ, माडीवाले कॉलनी, पुणे ४११ ०३०.

(संत नामदेवांची नवविधा भक्ती या आगामी पुस्तकातून)

# संत श्रेष्ठ श्रीनामदेवांचा हरिपाठ

**श्री. गजानन वाघ**

जन्म शेगाव, व्यवसाय - मूर्तिकला, कापड, स्टेनलेस स्टील भांडी, फटाके, नोकरी सरकारी ३३ वर्षे. छंद - काव्य, वक्तृत्व, खेळ, संशोधन, प्रवास, समाजकार्य सत्संग, गणेशचित्र साधना, विश्वकल्याणपथ या संस्थेची निर्मिती, समाजोपयोगी कार्यात सहकार्याची तयारी व काही प्रमाणात व्यवसाय मार्गदर्शनाची तयारी व सहभाग.

महाराष्ट्रातील संतांनी सामान्य भक्तजनांसाठी मार्गदर्शनपर केलेल्या साहित्यामध्ये दररोजच्या पठणासाठी सारांश रूपाने केलेल्या कवनाला हरिपाठ असे म्हणतात. श्रीनिवृत्तीनाथांनी व श्रीज्ञानेश्वर माऊलींनी प्रत्येकी २५ अभंगाचा तर श्रीतुकाराम महाराजांनी ३३ अभंगाचा हरिपाठ केलेला आहे. श्रीएकनाथ व श्रीनामदेवांच्या हरिपाठात ३४ अभंग आहेत. सगळयाच संतांप्रमाणे नामदेवांनीही आपल्या हरिपाठात नामाची महती, त्याचा प्रभाव व त्यामुळे मिळणारे फळ याबद्दल तसेच नेमधर्म, यज्ञयाग, तीर्थयात्रा इ. कठीण कर्मकांडापेक्षा नामजप कसा सोपा व कोणालाही कलियुगात खात्रीने इहलोकी सुख व परलोकी मोक्षप्राप्ती करून देणारा आहे याचे वर्णन केले आहे. काही निवडक अभंग देऊन नामदेवांनी नामजपाचा सांगितलेला महिमा वर्णन केला आहे.

नामाचा महिमा कोण करि सीमा जपावे श्रीरामा एकाभावे ।
नलगती स्तोत्रे नाना मंत्र यंत्रे दर्णिजेबा वक्त्रे श्रीराम नाम ।
अनंत पुण्यराशी घडे ज्या प्राण्यासी तरीच मुखासी नाम येत ।
नामा म्हणे राम हा जप परम तो देह उत्तम मृत्यु लोकी ।। १ ।।

नामाचा महिमा अपार आहे म्हणून श्रीराम नामाचा जप श्रद्धापूर्वक करावा. हा जप करणाऱ्याला कोणतेही स्तोत्र, यंत्र किंवा मंत्राची गरज नाही. अनंत प्रकाराने खूप पुण्य करणाऱ्या व्यक्तीलाच नाम घ्यावेसे वाटते. नामदेव म्हणतात रामनामाचा जप करणाराचा देह मृत्यूलोकांत उत्तम होय.

जन्माचे कारण रामनामपाठी जाईजे वैकुंठी एकी हेळा ।
रामनाम ऐसा जिव्हे उमटे ठसा तो उद्धरेल आपैसा इहलोकी ।
दो अक्षरी राम जप हा परम नलगे नेम नाना पंथ ।
नामा म्हणे पवित्र श्रीराम चरित्र उद्धरी ते गोत्र पूर्वजेसी ।। २ ।।

रामनाम जपाने मानव एकदम वैकुंठास जातो. राम राम असा घोष वाणीने करता करता मानव योनीतून आपोआप उद्धार होतो. रामनाम जप अनेक नेम व पंथांमध्ये श्रेष्ठ आहे. म्हणून नामदेव महाराज म्हणतात की, श्रीरामाची अशी कीर्ती आहे की ते पूर्वजांसह गोत्राचा उद्धार करतात.

सदा फळ सुफळ वाचेसी गोपाळ वंदी कळीकाळ शास्त्र सांगे ।
ब्रह्मांडनायक ऐसे जे कौतुक तेचि नाम एक श्रीकृष्ण ऐसे ।
आदि अंत पहातां नाही पै सर्वथा परिपूर्ण सरिता अमृताची ।
नामा म्हणे अनंत कां करिसी संकेत उद्धरिले पतित युगायुगी ।। ५ ।।

वाणीने गोपाळाचे नाम घेण्याने काळाला पूज्य व्हाल असे शास्त्र सांगते. ब्रह्मांडाचा अधिपती श्रीकृष्ण आहे. नामामृताच्या परिपूर्ण नदीच्या प्रवाहाला सुरवात किंवा शेवट नाही. नामदेव म्हणतात युगानयुगे पतितांचा उद्धार करणाऱ्या नामसरितेबाबत शंका धरू नका.

तीर्थ तप राशी जप ऋषिकेशी मुखी अहर्निशी रामनाम ।
तीर्थाचे पै तीर्थ नाम हे समर्थ होईल कृतार्थ रामनामें ।
साधेल साधन तुटेल बंधन वाचे जनार्दन सुफळ सदा ।
नामा म्हणे हरी तू उच्चार करी उद्धरिसी निर्धारी इहलोकी ।। ७ ।।

वाणीने अखंड रामनाम जपणाऱ्याला अमाप तप व तीर्थयात्रा केल्याचे पुण्य मिळते. सर्व तीर्थांचे सार रामनाम जपाने जीवन सफल होईल. वाणीने जनार्दनाचा जप केल्याने बंधने तुटून साधना सिद्धीस जाईल. नामदेव म्हणतात, हरीनामाने मानवाचा उद्धार होईल.

पाहता इये हरिपाठी आणिक नाही सृष्टी नामेवीण दृष्टी न दिसे माझ्या ।
नामचि समर्थ नामाचि मथीत शंकरासी हेत रामनाम ।
पुसी सर्व काम वाचे राम नाम न लगती ते नेम कर्म जाळ ।
नामा म्हणे उच्चार न करी तू विचार तुटेल येरझार नाना योनी ।। ८ ।।

हरिपाठातील नामातच सर्व जग असून त्यावेगळे काही नजरेस दिसत नाही. सर्व अर्थ व सामर्थ्य नामातच असल्याने श्रीशंकरांना ते आवडते. नेम व कर्मे यांची गरज न पडता रामनाम घेताच सर्व इच्छा पूर्ण होतात. नामदेव म्हणतात तू विचार सोड व नाम घे म्हणजे नाना योनीत जन्म मरण टळेल.

तपाचे हे तप राम हे अमूप करी कां रे जप रामनामी ।
रामकृष्ण म्हणे वाचे नारायण तुटेल बंधन यमपाश ।
साधेल साधन होती कोटी यज्ञ नाम जनार्दन जप करी ।
नामा म्हणे जिव्हारी नामस्मरण करी म्हणे नरहरी एकया भावें ।। ९ ।।

सर्व जपात राम नाम जप श्रेष्ठ असून त्याचे तप करावे. मुखाने रामकृष्ण आणि नारायण जप केल्याने यमपाशातून मुक्तता होते. जर्नादनाचा जप केल्याने कोटी यज्ञ केल्यासारखे होईल. म्हणून नामदेव म्हणतात नरहरीचे नामस्मरण एकचित्ताने करावे.

करू हे कीर्तन रामनारायण जनीं जनार्दन हेचि खरे ।
जगाचा जनक रामकृष्ण एक न करीता विवेक स्मर राम ।
तुटेल भवजाळ कां करीशी पाल्हाळ सर्व मायाजाळ इंद्रियबाधा ।
नामा म्हणे गोविंद स्मरे तू सावध नव्हे तुज बाधा नाना विघ्नें ।। ११ ।।

राम आणि नारायण याचे गुणगान करा. सर्व प्राणीमात्रामध्ये त्याचाच वास असतो. जगाची उत्पत्ती रामकृष्णाने केली असल्यामुळे शंका न घेता रामाचे स्मरण करा. इतर काही न करता इंद्रियाची बाधा नष्ट करणारे

गोविंदाचे नाम घ्या. सावधपणाने घेणाऱ्यावर कोणतेही संकट येत नाही.
स्मरण करिता रामनाम ध्वनी ऐकताची कर्णी पळे यम ।
नामपाठ करी रामकृष्ण हरी होतील कामारी ऋद्धी सिद्धी ।
साध्य तेचि साधी न करी उपाधी जन्मांतरीच्या व्याधी हरती नामे ।
नामा म्हणे सर्व राम हाचि भाव नाही अनेक देव रामेवीण ।। १५ ।।

राम नावाचा आवाज ऐकू येताच यम पलायन करतो. रामकृष्ण हरी नामाचा पाठ करण्याची कामे ऋद्धी सिद्धी करतात. जास्त कष्ट न करता ध्येय प्राप्तीसाठी जन्मोजन्मीच्या व्याधींचा नाश करणारे नाम घ्यावे. नामदेव म्हणतात सगळीकडे राम आहे. रामाशिवाय अन्य देव नाही ही श्रद्धा असावी.

कृष्ण कथासांग जेणे तुटे पांग नलगे तुज उद्वेग करणे कांही ।
समर्थ सोईरा राम हा निधान जनी जनार्दन एक ध्याई ।
नाम हेचि सार नाम हेचि सार तराल निर्धार श्रुती सांगे ।
नामा म्हणे उच्चार रामकृष्ण सार तुटेल येरझार भवाब्धीची ।। १८ ।।

कृष्ण कीर्तनाने सर्व ऋण फिटेल. तुला उद्वेग करावा लागणार नाही. राम हा बलवान आप्त असून ती एक मोठी संपत्ती आहे. सगळीकडे जनार्दनाला पहावे. सर्व विश्वाचे सार नामात असून नामाने भवसागर तराल असे श्रुती म्हणते. नामदेव म्हणतात रामकृष्ण जपाने भवसागरात येणे जाणे संपेल.

जळाचा जळबिंदू जळेचि पै विरे तैसे हे विघरे पांचा ठायी ।
जीवशिव विचार नाम हे मधूर जिव्हेसी उच्चार रामनाम ।
रामनामतारक शिव षडाक्षरी तैसी वाचा करी अरे मुढा ।
नामा म्हणे ध्यान शिवाचे उत्तम मंत्र हा परम रामनाम ।। २० ।।

पाण्याचा थेंब पाण्यात विरावा तसा हा देह पंचभूतांत मिसळतो. जीव शिवा संबंधी ज्ञानमधूर अशा रामनामाचा जप वाणीने केल्याने होतो. विमल रामनाम तारण करणारे असल्याने अज्ञानी माणसाने त्याचा जप करावा. नामदेव म्हणतात उत्तम रामनाम जपाने शंकराने चांगले ध्यान साधले.

नामावाचून काही दुजे येथे नाही वेगे लवलाही रामजपा ।
गोविंद गोपाळ वाचेसी रसाळ पावती केवळ निज पद ।
धृव प्रल्हाद बळी अंबऋषी प्रबुद्ध नामेची चितद पावले देखा ।
नामा म्हणे राम वाचे वदा नाम संसार भव भ्रम हरे जनी ।।२२।।

रामनामाशिवाय दुसरे काही नाही म्हणून लगेच रामजप करा. गोविंद गोपाळ नाम वाणीला गोड वाटते. शिवाय त्याने मोक्षप्राप्ती होते. धृव, प्रल्हाद, बळी, अंबऋषी इ. ज्ञानी भक्त नामाने अढळपदाला पोचले. नामदेव म्हणतात रामनामाचा जप घेताच लोकांचा संसार सागराचा भ्रम संपेल.

विष्णूनाम श्रेष्ठ गाताती देवर्षि नाम अहर्निशी गोपाळाचे ।
हरी हरी तूचि बा श्रीहरी असे चराचरी जनार्दनु ।
आदी ब्रह्म हरी आळवी त्रिपुरी उभे प्रति करी उपदेश ।
नामा म्हणे पूर्ण ब्रह्म जप उत्तमोत्तम शंकरासी नेम निशी दिनी ।। २४।।

देवर्षी सांगतात विष्णू नाम श्रेष्ठ आहे. ते रात्रंदिवस गोपाळ नामाचा जप करतात. हे श्रीहरी तूच चळ व अचळ सृष्टीत जनार्दन रूपाने आहेस. श्रीशंकर पार्वतीला उपदेश करून आदी ब्रह्मरूप हरीला भजण्यास सांगतात. नामदेव म्हणतात पूर्ण ब्रह्माचा सर्वोत्तम जप रात्रंदिन करण्याचा शंकराचा नेम आहे.

नामायोनि पाहे जातील वैकुंठे तो पुंडलिक भेटे प्रकट असे ।
विठ्ठल हा मंत्र लागतसे शास्त्री आणिक नाही शास्त्रं नामावीण ।
पुराण व्युत्पत्ति न लगती श्रुती हरी पंथी मुनी गेले गेले ।
नामा हरीनामे आपण उद्धरे जन्माचि येरझार हरे नामे ।। २६ ।।

नाम पठनाने लोक वैकुंठाला जातील व त्याठिकाणी पुंडलिकाची भेट होईल. विठ्ठल नामाचा मंत्र सर्व शास्त्रे सांगतात. नामाशिवाय अन्य शास्त्र नाही. पुराणे व श्रुतींचा दाखला नको. हरी नामाच्या वाटेने सर्व मुनी मार्ग क्रमित राहिले. नामदेव म्हणतात, मी हरीनामाने तरलो व जन्म मरणाची खेप नामाने तुटली.

पवित्र परिकर नाम हा उच्चार उद्धरण साचार जगा आहे ।
गोविंद केशव उच्चार श्रीराम न लगती नेम अमुप जप ।
ते हे विठ्ठलरूप पाहिले पंढरी नाम चराचरी विठ्ठल ऐसे ।
नामा म्हणे विठ्ठल सर्वात सखोल उच्चारीता मोल नलगे तुज ।। ३० ।।

पवित्र नामाच्या जपाने सर्व जगाचा उद्धार होणार आहे. गोविंद केशव श्रीराम या नामजपाला काहीही नेम, नियमांचे बंधन नाही. असे विठ्ठलाचे स्वरूप पंढरपूरात पाहिले आणि सर्व चलाचलात विठ्ठल दिसला. नामदेव म्हणतात सगळ्यात अमोल विठ्ठल नाम घेण्याला मोल द्यावे लागत नाही.

नव्हे तुझे हित विषय पोशिता हरी हरी म्हणता तरशील ।
माधव श्रीहरी कृष्ण नृसिंह हरी वेगी हा उच्चारी लवलाही ।
घडतील यज्ञ पापे होतील भग्न प्रपंची सर्वत्र होईल ब्रह्म ।
नामा म्हणे करी कथा हरी भवव्यथा उद्धार सर्वथा भाक माझी ।। ३३।।

विषय भोगात कल्याण नाही. हरी भजनाने भवसागर तरशील. माधव श्रीहरी आदी नामांचा वाणीने त्वरित जप करावा. या यज्ञाचे पुण्य मिळून पापे भस्म होतील व जीवन ब्रह्ममय होईल. नामदेव म्हणतात व्याधि व भीती नष्ट होऊन पूर्ण उद्धार होतो असे मी वचन देतो.

उपदेश सुगम ऐकेरे एकनाम हे सम्यक विठोबाचे ।
जनी जनार्दन भावची संपन्न विठ्ठल उद्धरण कली माजी ।
साधेल निधान पुरेल मनोरथ नामेची कृतार्थ होती जन ।
नामा म्हणे नाम घे तू झडकरी पावसी निर्धारी वैकुंठ पद ।। ३४ ।।

विठोबाचे नाम घेणे हा एक सोपा सम्यक उपाय आहे. जनी जनार्दन भाव झाला की कलियुगात विठोबा उद्धार करेल. सर्व इच्छा पूर्ण होऊन नामजपाने लोक कृतार्थ होतील. नामदेव म्हणतात चटकन नाम घे म्हणजे खात्रीने वैकुंठ प्राप्त होईल.

संत श्री. नामदेव महाराज हरीपाठात नाम महात्म्य वर्णन करून सामान्यजनांना ते आत्मसात केल्यावर वैकुंठ प्राप्तीची खात्री देतात. संत रामदास, संत तुकाराम महाराज, श्री. गोंदवलेकर महाराज आदी संतांनी कलियुगात तारण्यासाठी नाम जपाचे महात्म्य सांगितले आहे. विनाकष्ट, विनासाधन सामुग्री असे हे सोपे नामसाधन आहे. त्याचा सर्व लोकांनी आपल्या मोक्ष प्राप्तीसाठी अवलंब करावा हीच सर्व संतांची इच्छा आहे.

श्री. गजानन प्रभाकर वाघ
श्रीअपार्टमेंट, गृहकल्प सोसायटी,
बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७. फोन : ५१४ ६९८

# संत नामदेव

**श्री. शशिकांत कुलकर्णी**

मराठी दैनिक व साप्ताहिक यामध्ये 'एक तरी ओवी अनुभवावी' या सदरात लिखाण (ज्ञानेश्वरी)

संत नामदेव. तर हे नामदेवराया आपल्या पंढरपुरचे. ज्ञानोबा माऊली आळंदीचे, तर देहु गांवचे तुकोबाराया. एकनाथ महाराज पैठणचे. सज्जनगडचे संत रामदास. अरणचे सावता माळी.

आळंदीवरून पंढरीला आषाढीच्या वेळी जर आपण पायी वारीला निघालात तर दिंडीतून थोडा विरंगुळा म्हणून वारकरी जेव्हा गप्पा मारतात तेव्हा हे वारकरी मंडळी संतांची ओळख मोठ्या सहजपणे करून देतात. महाराष्ट्रातला कोणी कुठलाही असो तो म्हणतो आम्ही पंढरपूरकडचे. तर वारकरी सहजपणे सांगतात, संत नामदेवराया आपल्या पंढरपुरचे हो. विठोबा-रखुमाबाईच्या देवळात जाताना नामदेव पायरीच दर्शन प्रथम भाविक घेतात. पंढरीरायाच्या दर्शन आधी महत्त्व नामदेव दर्शनाला.

कल्पनेची बाधा न कोणे काळी । हे संत मंडळी सुखी असो ।।

अभंगामध्ये या दोन ओळी वाचल्या की मन धन्य धन्य होत. वारीमध्ये चालताना या दोन ओळी मुखातून निघाल्या की सार्थकता वाटते.

संत नामदेवांबद्दल आभाळ भरभरून लिहिता येईल; परंतु नामदेवांचा वारकरी संप्रदाय यात सर्व काही सामावले आहे. नामदेवांनी आपल्या अभंगवाणीतून संपूर्ण भारताच्या पंचक्रोशीतील विस्तारलेल्या वारकरी संप्रदायाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. नामदेवांनी, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम या संतांच्या ओव्या आणि अभंगाच्या असणाऱ्या अक्षराच्या पायावर वारकरी संप्रदायाचे धर्ममंदिर उभे केले. त्या वेळी असलेले सामाजिक जीवन आणि त्या वेळच्या उपेक्षित म्हणून ओळखल्या जाणाऱ्यांना = जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत । या प्रमाणे दिलासा देऊन विठ्ठलाच्या साक्षीने या संप्रदायाने दिला व चतुर्विध मुक्तिचे भरघोस । विपुल पिक चंद्रभागेच्या तीरावरील वाळवंटात काढले व असेही म्हटले की, या रे या रे लहान थोर । याती भलते नारीनर ।। विठ्ठल नामाची कीर्तीपताका या संप्रदायाने आजपर्यंत फडकत ठेवली आहे. अगदी आजपर्यंत, संगणक युगातसुद्धा. आळंदी पंढरीच्या वारीत याचा जागृत अनुभव येतो.

शतक बदलली. राजवटीही बदललल्या, सामाजिक स्थिती-परिस्थितीत बदल झाले. सांस्कृतीकताही बदलली एवढे झाले तरीसुद्धा वारकऱ्यांची जी परंपरा ती अखंडीतपणे पंढरीच्या वाटेवर चालूच आहे आणि म्हणून वाटते की, अमरतेचे असे कोणते अमृतसत्व या संप्रदायाला लाभले आहे. या धर्मसंप्रदायाला प्रेरणा देणारा कोणीतरी होता आणि सहाजिकच मागोवा घेतला आणि संतांच्या मांदियाळीत संत नामदेवांचे दर्शन अवश्य घडते.

संत नामदेवांच्या पूर्वजात (घराण्यात) चार-पाच पिढ्या ही वारी चालत आली असावी असे परंपरा सांगते. नामदेवांचा जन्मकाल इ. स. १२७० असल्याने इ. स. ११२५ ते ११५० या दरम्यान पुंडलिकाने वारकरी संप्रदायाची मुहूर्तमेढ रोवली असावी. भीम रभी ही नदी, पंढरपूर हे नाव आणि विठ्ठल ही संज्ञा पुरातन कालापासून रूढ असली तरी पंढरीखेरीज अन्य ठिकाणी विठ्ठल मूर्ती पूजल्या जात असल्या तरी वारकरी संप्रदायाचा उदयकाल म्हणून आपणाला इ. स. बाराव्या शतकाचा पूर्वार्ध स्वीकार करावा लागतो. असो.

तर भक्ति, श्रद्धाभक्तीयुक्त विठ्ठलाचा नामघोष करीत महाराष्ट्राचा परिसर दुमदुमून टाकीत असावा. म्हणूनच श्रद्धा भक्तिलाच भजनाचा ताल आणि अभंगाची लय नामदेवरायांनी मिळवून दिली. अभंग व अभंगरचना हे वारकरी संप्रदायाचे अनन्यसाधारण असे वैशिष्ठ आहे. वारकरी संप्रदाय हा अभंगकर्त्यांचा पंथ आहे. ज्ञानदेव, तुकाराम, एकनाथ, नामदेव, त्यांचे प्रेरणारूप आहे. विठ्ठल भक्तीची अभंगनिर्मिती या संतांची अभंग या छंदाचे स्फुरण नामदेवांच्या अलौकिक प्रतिभेला कसे झाले त्याचा उलगडा नामदेवांच्याच अभंगातून आपोआप कळून येतो. नामदेवांचा एक अभंग - अभंगाची कळा नाही मी नेणत ।। या चरणांनी सुरू होणारा या रचनेत नामदेवरायांनी स्पष्ट केले आहे. नामा म्हणे मज स्वप्न दिले हरी ।। विठ्ठलाच्या भजनासाठी नामदेव प्रेरणेने लाभलेला अभंगाचा नवा पदमबंध अनेक संतमुखातून विकसित झाला. चंद्रभागेच्या वाळवंटावर धुमाळी-दादऱ्याच्या तालात वैष्णवांची मांदियाळी भजन-कीर्तनात रंगू लागली.

वारकरी संप्रदायाचे आराध्य दैवत म्हणजे विठ्ठल - तेव्हा वारकरी संप्रदायिकांचा जो विठ्ठल हा खरोखर भक्ताची वाट पहात विटेवर नित्य उभा आहे. नामदेवरायांनीच वर्णन केले आहे. भक्ताची वाट पाहता पाहता महद्वारातूनच भक्ताला अगदी सामोरा येतो आणि संसारयात्रेमध्ये थकलेल्या भागलेल्या भक्ताचे मुख पीतांबराने पुसतो. नामदेवराय म्हणतात की, धरोनि हनुवटी उठविल हस्तकी । ठेवील मस्तकी अभय कर ।। (नामदेव अ. ७६१) आणि हा जो वात्सल्यभाव आहे तो सक्रियपणे प्रकट करतात आणि या प्रेमभक्तीत भक्त व भगवंत यांच्या सापेक्ष द्वैताची उघड मान्यता दिसते. यासाठी नामदेवराय म्हणतात, देवभक्तपण। नाही नाही त्यासी आन ।।

नामदेवरायाच्या अभंगातून हेही पहायला मिळते आणि अनुभवावेसे वाटते. नामदेवराय एका अभंगात म्हणतात की, जन्ममरणाचा फेरा चुकविण्यापेक्षा 'उपजोनिया पुढती येऊ हीच इच्छा संतांनी बाळगली आणि म्हणून भक्तीच्या रसाला लाचावलेले असे त्यांचे मन भवसागराची जी भीषणता आहे ती कल्पनाच काढून त्यावर स्वानंद - विहार करायलाच - सिद्ध झाले आहेत.'

सांडूनि पंढरीची वारी । मोक्ष मागती ते भिकारी ।।
ताटे वोगारिले निके । सांडूनी कवण जाय भिके ।।

हाच विचार आणि दृष्टीकोन विठ्ठलाच्या भक्तात रुजल्यामुळे मोक्ष ही हादरून गेले. मोक्षाला पंचाईत झाली आता काय करावयाचे हे मोक्षाला समजेना. मग अशा परिस्थितीत तो हीन दीन होऊन चंद्रभागेच्या वाळवंटातून भरकटू लागला आणि भक्त

भक्ताचिया पाया पडतो पुढती । मज करा सांगाती मोक्ष म्हणे ॥ अशी केविलवाणी अवस्था झाली. सुखाने गर्भावास पत्करण्याची इच्छा संतांनी बोलून दाखविली. म्हणून तसे पाहिले तर इतर कुठल्याही पंथांमध्ये अगर संप्रदायामध्ये भक्तीसाठी पुनः पुनः जन्ममरण स्वीकारणारे भक्त आढळून येत नाहीत. वारकरी संप्रदायामध्ये वारकरी संप्रदायानेच मुक्तीपेक्षा भक्ती श्रेष्ठ असल्याचेच संतमुखानी गर्जना करून सांगितले आहे.

मुक्तीपेक्षा भक्ती श्रेष्ठ संतमुखानी गर्जून सांगितले परंतु संताच्या समोर दुसरे अनेक सामान्य सांसारिक होते. प्रापंचिक विवंचनेमध्ये गुरफटलेले, दुःखानी त्रासून गेलेले अशा जीवांना पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननी जठरे शयन् ॥ या चक्रामध्ये फिरण्याची इच्छा नव्हती. म्हणून नामदेवांनी चतुर्विध मुक्तीच्या शोधार्थ निघालेल्या या अशा सर्वसाधरणांना - भक्तीवीण मोक्ष नाही हा सिद्धान्त । वेद बोले हात उभारोनि ॥ याची स्पष्ट जाणीव देऊन परमेश्वर प्राप्त करण्यासाठी सर्व साधनांत भक्ति हेच साधन सोपे आणि सुलभ आहे हे वारकरी संप्रदायाने स्पष्ट केले. यासाठी नामदेवराय म्हणतात ॥ घ्यारे नाम सुखे प्रेमे अलौकिक। साधने आणिक करू नका ॥ नामभक्तीचे स्वरूप नामदेवांनी अशा प्रकारे प्रस्तुत केले आहे. नामदेवांचे आणखीनही हे विशेष.

काळ वेळ नसे नामसंकीर्तनी । उंच नीच योनी हेही नसे ॥
धरा नाम कंठी सदा सर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ॥
कृपाळू कोवसा सुखाचा सागर । करील उद्धार भाविकासी ॥
नामा म्हणे फार सोपे हे साधन । वाचे नाम घेणे इतुकेचि ॥

कोणत्याही वर्णातील, जाती-धर्मातील, कुठल्याही व्यवसायातील मानवाला हा नाममंत्र घेता येतो. या नाममंत्राचीच निवड का ? त्यासाठी नामदेवराय म्हणतात -

आणीकही मंत्र मोक्षदानी खरे । अशौचाचा थार असू नये ॥
नाममंत्र कांही बाधीना कोणासी । जपा अहर्निशी रामकृष्ण ॥
नामा म्हणे नाम साधकाची माता । जैसे तैसे घेता भक्ति जोडे ॥

हा जो मंत्र आहे 'नाममंत्र' आहे तो कोणत्याही वेळी कुठल्याही स्थितीमध्ये जपता येतो असेच नामदेवराय सांगतात. नाममंत्र कधी बाधक ठरत नाही. त्यासाठी नियम नाहीत. नामदेवराय असेही म्हणतात याला सोवळ्या, ओवळ्याचाचा प्रश्न येत नाही. विटाळकिटाळाचाही नाही. नाममंत्र हा साधकच रहातो.

नामी नारायण । होय भक्ताचे आधीन ॥ नामदेवराय म्हणतात हा नामाचाच प्रभाव आहे आणि कलियुगामध्ये एका नामाशिवाय सर्व अनुपयोगी आहे. असा संतांचा विश्वास आहे.

नामदेवरायासारख्या अशा महान संतांचा/भक्तांचा लाडका मालक विठोबा आणि या पंढरीरायाने अशा भक्तांची सेवा केली अगदी दामाजीपंतांसाठी दरबारी मोहरा भरून आला. दळू लागला, कांडू लागला, झाडू लागला, माती मळून दिली, गवऱ्या लावल्या. संतांसाठी/भक्तांसाठी देवानं सर्व काही केलं. अगदी बारा बलुत्यांची सेवा केली.

नामदेवरायांनी म्हटले आहे -

झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणी ॥
पाटी घेऊनिया शिरी । नेऊनिया टाकी दुरी ॥

आणि हे सर्व अगदी देहभान विसरून भगवंत करतात. तर विठ्ठल संप्रदायाचा हा सहजगुण आहे. भक्ताकडून सेवा घेणारा हा भगवंत भक्तासाठी पण सेवा करतो. भक्तांसाठी भक्तांच्या घरची घरगुती कामे आपण भगवंत आहोत हे विसरून करतो. म्हणूनच 'आमचा तू ऋणी ठायाचाचि देवा ॥' असे नामदेव देवाला सांगतात. तर अशा संतांनी, नामदेवांनी, ज्ञानदेवांनी, तुकारामांनी, नाथबाबांनी, चोखोबांनी परमेश्वराला भक्ताचा सेवक बनविण्याची कामगिरी असामान्य असे धैर्य दाखवून करून दाखविली. भक्तामुळे देवाला देवपण आले. नामदेव म्हणतात 'पतित' भक्त नसतील तर 'पावन' परमेश्वर अवतरणाच नाही.

पतित अनेक पावन तू एक । झालासी सुश्लोक कवणाचेनि
पतित मी भला की पावन तू भला । सांग वा विठ्ठला मायबापा
परिसाचे महिमान कैसेनि वाढते । निर्माण नसते लोह जरी ॥

देवाशी प्रेमकलह हे वारकरी संप्रदायाचे एक वैशिष्ट आहे. त्याचप्रमाणे भक्ताची सेवा करणारा विठ्ठल हेही याच वारकरी संप्रदायाचे विशेषत्व आहे.

भजन कीर्तन यात रंगून विठ्ठलचा नामघोष करणे हा वारकऱ्यांचा प्राणपद धर्म आहे आणि याला आधार म्हणजे संतांचे अभंग. व्याख्यान, प्रवचन मस्तक डोलविते. परंतु अभंग सर्वांना डोलवितो. गायनाची आणि नर्तनाची समाधि लावतो आणि हा अनुभवही आळंदी-पंढरी वाटेवर आषाढीवारीत मिळतो.

वारकऱ्यांची भजन-कीर्तनाची एक विशिष्ट पद्धत आहे. याचे प्रवर्तन प्रथमतः नामदेवांनीच प्रस्तुत संप्रदायामध्ये केले. भजनाचे वेळी वारकऱ्यांचे दोन तार्फे परस्परांकडे तोंड करून हाती टाळ घेऊन उभे असतात. त्यांच्या अग्रभागी मधोमध वीणेकरी बुवा असतात. मृदंगवाले असतात. आरंभी वीणेकरी अभंग गाऊन भजनारंभ करतात.

नामदेवांचा एक सुंदर प्रसिद्ध अभंग आहे. संप्रदाय हा साधकाला स्वावलंबी करणारा आहे. विठ्ठल हाच त्यांचा गुरु आणि नामदेवांनी हाच दृष्टिकोन या अभंगातून व्यक्त केला आहे.

तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल । देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल ॥
माता विठ्ठल, पिता विठ्ठल । बंधु विठ्ठल गोत्र विठ्ठल ।
गुरु विठ्ठल गुरुदेवता विठ्ठल । निधान विठ्ठल निरंतर विठ्ठल ॥

तेव्हा परमभक्तराज नामदेवरायांनी आपले सर्व आयुष्य वारकरी संप्रदायासाठी वेचले आणि शिंपून परिपोष केला.

आम्हा कीर्तन कुळवाडी । आणिक नाही उदीम जोडी ॥

या अशा अनन्य भक्तिने त्यांनी भागवत धर्माच्या विठ्ठल मंदिराचा प्रचंड विस्तार केला. नामदेवांची अभंगवाणी अक्षर ब्रह्मानंदाचा वर्षाव करीत, विविध प्रांतांतून अनेक जाती वर्णातून, लहान थोरांच्या मुखातून आजपर्यंत संचार करीत आहे. विंड्या पताकांच्या थाटात, टाळ मृदंगाच्या गजरात विठ्ठल जवळजवळ मागणे मागतात.

नामदेवराय म्हणतात माझ्या हरिदासांना आकल्प आयुष्य लाभावे. त्यांना कधी काळी कल्पनेची बाधा होऊ नये. ही संतमंडळी सुखी असावीत. माझ्या भाविक विष्णुदासांना अहंकाराचा वाराही लागू नये. ज्यांच्या मुखी विठ्ठलनामाचे निधान असते, त्यांचे कल्याणच असावे.

कल्पनेची बाधा न होणे काळी । हे संत मंडळी सुखी असो ॥

श्री. शशिकांत कुलकर्णी
श्रीराम क्लब, सामे, परमा महेसाणा

# नामदेवकृत 'ज्ञानदेवांचा समाधी-सोहळा'.

**सौ. सुनंदा. आ. शाळिग्राम**
एम. ए.

पावसच्या स्वामी स्वरूपानंदाचे अधिकारी शिष्य स्वामी सत्यदेवानंद सरस्वती 'यांच्या शिष्या. ज्ञानेश्वरीवर प्रवचन नियमित.

मनुष्य जगात 'येतो' तेव्हा, लोक 'सोहळा' करतात; पण 'जातो' तेव्हा 'दिवस' करतात. येणं-जाणं सामान्य जीवाच्या हाती नसतं. कारण तो मायेच्या अधीन असतो. पण अवतारी व्यक्ती मायाधीश असतात; स्वसत्तेने येतात आणि संकल्पित कार्य करून स्वसत्तेने जातात. त्यांच्या जाण्यानं त्यांचं कार्य थांबत नाही, उलट वाढतं. त्यांच्या चिरंतन असण्याचा प्रत्यय सतत येत राहतो. सातशे वर्षांपूर्वी ज्ञानदेवांनी 'धर्मसंस्थापनार्थाय' अवतार घेतला. ('ज्ञानदेवमूर्ती विष्णुची हो ।') आणि अल्पावधीत भागवत धर्माचा पाया घालून श्रीगुरु निवृत्तीनाथांकडे समाधीची अनुज्ञा मागितली.

'नामा म्हणे, याला नाही पा उपाधी ।
पूर्ण हे समाधी ज्ञानदेवा ।।'

ज्ञानदेवांचे सारेच अलौकिक ! त्यांच्या गुरुभक्तीला तोडच नाही. 'आचार्योपासनं' या पदावरील टीकेत ते म्हणतात,

'इये शरीरीची माती । मेळवीन तिये क्षिती ।
जेथ श्रीचरण ठाती । श्रीगुरूंचे ।।'

आपले हे वचन खरे करण्यासाठी तर त्यांनी गुरुंच्या आधी समाधी घेतली नसेल ?

सातशे वर्षांपूर्वी झालेला हा समाधी-सोहळा कसा संपन्न झाला, हे आम्हाला आज कसे कळणार ? तत्कालीन संतकवींच्या काव्यावरून ! कारण स्वतःबद्दल ज्ञानदेवांनी कुठेही काहीही लिहिलेले नाही. संत जनाबाई म्हणतात,

'सखा विरला ज्ञानेश्वर । नामयाचा जो जिव्हार ।।'

जी गोष्ट नामदेवांच्या जिव्हारी ठसली तिचाच प्रत्यय त्यांनी आपल्याला समाधीच्या या अभंगांतून आणून दिला आहे. हे अभंग एकंदर एकाहत्तर आहेत. ज्ञानदेवांच्या चरित्राच्या दृष्टीने हा अमूल्य ठेवा आहे. त्यादृष्टीने नामदेव हेच ज्ञानदेवांचे आद्य चरित्रकार ठरतात.

पण हे अभंग म्हणजे केवळ तत्कालीन घटनेचे वर्णन नाही तर ते एक उत्तम भावकाव्य आहे ! आत्मप्रत्यय हे भावकाव्याचे मुख्य वैशिष्ट्य! नामदेवांनी या अभंगांतून आजही आपल्या मनःचक्षुपुढे 'संजीवनी समाधी सोहळा' साकारला आहे !

प्रथम ज्ञानदेव निवृत्तिनाथांना वंदन करून आपल्या समस्त कार्याचे श्रेय श्रीगुरूंना देतात आणि म्हणतात -

'आज्ञा द्यावी वैकुंठा ।'

'आता जे आरंभिले मने । ते आपण सिद्धी न्यावे ।।' अशी विनंती करतात. 'गोपाळपुरी केली गोष्ट' अशी आठवण करून देतात. इकडे पंढरीला श्रीविठ्ठल म्हणतात -

'ज्ञानदेवे अपूर्व इच्छिले पोटी ।
जावे उठाउठी समुदायेसी ।।'

असे ठरवून रुक्मिणीसहित श्रीविठ्ठल अलंकापुरी येऊ लागतात. त्यांच्यासवे कोण कोण आहे पाहा -

'विठ्ठल रुक्मिणीसहित । गरुड हनुमंत ।
आणि संत महंत । जमा झाले ।।
परिसा भागवत । नामा पुंडलिक । पताकासहित । उठावले ।।
गंधर्व आणि देव । आले सुरगण । चालली विमाने । अलंकापुरी ।।
लहान थोर सारे । आले ऋषीश्वर । उतरले भार । वैष्णवांचे ।।
नामा म्हणे देवा । दिसती तातडी । जातो मज घडी । युगा ऐसी ।।'

या सर्वांचे स्वागत सोपानदेवांनी केले.

'सोपानाने मग । केला नमस्कार । उतरिले भार । पांडुरंगा ।।'

सर्वांना ज्ञानदेवांना भेटायचे होते.

'योगियांचा सखा कोठे ज्ञानेश्वर ।।' म्हणून विचारले, पण
'उन्मनी निद्रा लागलीसे फार । स्वरूपी ज्ञानेश्वर जागा झाला ।।'
अशा स्थितीत ज्ञानदेव होते.

'नामा म्हणे देवा करा सावधान । नाही देहभान ज्ञानदेवा ।।'

नामदेवांच्या या चित्रणात कमालीची गतिमानता आहे. एकामागून एक चलत्-चित्रे अंतःचक्षूंपुढून सरकू लागतात. पताकांचे वर्णनसुद्धा हुबेहुब केले आहे !

'अल्याड पल्याड पताकांचे भार । मध्ये मनोहर इंद्रायणी ।।
पिवळ्या, पारव्या आणिक हिरव्या । नीलवर्ण साऱ्या लखलखित ।।
जरी जर्तारी आल्या रातभरी । विजा त्यावरी खेळताती ।।
सर्पकार दंड तारांगणावाणी । पताका तिकोनी दाटताती ।
नामा म्हणे तेथे पताकांचे भार । केव्हढे भाग्य थोर ज्ञानोबांचे ।।'

आळंदी हेच स्थान समाधीसाठी कसे उत्तम व तपोभूमी आहे, हे संत पुसू लागले व देव सांगू लागले -

'अष्टोत्तरशे वेळा साधिली समाधी ऐसे हे अनादि ठाव असे ।'
अशा ठिकाणी 'करि शीघ्र प्रस्थान । आज्ञा माझी ।।'
असे श्रीविठ्ठलांनी सांगताच -

'देवाचा हो कर धरुनि ज्ञानेश्वर
निघाला बाहेर योगीराज ।। मागेपुढे संत चालले मिरवीत ।
कौतुक पाहात इहलोकी ।। नारा विठा गोंदा महादा विरक्त ।
परसा भागवत उभे तिथे ।। समुदाय वैष्णव मिळालासे भारी ।
महोत्सव गजरी आरंभिला ।।'

हरिनामाचा गजर सुरू झाला. समाधीचे साहित्य आणण्यास सांगितले -

'नारा विठा गोंदा पाठविला महादा । साहित्या गोविंदा सांगितले ।।
तुळसी आणि बेल दर्भ आणि फुले । उदक हे चांगले भागीरथीचे ।।
'गंध आणि अक्षता, पंचामृत उदक । धूप आणि दीप आणियेले ।।'
'निंबे आणि नारळ गोण्याची पोफळे उदंड तिही केळे आणियली ।।
आणिक बहुतापरी घेतली सामग्री पीत पितांबरी मृगछाला ।।
भगवी आभरणे घेतले भस्म ।...'

साहित्याची जुळवा-जुळव चाललेली पाहून नामदेवमहाराज म्हणतात-

'काय माझा अंत पाहतसा ?' किंवा 'प्रेमाश्रु डोळा दाटताती ।'

नेमलेल्या स्थळाकडे निश्चल पाऊले टाकीत जाणाऱ्या ज्ञानदेवांना देव म्हणाले -

'माग वरदान मज काही' ।। 'ज्ञानदेव म्हणे, शुद्ध कार्तिक मासी ।
व्रत एकादशी स्वामीकडे ।। कृष्णपक्षी व्रत हरिदिन परिपूर्ण ।
मागितला मान ज्ञानदेवे ।।'

कार्तिक महिन्यातील कृष्णपक्षात जे ज्ञानदेवांना भेटतील, ते आत्मानुभवाचे अमृतपान करतील.

'अलंकापुरी कोणी करील कीर्तन । तयालागी येणे वैकुंठींचे ।।'
श्रीविठ्ठलांनी ज्ञानदेवांना वर दिला.

'जेथे ज्ञानदेव तेथे मी निशिदिनी । आता अपार वाद्ये वाजू लागली.'
'पुढे वीणे टाळ वाजताती । स्वर्गीहुनी पुष्पे वर्षिती, सुरवर
उभे ऋषीश्वर समुदायेसी ।।'

पण या वाद्यकल्लोळांपेक्षा नामदेवांच्या अंतरंगीचे कल्लोळ अपार होते.

'कोण जाणे माझ्या जीवीचा कळवळा । प्रेमाश्रू डोळा लोटताती ।।
...नामा म्हणे येथे बोलवेना मज । जातसे निजगुज आवडीचे ।।'

नामदेव आता फक्त 'आठवती मनी गुण तुझे' असं म्हणून ज्ञानदेवांची ख्याती सांगू लागले.

'काय सांगो देवा ज्ञानोबाची ख्याती' या सर्वश्रुत प्रसिद्ध अभंगात नामदेव म्हणतात, ज्यांनी म्हैशामुखी वेद बोलविले, मृत्तिकेची भिंती चालविली, पतित तारिले, भक्ती ख्यात केली, उघडे अध्यात्म बोलविले, करणे - न करणे सांगितला पंथ, ज्यांनी अहंकार पोटीचे जहर उतरिले, संशयाचे कोंभ करपले, विकल्पाचे पायी बेडी घातली, इंद्रियांची ताडातोडी केली, वैकुंठासी शिडी लाविली आणि सुखधामी शेज घातली, ती योगियाची विभूती चालली, हे पाहून -

'नाना परी मन आवरिता भारी । काही केल्या हरि विसर न पडे ।।
दृश्या दृश्याच्या दूर केल्या गोष्टी । उघडली दृष्टी ज्ञानदेवे ।।
गीतेवरी टीकाग्रंथ केला सार । केवळ ईश्वर ज्ञानाचा हा ।'
'जड या जीवांचे हरविले अज्ञान । नेले उतरून भवसिंधु ।।'

ज्ञानदेवांच्या कार्याचा नामदेवांनी केलेला हा गौरव जसा यथार्थ आहे तसाच त्यांच्यामधील प्रेमाचा निदर्शक आहे !

ज्ञानदेव क्षेत्रप्रदक्षिणा करायला चालले, देवापाशी मुहूर्त विचारू लागले. तेव्हा मात्र नामदेवांचे प्राण कासावीस झाले.

'कासावीस प्राण मन तळमळी । जैसी का मासोळी जीवनाविण ।।
दाही दिशा वोस वाटती उदास । करिताती सोस मनामाजी ।।
घातियेली घोण, प्राण आला कंठी ज्ञानेश्वरासाठी तळमळी ।।'

करुणरसाची उत्कटता इथे जाणवते. या कारुण्यात भक्ती आहे, उदात्तता आहे. आक्रोश नाही. विलक्षण स्वाभाविकता आहे. हृदयाचं कंदन नाही; तर सहजस्पंदन आहे आणि म्हणूनच ते आपल्या हृदयाला भिडतं.

नामदेवांप्रमाणेच निवृत्ती, सोपान, मुक्ताबाई या तिघा भावंडांनाही ज्ञानदेवांचे नाना प्रकारचे शब्द आठवू लागले.

'फार आठवती निवृत्तीचे चित्ती । सोपान स्फुंदती मुक्ताबाई ।।'
पण 'देव म्हणे असे आठवाल फार ।लागे उशीर समाधीशी ।।'

म्हणून 'रखमादेवीवरे केले समाधान' -

'येणे जाणे कोठे, योगी पहा अवीट । सान वैकुंठ करून ठेवी ।।
ज्ञानियाला मरण म्हणती अज्ञान । वाया तुम्ही शीण करू नका ।।
तंतूचियामुळे पटाला विस्तार । काय निराकार वाया गेले ?
.... उगमापासूनी गंगा सागरासी गेली
काय दोन जाली उदके तयांची ?'

आता ज्ञानदेवांना सर्व साधुजनांनी स्नान करविले. ज्ञानेश्वरांनी देवाचे तीर्थ घेतले. पादपद्मी नमस्कार केला व विठ्ठलरुक्मिणी आणि ऋषी-सुरवरं यांची पूजा केली. त्या वेळी 'नामयाच्या हाती गंध अक्षता' असा उल्लेख नामदेवांनी केला आहे. टाळ, मृदंग, वीणा वाजू लागल्या. नारद तुंबर गीत गाऊ लागले. शुक, वामदेव, अंबऋषी सादर झाले. त्या वेळच्या तिथल्या अलोट गर्दीचे चित्र नामदेव रेखाटतात -

'पिपिलिकेसी मार्ग जावया न मिळे । जाती भार मेळे वैष्णवांचे ।।'

ज्ञानदेव सिद्धेश्वरी आले. सिद्धेश्वराला पूजिले आणि समाधीसाठी स्थळ मागितले. देवांनी सांगितले -

'पूर्वी तुझे स्थळ वाहनाखाली । उठविला नंदी शिवाचा ढवळा ।
उघडिली शिळा विवराची ।। आसन आणि धुनी मृगछालावर ।
पाहती ऋषीश्वर ओसंडोनी ।।'
'नारा विठा गोंदा महादा पाठविला । झाडविली जागा समाधीची ।।'

दशमीला ज्ञानदेवांनी प्रदक्षिणा केली. एकादशीला रात्रं-दिवस हरिजागर केला. द्वादशीला पारणे सोडले.

'गंगा गिरिजा राही रुक्माबाई भामा । उठिल्या रांधण्या पारण्याच्या ।।
... पिंपळाचे पारी बैसविल्या पंक्ती । पात्रे ते श्रीपती वाढू लागे ।।
... सोवळ्याने हरी वाढतो सकळा । मनीचा कळवळा कोण जाणे ।
रखमाईचे कानी सांगितली गोष्ट । विस्तारावे ताट ज्ञानदेवा ।।
राही रुक्माबाई वाढती आवडीने । सोडितो पारणे ज्ञानदेवा ।।
... एका एकालागी देताती प्रसाद । नामा म्हणे स्वस्थ जेविता पंगती
घृतपात्र हाती विस्तारितु ।।'

तूप वाढण्याचं काम नामदेवांनी केले तर

'गोंदा महादा विडे वाटताती । दोन प्रहरी भोजन आटोपले.'
'तृतीय प्रहरी कीर्तन आरंभिले'

नंतर कोणी ज्ञानदेवांना चंदनाची उटी लावीत होतं. कोणी पंचारती करीत होतं; तर कुणी गंधाक्षता - पुष्पपरिमल अर्पण करीत होतं. 'माळा घाली गळा नामदेव' असं नामदेवांनी म्हटलं आहे.

आता 'जातो ज्ञानेश्वर समाधीसी ! ब्रह्मादिक तेथे करिताती पूजा ।
घातियेली सेजा समाधीसी ॥ ... धुवट वस्त्राची घडी ते अमोल ।
तुळसी आणि बेल आवरिले ॥ दुर्वा दर्भ वरी टाकले मोकळे ।
पुष्पे ती सकळे समर्पिली ॥ ... लावियेले दीप निरांजन ज्योती
प्रकाशाच्या दीप्ती तन्मयाच्या । पुजूनी समाधी निघाले बाहेरी ॥'

आता ज्ञानदेव श्रीगुरु निवृत्तिनाथांना वंदन करण्यासाठी पुढे येतात.

'पुढे ज्ञानेश्वर जोडोनिया कर । बोलतो उत्तर स्वामीसंगे ॥
पाळिले, पोशिले, चालविला ळळा । बा माझ्या कृपाळा निवृत्तिराजा ॥
स्वामीचिया योगे आलो स्वरूपाकारा । उतरलो पार मायानदी ॥
निवृत्तीने हात उतरिला वदना । ... नामा म्हणे देवा देखवेना मज... ॥'

ज्ञानदेवांना आलिंगन देऊन निवृत्तिनाथ काय म्हणाले ?

'वोसंडोनी निवृत्ती आलिंगो लागला । आणिकांच्या डोळा अश्रू येती ॥'
'अमर्यादा कधी केली नाही येणे । शिष्य-गुरुपण सिद्धी नेले ॥
गीतार्थाचा अवघा घेतला सोहळा । गुह्य गौप्यमाळा लेवविल्या ॥
फेडिली डोळ्यांची अत्यंत पारणी । आता ऐसे कोणी सखे नाही ॥
काढोनिया गुह्य वेद केले फोल । आठवणी बोल मनामाजी । '
नामा म्हणे संत कासावीस सारे । लाविती पदर डोळियासी ॥ '

इथे नामदेवांच्या प्रतिभेतून निवृत्तिनाथांचे सजीव व्यक्तिचित्र रेखाटले गेले आहे.

हा संयत भावनांचा मुक्त आविष्कार आहे. नामदेवांनी उभं केलेलं निवृत्तिनाथांचं 'शब्दशिल्प' पाहा -

'निवृत्तिदेव म्हणे करिता समाधान । काही केल्या मन राहात नाही ॥
बांधल्या तळ्याचा फुटलाहे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ॥
बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळा पांगलासे ॥
हरिणीविण खोपी पडियेली वोस । दशदिशा पाडसे भ्रमताती ॥
मायबापे आम्हा त्यागियेले जेव्हा । ऐसे संकट तेव्हा आले नाही ॥'
नामा म्हणे देवा, पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचे ॥'

अंतःकरणच जेव्हा काव्यरूप घेतं; तेव्हा असं अक्षरशिल्प उभं ठाकतं !

देवांनी हाताला धरून निवृत्तिनाथांना उठविले.

हरिपाठ - गजर सुरू झाला.

'अजानवृक्ष दंड आरोग्य अपार । समाधीसमोर स्थापियेला ।
कोरड्या काष्ठी फुटियेला पाला । तेव्हा अविषयाला नमस्कारी ॥'

राही, रुक्माई आणि सत्यभामा यांनी ज्ञानेश्वरांना ओवाळिले. अवघियांनी नमस्कार केला. ज्ञानदेवांनी समाधीला प्रदक्षिणा केली. बाहेरील प्रथम पायरीजवळ पंढरीनाथ उभे होते. देव म्हणे - 'फार केले कष्ट जगासाठी ।' प्रसंग हृदयस्पर्शी आहे. देवांनी व निवृत्तिनाथांनी ज्ञानदेवांचे दोन्ही कर धरिले. समाधिस्थानी ज्ञानेश्वर जाऊ लागताच - माशावर जाळे फेकावे, तसे जनमन कालवले. दाही दिशा उदयास्ताविना धुंद झाल्या. ज्ञानेश्वर आसनावर जाऊन बसले. पुढे श्रीज्ञानेश्वरी ठेविली आणि -

'ज्ञानदेव म्हणे सुखी केले देवा । पादपद्मी ठेवा निरंतर ॥'

तीन वेळा त्यांनी करकमळ जोडिले आणि डोळे झाकले.

'भीममुद्रा डोळा निरांजनी लीन । जाले ब्रह्मपूर्ण ज्ञानदेव ॥'

निवृत्तींनी देवांना बाहेर आणून समाधीसी शिळा घातली.

'सोपान मुक्ताई सांडिता शरीरा । म्हणती धरा, धरा निवृत्तीसी ॥'

सर्वजण समाधीला सुमने वाहू लागले; नमस्कार करू लागले.

'अवघी जयजयकारे पिटियेली टाळी । उठली मंडळी वैष्णवांची ॥
इंद्रायणी केले अवघांही आचमन । ... त्रयोदशी देव रिघाले बाहेर
धन्य अलंकापुरी ज्ञानराज ॥'
'धन्य इंद्रायणी पिंपळाचा पार । धन्य ज्ञानेश्वर पुण्यभूमी ॥
... धन्य ऋषीश्वर धन्य पांडुरंग । मिळाले ते सांग अलंकापुरी ॥
नामा म्हणे धन्य भाग्याचे हे संत । आला पहा एकांत ज्ञानोबाचा ॥'

ज्ञानदेवांच्या समाधि-सोहळ्याचे नामदेवांचे हे अभंग वाचताना डोळे पाणावले नाहीत, असा मनुष्य विरळा ! ज्या तन्मयतेने नामदेवांनी हा सोहळा वर्णिला आहे, त्याच्याशी वाचणारा कमालीचा समरस होतो. त्याचे मन शुद्ध होते. अंतःकरण ज्ञानदेवचरणी समर्पित होते; 'अहं कधी विराला', हेही कळत नाही. अतीव आदराने मस्तक नम्र होते. खरंच, वाचकाला भावसमाधी लावण्याचं विलक्षण सामर्थ्य नामदेवांच्या या अभंगांत आहे !

सौ. सु. आ. शाळीग्राम
५१२, उमाप्रसाद, फ्लॅट नं. ७, शनिवार पेठ,
पुणे ४११ ०३०.

## ॥ नामदेवांची हिंदीतील आरती ॥

बोल जै जै नामदेवा । जै जै नामदेवा ।
ईशवर भक्त शिरोमनी मन मोहन देवा ॥ जय...
पंढरपुर नगरी मे जनम दियो माता ।
करातक शुक्ल इकादशी जगमें विख्यात ॥ जय...
तन मंदिर में मन ने जब आसन लाया ।
ठाकुर दूध पिलाया हरी दर्शन पाया ॥ जय...
जंगल खेलत खेलत शेर चलत आया ।
दौडे बालक सब तुम, पकड गले लाया । जय...
पारस ब्राह्मण का तुम कूप फैक दीया ।
सच्चा पारस दे इस जीवन सफल किया ॥ जय...
एक समय जब घे को अग्नि भसम कियो ।
बाढी वेग मगायो मंडप छाए ॥ जय...
एक अभिमानी धन का तुला दान किया ।
सम कागज मेंग सोना मान तोड दीया ॥ जय...
प्रान अन्त गऊ कारण तन का काष्ट लिया ।
प्रभु शक्तिबल से तुम जीवन दान किया ॥ जय...
पखंडन खंडन को तुम तीर्थाटन कियो ।
सत उपदेश से लाखो पापी तार दियो ॥ जय...
शरणागत की अब तुम आकर सार लिवो ।
डोलती नय्या को तुम जल्दी पार कियो ॥ जय...







## ॥ पसायदान ॥

आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळां । माझिया सकळां हरिच्या दासां ॥ १ ॥
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । हे संत मंडळी सुखी असो ॥ २ ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥
नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

घालीन लोटांगण वंदिन चरण ।
डोळ्यांनि पाहिन रूप तुझें ।
प्रेमें आलिंगिन आनंदे पूजिन ।
भावे ओवाळीन म्हणे नामा ॥
जय जय रामकृष्ण हरी ।
जय हरी विठ्ठल ।



## वाचकांचे मनोगत

*ट्रस्टला अर्थसहाय्य उपलब्ध व्हावे या हेतूने ७ वर्षांपूर्वी कल्याणीची कल्पना मांडली गेली. ट्रस्टचे अध्यात्मिक व सामाजिक उद्दीष्ट साध्य करीत असताना आमच्या अंकाला प्रथित यश लेखकांनी त्यांच्या लेखाद्वारे हातभार लावला. त्यामुळेच ओंकार ट्रस्टचे कल्याणी विशेषांक पाहता पाहता संत साहित्याच्या समृद्धीत बहरला जाऊ लागला व असंख्य वाचकांनी त्यांचे 'कल्याणी' विशेषांकाचे मनोगत पत्राद्वारे तसेच प्रत्यक्ष भेटीत व्यक्त केले. त्यातील काही वाचकांचे मनोगत खाली देत आहोत.*

**संपादक**

आपण पाठविलेला ओंकार ट्रस्टचा संत एकनाथ महाराज 'कल्याणी' विशेषांक मिळाला. मन:पूर्वक आनंद झाला. **विशेषांक वाचताना संत एकनाथ महाराजांच्या विविध पैलूंची एक झलक पाहायला मिळाली. एकनाथी भागवताचे सखोल वाचन मनन चिंतन करण्याची उत्सुकता वाढली आहे असे प्रामाणिकपणे सांगू इच्छितो.**

श्रीसमर्थरामदास स्वामींच्या वैचारिक घडणीवर संत एकनाथ महाराजांचा संस्कार दिसतो. ती पार्श्वभूमी समजून घ्यायचा प्रयत्न करीन. आपला ट्रस्ट करीत असलेल्या सांस्कृतिक, सामाजिक व अध्यात्मिक कार्याबद्दल आपला आदर करतो. **संतांचे विचार समाज मानसात पुनः एकदा ढवळून काढून राष्ट्र उत्थानासाठी धडपड व आत्मकल्याणाचा खरा मार्ग शोधून काढण्याच्या भगीरथ कार्यामध्ये आपल्या ट्रस्टचा लक्षणीय सहभाग पाहून समर्थांचा हा श्लोक डोळ्यांपुढे येतो.**

सदा सर्वदा देव सन्नीध आहे । कृपालुपणे अल्प धारिष्ट पाहे ।
सुखानंद आनंद कैवल्यधानी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी
जय जय रघुवीर समर्थ

**वामन गो. तांबवेकर ट्रस्टी,**
श्रीसमर्थ रामदास कृपा ट्रस्ट, मुंबई.

आपला 'कल्याणी' १९९७ चा संत एकनाथ महाराज विशेषांक अतिशय चांगल्या स्वरूपात काढला आहे. संत एकनाथांच्या बहुगुणी-बहुरूपी व्यक्तिमत्वाचे व त्यांच्या संस्कृती संवर्धन व त्याद्वारे धर्म संरक्षण या महान कार्याचे समग्र दर्शन ह्या विशेषांकाने घडविलेले आहे. संत एकनाथांचा अभ्यास करू इच्छिणाऱ्यांना तसेच जिज्ञासूंनाही तो एक 'संदर्भ ग्रंथ' म्हणून उपयुक्त ठरेल. कल्याणीचा हा अंक एक संग्रह्य अंक वाटला.

**सौ. सुनीता तांबे, पुणे**

आपण कल्याणीचा प्रस्तुत अंक अत्यंत परिश्रमपूर्वक देखणा काढला आहे. **संत एकनाथ महाराजांसंबंधीचं आजवरचं विपुल लेखन, ग्रंथ ध्यानी घेता त्या मालिकेत केवळ संख्येनं एका अंकाची भर न पडता गुणात्मक दृष्टीनंही अंक संग्राह्य आहे.** असं प्रस्तुत ग्रंथरूप बघून जाणवलं अन् मोकळेपणानं लिहावसं वाटलं.

**डॉ. सौ. कुमुद गोसावी, औरंगाबाद.**

श्रीसंत एकनाथ महाराज विशेषांक मला नुकताच मिळाला. या सर्वांग सुंदर अंकाची भेट-प्रत आपण आस्थेने आणि आठवणीने पाठविली आहे. मी आपला मनोमन आभारी आहे. अंकातील लेखविषय वेचक आहेत. **लेखक व्यासंगी व सश्रद्ध आहेत. संत एकनाथ एक ग्रंथकाराभ्यास या विषयाचा सर्वांगीण अभ्यास करण्याच्या दृष्टीने अंक उपयुक्त आहे.** आपले आणि सर्व सहकारी स्नेहीजनांचे मी अंत:करणपूर्वक अभिनंदन करतो.

**डॉ. हे. वि. इनामदार, पुणे.**

कल्याणीचा एकनाथ विशेषांक मिळाला. मुद्रण मांडणी सुबक आहे. **आपले सर्वच अंक संदर्भ मूल्य असलेले असे असतात.** त्यांचा विद्यार्थ्यांना उपयोग होतो. **तसेच आपण लेखकांनाही लिहितेकरता** अन्यथा लिहिणे राहून गेलेले असते. मन:पूर्वक सर्व सहकाऱ्यांसह आपले अभिनंदन.

**डॉ. उषा मा. देशमुख, मुंबई.**